# अध्याय चौथा

# अनुक्रमणिका

**चौथा अध्याय—( १८ ।– १४४१–१४४४ ):**

**आणि तेचि नित्यादिक । अज्ञानाचे अवश्यक ।**
**आचरतां मोचक । केवि होय पां ॥ १४४१ ॥**

**ऐसि अपेक्षा जालया । बद्ध मुमुक्ष ते आलया ।**
**देवे ब्रह्मार्पणत्वे क्रिया । सांधितली ॥ १४४२ ॥**

**जे देह वाचा मानसे । विहित निफजे जे जैसे ।**
**ते येका ईश्वरोद्देशे । किजे म्हणितले ॥ १४४३ ॥**

**हेचि ईश्वरी कर्मयोगे । भजन कथनाचे खागे ।**
**आदरिलेसे संभोगे । चतुर्थाचेनि ॥ १४४४ ॥**

* * * *

**ते विश्वरूप अकरावा । अध्यावो सांपडे जंव आघवा ।**
**कर्मे ईशु भजावा । हे बोलिले ॥ १४४५ ॥**

**हे अष्टाध्यायी उघड । जाण येथें देवताकांड ।**
**शास्त्र सांगतसे आड । मोडुनि बोले ॥ १४८६ ॥**

* * * *

**श्रवणेंद्रिय धन्यता = श्रवणेंद्रिय भाग्य** (१–५). श्रवणेंद्रिय पिकलें, आज कानांचा भाग्योदय झाला आहे, त्यांनीं गीतेचा ठेवा देखिला–आतां स्वप्नच हें खरें जसें एक (१). **कृष्णार्जुन संवाद-सुख** (२–५). विवेक सारासार विचाराची गोष्ट, याहिवर श्रीकृष्ण भगवान् प्रतिपादण्याचें करीत आहेत, भक्तश्रेष्ठ अर्जुन ऐकण्याचें करीत आहे–ऐकत आहे (२). पंचमस्वर सुगंध स्वादास येऊन पुण्य पाहत आहे, विनोदच कीं ह्या गोष्टीसंबंधींचा (३). दैवाची विशेष गोष्ट, येथें अमृताची गंगा भेटली; श्रोत्यांचीं तपें फळभार घेऊन आलींत (४). सर्व इंद्रियांनीं स्वादास आलेल्या श्रवणाच्या घरीं रिगावा करून असावें, तरच संवादसुख गीतारहस्याचें तें अनुभविण्याचें होईल (५).

**अर्जुनाचें भाग्य–देवाचें प्रेम** (६–१५). पाल्हाळ सोडून ती कथा सांगणें, जें श्रीकृष्ण व अर्जुन दोघे बोलत होते, असे संत ज्ञानेश्वरांना म्हणत आहेत (६). संजय धृतराष्ट्रास म्हणत आहे कीं, आज अर्जुन दैवगुणानें अधिष्ठिला आहे, दैवी संपत्तीनें प्रीतीस येऊन श्रीनारायणाचें त्याशीं बोलण्याचें होत आहे (७). **ईश्वरास प्रियतम कोण–(प्रेमाचें होणें, दैवास आलेलें, असा) पार्थ** (८–११). पिता वसुदेव,

माता देवकी, बंधु बळिभद्र, त्यांनाहि सांगितलें नाहीं तें गुह्य अर्जुनास सांगितलें (८). देवी लक्ष्मी नेहमींच्या जवळपणाची तरी ह्या प्रेमाचें सुख पाहत नाहीं, आज श्रीकृष्णाच्या प्रेमाचें सुख-बल-अर्जुनाच्या जवळचें झालें आहे (९). सनकादिकांच्या आशा वाढलेल्या, आम्हींच देवाच्या प्रीतीचे, त्यांनाहि पण येथें प्रेमाचें होणें साधलें नाहीं-(दैवास त्यांनाहि येणें झालें नाहीं) (१०).

जगदीश्वराचें प्रेम अर्जुनामध्यें निरुपमतेच्या कोटीस येऊन आहे, कसें बरें तें पार्थानें अनुत्तम पुण्य केलें असावें (११). ज्याच्या प्रीतीस्तव निराकार साकार झाला आहे, अव्यक्त व्यक्तीस आला आहे, मला ह्या दोघांची स्थिति एकरूपच-एकाकारच वाटते, आवडत आहे, आल्हाद देत आहे (१२). भगवान् योग्यांना आढळत नाहीं, वेदार्थालाहि आकळत नाहीं, त्याचे ठिकाणीं ध्यानाची दृष्टि पोहोंचत नाहीं (१३). **तो आत्मस्वरूप** निजस्वरूप अनादि (**निष्कंप**) अविक्रय अचल मोठाच कीं (सकृप म्हणजे) दयाळु झाला आहे (१४). परमात्मा त्रैलोक्याच्या घडीचें स्थान, त्रैलोक्याचें रूपच कीं एक तो, आकाराच्या पलीकडच्या कांठवा निराकार असून, अर्जुनाच्या प्रेमाचा होऊन, हा अर्जुनाला कसा स्वाधीन झाला आहे-आवडला, आकळला (स्वाधीन झाला) आहे-तें सांगता येत नाहीं (१५).

**योगस्थिति निरूपणपरंपरा, कर्मयोगाचें प्राचीनत्व - परंपरा** (१६-२७). श्रीकृष्ण म्हणत आहेत कीं, हा योग आम्हीं विवस्वानास सांगितला, पण ती गोष्ट बहुत दिवसांची जुनी पुराणी (१६). त्या विवस्वानानें अवघी सर्व योगस्थिति मनु जो त्यास निरोपण्याची केली (१७). मनूनें ती अनुष्ठानाची केली व मग ईक्ष्वाकु जो त्यास उपदेशिली-अशी परंपरा आद्य अशी विस्तारलेली आहे (१८). आणखीहि राजर्षी ह्या योगास जाणते झाले, त्यानंतर आतां तो योग कोणीहि जाणत नाहीं (१९). **मोहामुळें योगाचा लोप व आत्मबोध-विसर** (२०-२६). प्राणी विषयभोगावर भर देणारा, देहावरच सर्व आदर, म्हणून आत्मबोध विसरला (२०). आस्थाच अव्हासव्हा झाली, आडमार्गास गेली, विषयसुखाची परम अशी अवधी, जीवपणाची उपाधी, विषयरूपच ती अशा अवधीची होऊन आहे (२१).

दिगंबर, त्याचें गांव, जेथें उंची वस्त्रें काय कामाचीं! जन्मतःच आंधळेंपण, तेथें सूर्याची मातब्बरी (कसल्या महत्त्वाची!) कसची ती! (२२). बहिऱ्याच्या सभेमध्यें गीतास मान्यता नाहीं! कोल्ह्यास चांदण्याची आवड (का आनंद) नाहीं (२३). चंद्र-उदयापूर्वीच डोळे फुटतात ज्यांचे, ते कावळे चंद्रास कसचे ओळखणारे! (२४). वैराग्याची शींवच माहीत नाहीं, (विवेक विचार) सारासार विचार भाख माहीत नाहीं, असे ते मूर्ख मज ईश्वरास पोहोंचणारे नच (२५). कसा मोह वाढला, बहुत काळ व्यर्थ गेला, म्हणून हा योग ह्या लोकीं लोपला (२६). **अर्जुन प्रेमाचा पुतळा म्हणून (तेंच) योगाचें गुज सांगितलें** (२७-३१). तोच हा योग आज हे कुंतीसुता, तुजला आम्हीं तत्त्वतः सांगितला, भ्रांत होऊं नको (२७).

**देवाचीं दिव्य जन्मकर्में** (२८-४५). असें हें माझ्या जीवींचें निजगौप्य (गुजराण होणारी ज्यायोगें) तुला न सांगतां कसें ठेवूं?-कारण तूंच मजला पढियंता म्हणून-(२८). तूं प्रेमाचा पुतळा, भक्तीचा जिव्हाळा, प्रेमळ मित्रत्वाचा जीवनझरा (२९). अनुरागाचा ठाव, आतां तुझें वंचन करावें तें कां, जरी आम्हीं संग्रामारूढ आहोंत तरी-(३०). क्षणभर तें सहन करावेंच, युद्धाचें गाजणें वाजणें नच धरावें, पण तुझें अज्ञानत्व अगोदर नाहींसें करावें असें होत आहे (३१). **देवाचें महत्त्ववर्णन** (३२-३४). तेव्हां अर्जुन म्हणत आहे कीं, हे कृपानिधि, पोटींचें प्रेम तें एका आईजवळच! तेथें विस्मय तो कसचा! (३२). संसारांत श्रांत झालेल्यांची तुम्हीं अहो माऊली आहांत, साऊली आहांत-आम्हांस जन्मली ती तुमची कृपाच एक (३३). एकादें पांगुळ जन्मलें तयाचा जन्मभर त्रास सोसणें होतेंच, हें तुमचें तुम्हांपुढें काय बोलायचें?-(३४).

**अर्जुन विचारतो–"रवीस" केव्हां उपदेश केला ?** (३५–४०). आतां यावर मी कांहीं एकादें पुसणें करीत आहे, बालकाचें विचारणें तें म्हणून देवांनीं चित्त द्यावें, रागास येऊं नये–नच यावें (३५). मागील (वार्ता) गोष्ट ती, माझें चित्त मानण्याचें करीचना (३६). विवस्वत जो कांहीं कोण कसला, हें वडिलांनाहि माहीत नाहीं–तरी त्याजला तुम्हींच केव्हां व कमचा उपदेश तो केला म्हणावा! (३७). तो रवि बहुत काळाचा, जुना पुरातनचा आणि तुम्हीं श्रीकृष्ण तर अगदीं सांप्रतचे, या कारणास्तव ह्या उपदेशा-संबंधीं एक विसंवादच होत आहे (३८). देवा, तुमचें हें चरित्र मला तर कांहींच समजत नाहीं, हें लटकें आहे असें म्हणावें तरी कसें ?–(३९). हीच गोष्ट सर्व मी समजेन अशा बेतानें सांगावी, जें का तुम्हीं रवीस उपदेश केला म्हणावा तें–(४०).

**प्रकृतीमुळें जन्मसंभव** (४१–४४). श्रीकृष्ण म्हणतात–हे पंडुसुता, जेव्हां तो विवस्वान् होता त्या काळीं आम्ही नसूं अशी का तुझ्या चित्ताला भ्रांति वाटते? (४१). तुझ्या हें जाणीवेस येत नाहीं, तुम्हां आम्हांस जन्में बहुत होऊन गेलेलीं तीं आपलीं तूं स्मरत नाहींस (४२). ज्या काळीं जें जें कांही होऊन अवतरतों, तें सर्व कांही मी स्मरतों (४३). म्हणून मागील सर्व कांहीं मला आठवाचें असतें, मी अज तरी प्रकृतीच्या योगेंकरून संभवे–जन्म घेतों (४४).

**धर्मरक्षणार्थ अवतार** (४५–४९). माझें अव्ययतत्त्व–ब्रह्मतत्त्व–मुळींच नाश पावत नाहीं, पण जें कांहीं उत्पन्न होतें तें एकतेचें, मायेच्या योगेंकरून माझ्याच ठिकाणीं प्रतिबिंबित दिसतें (४५). माझी स्वतंत्रता नच मोडते; पण कर्माच्या सर्वथैव आधीन असाच आवडतो, तेंहि जर का बुद्धिभ्रांत तरच फक्त–एरव्हीं नाहीं (४६). दर्पणांत पाहण्यानें एक जें सरळ तेंच दुसरें तिसरेंच एक दिसतें, येऱ्हवी वस्तूसंबंधींचा विचार केला तर दुजें नाहींच (४७). तसा मी अव्यक्त अमूर्तहि प्रकृति-अधिष्ठित होतों तेव्हां नट का नटी होऊन कार्यासाठीं नटतों (४८).

अवघे हे धर्मजात म्यां युगायुगीं रक्षावेत, असा हा बोल आद्य असा स्वभावेंकरूनच कीं–(४९). **अवतारकार्य** (५०). अजत्व पलीकडे ठेवतों, निराकारत्व आठवीत नाहीं, जेव्हां का अधर्म धर्मास शह देतो–पराभवतो–(५०). तेव्हां मी आपल्याचेनि कैवारानें साकार होऊन अवतरतों, मग अज्ञानाचे अंधारे गिळून टाकतों (५१). अधर्माची–धर्मविरुद्ध आचाराची–सीमा तोडून नाहींशी करतों, धर्मविरुद्ध लिखाणाचा नाश करतों, सज्जनांकडून धर्माचा विजयध्वज उभारतों–सुखाची गुढी उभारतों (५२). धर्मास अपाय करणारीं दुष्ट कुळें नाशाचीं करतों–साधुसज्जनांना पुन्हां सन्मान प्राप्त करून देतों, धर्माचें नीतीशीं लग्न लावून एकत्र नांदावयास लावतों (५३).

**जन्ममरणातीत देव** (५४–५८). नच सारासार विचार–अविवेक–त्याची काजळी काढून टाकतों–सारासार विचाररूपी विवेकदिवा उजळ करतों, तेव्हां यज्ञ करणारा जो त्यास निरंतरची दिवाळी होते (५४). त्या सुखानें विश्व कोंदकोंदून धर्मच एक जगीं नांदूं लागतो, सात्त्विकांना दोदें निघूं लागणारीं होतात (५५). पापाचा–पदर–डोंगर फिटला होतो–पुण्याची पहाट फुटते, जेव्हां का माझी मूर्ति प्रगटते (५६). **विवेकी परममुक्त** (५७–६५). असल्या कामाकरितां मी युगाच्या युगीं अवतरतों, हें जो ओळखतो तोच जगीं विवेकी–विचारी–समजावा (५७). **भाव तसा देव** (५८–७६). माझें न जन्मलेपणानें जन्मणें, कर्म न करण्यानें कर्म करणें, हे अविकार (–लिप्त न होण्याचा गुण–निर्विकार) जो जाणतो, तो परममुक्त समजावा (५८).

तो देहानें चालत असला तर न चालतसा दिसतो-चालत नाहीं, देहांत असूनहि कळत नाहीं–मरणकाळीं माझ्याच रूपांत मिळून जातो (५९). येऱ्हवीं मागील-पुढील कशाचाहि शोक करीत नाहींत–इच्छाशून्य–

क्रोधाच्या वाटेस जात नाहींत (६०). (माझ्या) योग्यतेचे आहेत, सेवेंतच माझ्या जियाले–निरिच्छ एका आत्मबोधांतच संतोषले (६१). ते तप व तेजाची रासच, ज्ञानाचें सर्वथैव एकच स्थान–एकच घर, तीर्थाची पवित्रता, तीर्थ म्हटली, तीर्थरूप अशी म्हटली–(६२).

सहज स्वाभाविकपणेंच स्वरूपाला आले, मी तेच ते असें झालें, कारण माझ्यांत व त्यांच्यांत कसलाहि पडदा नाहीं म्हणून (६३). मांग कीं पितळेची गंधी–काळिमा–संपूर्णपणें नाहींशी झाली तेव्हां तर तेंच सुवर्ण की–तेथें दुसरें तिसरें सोनें पाहावें लागतें ? (६४). यमनियमरूपी अंगें–अंगांनीं निर्मळ–शुद्ध झालेले, तपानें ज्ञानानें निर्मळ झाले, मी तेच ते होत, येथें कसचा संशय?–येथें संशय कशाला? (६५).

**सकळ मनुष्यजात स्वभावेंच भजनशील, पण ज्ञानावांचून**–(६६–७०). येऱ्हवीं कोणी मजला भजतात जसे–त्यांना मीहि तसाच भजतों (६६). सर्वेहि मनुष्यजात स्वभावतः भजनशील–केवळ माझ्याच ठिकाणीं उपभोग स्वभावाचे झाले आहेत (६७). ज्ञानाशिवायच मुळीं–कीं आपण सच्चिदानंदरूप आहोंत हें न कळल्यामुळें बुद्धि भेदाची होऊन एकाचे ठायीं अनेकत्व पाहतात–तत्त्व न कळल्यानें ते नासले–यया मला एकाला त्यांनीं अनेकत्व कल्पिलें म्हणून (६८). म्हणूनच साम्य एकरूपतेचे त्याचे ठायीं भिन्नतेचा भाव पाहतात–नाम नसलेल्यास नाम ठेवतात–अचर्चातें–म्हणजे वर्णनातीत आहे त्यास देव, देवी म्हणतात (६९). जे सदा सम पूर्ण तेथें अधम का उत्तम विभाग नाहींत, तेथें मन बुद्धीस वश होऊन विभाग मानतात (७०).

**कर्मफलसूचक भजनास मी साक्षीभूत : भावना फळते** (७१–७६). मनांत अनेक हेतु धरून (यथा) उचित उपचारांनीं मानलेलीं देवतादैवतें (अनेक देव मानून) उपासतात, सेवितात (७१). येथें जे जे कांहीं अपेक्षा केलेले ते तसेंच समस्त पावतात, पण असें हें जाण कीं, तें कर्मफळच एक निश्चित (७२). देते का घेते, कर्मावाचून दुसरें कांहींहि नाहीं–हें निःसंशय जाण–एक कर्मफळच मनुष्यलोकानें सूचनेचें केलें (७३). शेतांमध्यें पेरावें तें उगवणार, त्याशिवाय दुसरें नच निपजणारें; आरशांत पाहावें तेंच दिसतें–आरशाच्या आधारावर पाहणें केलें, तर पाहावें तेंच दिसणार केव्हांहि (७४). डोंगराच्या कड्याखालीं निमित्तमात्रें आपलेंच बोलणें, शब्द–प्रतिध्वनि–होऊन उठतो, ऐकूं येतो (७५). हे अर्जुना, समस्त भजनाला मी साक्षीभूत, येथें तर ज्याची त्याची भावना प्रतिफळणारी होते–येथें भावनेसारखें फळ मिळतें (७६).

**चातुर्वर्ण-उत्पत्ति** (७७–८०). **चातुर्वर्ण्य-उत्पत्ति हेतु** (७७). याचप्रमाणें आतां असें जाण कीं, गुण व कर्म विभागाप्रमाणें चारी वर्ण मियां सृजिले, उत्पन्न केले (७७). **कर्म अकर्म विकर्म**–(७८–११४). प्रकृतीच्या आधारावर, गुणाच्या व्यभिचारावर तदनुसार कर्में मानिलीं होतात (७८). येथें धनुर्धरा, एकच जरी तरी चार वर्णांचे झाले, गुणकर्मानुरूप वर्णभेदाची व्यवस्था झाली आहे–गुणांच्या कर्मांचें निवडणें–शुद्ध करणें असें सहज विचारास (का विवेकास) आलेलें–(७९). अशी ही वर्ण व भेदव्यवस्था, पण तेथचा मी कांहीं कर्ता नाहीं (८०).

**कर्मानें मोक्ष** (८१–८३). हे मजन्विस्तव झाले, पण मी कांहीं ते केले नाहीं असें ज्यानें जाणलें तो कर्मबंधनापासून सुटलाच म्हणावा (८१). मागील मुमुक्षु त्यांनीं मजला याप्रकारचा निष्काम कर्मयोग जाणून समस्त कर्में केलीं (८२). भाजलेलीं बीजें पेरिलीं तीं उगवतच नाहींत, तशीं कर्में जरी तरी पण तींच कर्में बंधाचीं न होतां मोक्षाचीं झालीं–मोक्षहेतूचीं झालीं (८३).

**कर्म अकर्म विवंचना कठीण** (८४–८८). अर्जुना, आणीक एक गोष्ट आहे–कर्म व अकर्मासंबंधींचा विचार आपल्याच मर्जीप्रमाणें करणें हें सज्ञानास योग्य नाहीं (८४). कर्म म्हणजे तें कोणतें, अकर्माचें लक्षण काय, असा विचार केल्यास शहाणे घोटाळ्यांत पडतात (८५). खोटें नाणें–खऱ्याच्या

सारखेपणामुळें–डोळयांचें पाहणें खऱ्याखोट्यासंबंधीं संशयांत घालते (८६). नैष्कर्म्यतेच्या भ्रमावरच कर्में गिंवसिलीं होतात–तीं कर्में तर मनोधर्मामुळें दुसरी एक निराळी सृष्टीच करूं शकतील अशीं–(८७). मग मूर्खाची काय कथा? त्रिकालज्ञ दूरदर्शी तेहि मोहिले, याकरितां तेंच सांगतों ऐक (८८).

**कर्म = विहित कर्म. विकर्मन् = निषिद्ध, निंदित कर्म. अकर्मन् = पाप, क्रियारहित, निषिद्ध कर्म. कर्माची गती गहन आहे** (८९–९२). कर्म म्हणजे सहजस्वभावें विश्व आकार संभवतो तें होय. तेंच अगोदर येथें चांगलें जाणावें लागतें (८९). वर्ण आश्रम यास योग्य जें विशेष तें निश्चितपणें उपयोगासहित ओळखावें (९०). जें कांहीं निषिद्ध म्हणतात त्याच्याहि स्वरूपास समजावें; एवढ्यावरच कांहीं अडकणें का गुंतागुंती होणार नाहीं (९१). येऱ्हवीं जग हें सर्वथैव कर्माच्या आधीन! अशी कर्माची व्याप्ति = जगच ताब्यांत ठेवणें जें कांहीं होणारें न होणारें तें = गहनतेची–आतां प्राप्तांचें म्हणजे कर्माकर्माचें पुरें ज्ञान ज्यांना आहे अशा सिद्धांचें लक्षण–चिन्ह–त्यासंबंधीं ऐक (९२).

**प्राप्तांचें–सिद्धांचें–चिन्ह–लक्षण** (९३–१०५). कर्मामध्यें वर्तत, वागत असतां आपली नैष्कर्म्यता पाहतो–कर्मफळासंबंधीं नैराश्यच एक (९३). कर्तव्य, तेथें जगीं दुजेंपण नाहीं–नैष्कर्म्यतेमध्यें चांगला बोधलेला–कर्तव्य नाहींसें झालें–आपणा एका नैष्कर्म्याशिवाय जगांत दुसरें कांहीं उरलें नाहीं म्हणून–नैष्कर्म्यच एक–(९४). क्रियाकलाप–कर्में आचरतांना बरवा चांगला असाच तरी वर दिलेल्या लक्षणांनीं युक्त तोच ज्ञानी (९५). [जळापाशीं उभा आहे]–स्वतःस पाण्यामध्यें पाहतो–तरी भ्रांत न होतां ओळखतो कीं, मी पाण्यांत नसून वेगळा आहे–पाण्याबाहेर आहे निःसंशय! (९६). [नावेमधून जात आहे]–तीरावरील वृक्ष उलट दिशेनें धांवत आहेतसे दिसतें–तेथें खरेपणानें पाहूं लागतो तेव्हां म्हणतो कीं, रूख तर अचळच कीं–(९७). [सर्व कर्मांमध्यें–स्वकर्मामध्यें असणें] तें केवळ खोटें मानून असल्यानें आपण कोणी एक नैष्कर्म्यच, म्हणजे मी कर्मकर्ता नव्हें असा स्वतःस जाणतो–(९८).

तो तर कर्मामध्यें असतां असतांच नैष्कर्म्य तत्त्वास जाणतो–कसें तर सूर्याच्या उदय व अस्ताच्या प्रमाणावरून, सूर्य चालतोसा दिसतो कीं तसा : : [कर्मीं असतां, सूर्य उदय अस्त प्रमाण, तसें नैष्कर्म्य तत्त्व जाण] (९९). मनुष्यासारखा दिसतोसा आवडणारा–तो मनुष्य नसून परब्रह्मच आहे–तो देहधारी असा पण देहबुद्धीचा घडलेला नच; कसें तर आकाशींचा सूर्य आकाशींच, पण बिंब तें पाण्यांत बुडलेलें, तेथें सूर्य नसतो–तो तर आकाशींच (१००). सूर्य (आत्मा) सर्व जगाचा चक्षू, त्यानें कांहींहि नच पाहतां सर्व विश्व पाहिलें, कांहींहि नच करितां सर्वकांहीं केलें–कांहींहि नच भोगतां सर्व भोगजात भोगिलें (१०१).

एकाच ठायीं बसला तरी सर्वत्र तोच गेला–विश्व त्याच्या अंगचें होऊन आहे–तो विश्वच झाला आहे–**तो सर्व विश्वरूप बनला आहे (१०२). परब्रह्म (मनीं फळापेक्षां संचार नाहीं–मन संकल्पे विटाळेना)** ज्या पुरुषाच्या ठिकाणीं कर्माचा कंटाळा नाहीं–खेद नाहीं–फळाची अपेक्षा (मनांत) नाहीं–(१०३). हें कर्म मी करीन, आदरिलेलें तें सिद्धीस नेईन, अशा संकल्पानें मन विटाळत नाहीं ज्याचें–(१०४). ज्ञान अग्निमुखी कर्में अर्पण करून अशेष कर्में नाहींशीं केलीं तो तर मनुष्यवेषानें परब्रह्मच एक असें ओळख (१०५). **भक्तिउल्हासदृष्टि**–(३८८।१४) शरीरासंबंधीं उदास–कर्मापासून होणाऱ्या फलप्राप्तीविषयीं फळभोगाविषयीं निरिच्छ, नेहमीं भक्ति उल्हासाच्या दृष्टीचा असा (१०६). तो संतोषाचा (माजघर) गाभारा, तेथें बसून **आत्मज्ञानाचें भोजन** करीत असतां, **आत्मबोधाचें पक्कान्न** जेवीत असतां, तो (वाढतांना) पुरे म्हणत नाहीं (१०७).

**मुक्त : : गुणातीत** (१०८–११५) अहंभावासकट आशा ओंवाळून टाकतो, अहंकारासुद्धां आशेची ओंवाळणी करून महासुखाची गोडी–ब्रह्मसुख प्रेम घेतांना आवडी अधिकाधिक–म्हणजे अधिकाधिक प्रेमानें

**ब्रह्मसुखाची गोडी घेतो (१०८).** प्रसंगीं जें कांहीं पावतो त्यानेंच सुखावतो, त्यास आपले परावे असें दोन्हीहि नाहीं **(१०९).** दृष्टीनें पाहतो तें आपण होऊन जातो, ऐकते आहे ते तो आपण झाला **(११०).** चरणीं चालतो, मुखानें बोलतो, सर्व चेष्टाजात आपणच कीं बनतो **(१११).** विश्व आपणच स्वतःच सर्वस्वीं त्यास **आतां कोणते तें कर्म बाधणारें?**-फार काय सांगावें, जगांत पाहिलें असतां **आत्मस्वरूपावांचून** त्याला **कांहींहि** दुसरें दिसत नाहीं, त्याला कोणत्या कर्मापासून कसली ती बाधा होणार? **(११२).**

**दुजे जेथें, द्वैत जेथें तेथेंच मत्सर :: विश्व स्वतः आपणच जो-तेथें सर्वथैव ऐक्यच** -(११३-११८). मत्सर उपजतो जेथें तेवढें तितकें त्यास दुजेंपण-दुसरेंपण-दुजें असें उरतच नाहीं-मग शब्दांनीं सांगितलें पाहिजे-बोलणें बोलावें पाहिजे काय कीं निर्मत्सर म्हणून!-**(११३).** **कर्मबंधरहित** कर्म करणारा, **फलेच्छारहित** कर्म करणारा, त्रिगुणातीत असून त्रिगुणांनीं अलिप्त असा **गुणातीत निःसंशय मुक्त (११४).** **कर्ममूलक विविध याग** (११५-११७). **देहधारी** तरी **चैतन्यासारखा** (परब्रह्मासारखा) दिसतो, ब्रह्माच्या कसास लाविला तर ब्रह्मासारखा शुद्ध निर्मळ दिसतो **(११५).**

**मुक्ताचीं कर्में ब्रह्मार्पण** (११६-१२१). **ब्रह्मासारखा** निर्मळ असूनसुद्धां, सहज कौतुकानें यज्ञादिक कर्में करितो तरी तीं **कर्में संपूर्णपणें त्याच्याच ठायीं लय पावतात (११६).** ढग अकाळीचे ते **वृष्टिविवाय आपोआपच** आकाशांत हारपतात **(११७).** शास्त्रांनीं सांगितलेलीं सर्व कर्में, यज्ञकर्में विधिविधानविहित जरी आचरत आहे तरी ऐक्यभावानें ऐक्यासच पावतात-याप्रमाणें तो जरी वेदविहित कर्म यथाविधि आचरीत असला तरी त्या चैतन्य ब्रह्म जो त्याचेच ठायीं लय पावतात; कर्माच्या ठिकाणीं त्याला दुजाभाव नसल्यामुळें तीं त्याचेच ठायीं लय पावतात **(११८).** **यज्ञपुरुष भोक्ता.** हें हवन, मी होता, यज्ञ करणारा आचार्य, ह्या यज्ञामध्यें हा भोक्ता अशा बुद्धीला भिन्नता नाहींच-बुद्धीम दुजें असें मेटणेंच नाहीं, (हें एक हवन, त्याचा मी कर्ता किंवा यज्ञाचा भोक्ता अमुक अशा प्रकारें त्याच्या) बुद्धीला भिन्नभाव नाहीं म्हणून **(११९).**

**आत्मबुद्धि ब्रह्म तेंच कर्म समबोध नैष्कर्म्य** (१२०-१२१). अग्निहोत्रादि कर्म, योग्य यज्ञ यजणें, ते होमाचे मंत्र हवन द्रव्य इत्यादि अवघे सर्व **ज्ञानयोगानें आत्मबुद्धीनेंच पाहणें करतो.** जे जे-यष्टा-इष्ट यज्ञ करतो, त्यांतील होमद्रव्यें व मंत्र हीं सर्व **आत्मस्वरूप** म्हणजे ब्रह्मस्वरूपच आहेत, असें तो आत्मयज्ञ समजतो-**(१२०).** म्हणून **ब्रह्म तेंच कर्म होय : अभेद भावाची साम्यदृष्टि**-त्यास **नैष्कर्म्य हेंच कर्तव्य-निष्काम कर्म त्याचा गुण नैष्कर्म्य,** म्हणून अर्जुना, ब्रह्म तेंच कर्म अशी सम-बुद्धि ज्याच्या अंतःकरणांत बाणली त्यानें कर्म केलें तरी तें नैष्कर्म्यच होय **(१२१).**

**दैवयज्ञ** (१२२-१२४). अज्ञानरूप बालपण संपून-अविचाररूप बाल्यावस्था गेल्यावर-ज्याचे **विरक्तीशीं लग्न** लागलें-(अग्निसेवा करणाऱ्याला स्त्री पाहिजेच व मगच ती योगाग्नीची उपासना घडते ना- : कारण लग्न झाल्यावांचून अग्निसेवा करतां येत नाहीं). मग **जीव ब्रह्मैक्यरूप जो योगाग्नि त्याची उपासना** त्यानें आरंभिली **(१२२).** अहर्निशी यजनशील-जे रात्रंदिवस यज्ञ करणारे आहेत त्यांनीं गुरुवाक्यरूपी अग्नींत मनासहित अविद्येचें-अज्ञानाचें-हवन केलें **(१२३).** अर्जुना, आत्मसुखाची इच्छा ज्यांना असेल, त्यांनीं योगाग्नीचें यजन करावें, ह्यालाच म्हणतात-दैवयज्ञः-आत्मसुखच एक, ब्रह्मानंदानुभव कामधावा **(१२४).**

**यज्ञाचे प्रकार** (१२५-१३९). आणीक कांहीं सांगतों. आतां जे **ब्रह्माग्नीचे** अग्निहोत्री त्यांना यज्ञानेंच यज्ञाची उपासना करणारे का स्वधर्मानें ईश्वर आराधन करणारे म्हटले, त्याविषयीं वर्णन ऐक **(१२५).** एक आत्मसंयम अग्नींत हवन (होम) करणारे अग्निहोत्री ते तीन युक्तींनीं-कायिक, वाचिक, मानसिक-मंत्रांनीं

पवित्र अशा **इंद्रियद्रव्यांनीं यजन (हवन) करितात (१२६).** एकामध्यें वैराग्यरूपी सूर्य प्रकाशतो त्यांनीं इंद्रियनिग्रहरूपी अग्निकुंडें विहाराचीं केलीं तेव्हां तेथें संयमाग्नीचें उद्धरण करून तो प्रज्वलित झाल्यावर इंद्रियरूपी अनल ज्ञानानें प्रदीप्त केले ( प्रज्वलित झाले, प्रगटले ) **(१२७).**

त्यांनीं विरक्तिरूप अग्निज्वाळा आपलीशी केली, तेव्हां तर विषयविकाररूपी इंधनें-लाकडें-पेटलीं. तेव्हां ज्ञानेंद्रियांच्या पांच विषयांच्या कुंडांना आशारूपी धुरानें ( पांचहि कुंडांना ) सोडलें, त्यागिलें **(१२८).** मग वेदवाक्य विधीच्या युक्तीनें, वेदांत सांगितलेल्या विधीच्या योगानें उदंड **विषय आहुतींनीं** इंद्रिय ताप अग्नीच्या कुंडांत हवन केलें, **इंद्रियरूप अग्नि पेटलेल्या कुंडांत विषाच्या मोठ्या आहुति** दिल्या **(१२९).** पार्था, एकानीं याप्रमाणें दोष सर्वैथैव क्षाळिले, अशाप्रकारें कोणीं आपल्या सर्व दोषांचें क्षालन केलें. एकानीं हृदयरूपी अरणीवर अग्नि उत्पन्न करण्याच्या काष्ठानें विवेकाचा मंथन-दंड केला–विवेक हाच अग्नि उत्पन्न करण्याचा दंड केला. कोणी **हृदयरूप अरणीवर विचाररूप मंथा केला (१३०).**

तो **उपशम**–शांतिरूप रज्जूनें नेटानें बांधिला–धैर्यरूपी भार घालून दाबला, गुरुवाक्यरूपी बळकटपणानें घुमळला, कसिला :: तो धैर्यरूप भारानें दाबून आणि शांतिरूप रज्जूनें घुसळून **गुरुवाक्यरूप मंत्रानें मंथन केला (१३१).** याप्रमाणें समरसें–सर्व वृत्तीच्या ऐक्यानें मंथन केलें तेथें झडकरच काम झालें–काम काजास आलें, जें का ज्ञान अग्नीचें उज्जीवन झालें :: अशा प्रकारें सर्व वृत्तींचें ऐक्य करून मंथन केल्यानें तेथें तत्काळ कार्य झालें, तें कोणतें तर **ज्ञानाग्नि प्रज्वलित झाला (१३२).** पहिला ऋद्धिसिद्धीचा मोह-संभ्रमरूपी धूर निघून गेला, मगच अग्नीची ठिणगी प्रगटली : : तेव्हां प्रथम ऋद्धिसिद्धीचा मोह उत्पन्न झालेला धूर नाहींसा होऊन, मग सूक्ष्म अशी अग्नीची ठिणगी उत्पन्न झाली **(१३३).** जें मन यमनियमांनीं मृदुत्वास आलेलें, सौम्य झालेलें, हळुवारलें असें आइतेच होतें, त्या मनाचें मोकळें सुटें असें वाळलेलें जळणच त्या अग्नीला पेटवण–सर्पण घातलें : : शमदमांनीं शुष्क झालेलें जें **निर्दोष मन** त्याचें अग्नीला पेटवण घातलें **(१३४).**

प्रदिप्तपणानें समृद्ध ज्वाळा वासनांतराचिया समिधा, ममत्वरूप ( मोह अहं ) तुपासह अनेकविध त्या जाळिल्या : : त्याच्या साहाय्यानें मोठी ज्वाला उत्पन्न झाली, नंतर वासनारूप समिधा = अनेक प्रकारचा मोह हें घृत घालून त्या जाळल्या **(१३५).** त्या मंत्रदीक्षितांनीं इंद्रियकर्मांच्या आहुती त्या प्रदीप्त ज्ञानअनलाचे ठायीं तेथें सोऽहम् मंत्रानें दिधल्या : : नंतर जीवरूप दीक्षितानें **ज्ञानरूपी प्रदीप्त झालेल्या अग्नींत इंद्रिय-कर्मांची आहुती दिली (१३६).** नंतर प्राणकर्माच्या यज्ञपात्रानें घृताहुती हुतांशीं घातली : पूर्णाहुती पडलेल्या हुताग्नींत तेथें तर सहजच अवभृत यज्ञांतील शेवटलें स्नान ब्रह्मरसींच झालें : : शेवटीं प्राणकर्म हाच स्रुवा–नांवाच्या यज्ञपात्रासह अग्नीमध्यें पूर्ण आहुती दिल्यावर ऐक्यबोध हें ( यज्ञाच्या शेवटचें ) अवभृत स्नान सहज घडलें **(१३७).**

आत्मबोधीं होणारें सुख, जें का संयम अग्नीचें हुतशेष, तोच यज्ञपुरोडाश–यज्ञांतील हुतशेष–ज्यांनीं घेतला : : आणि संयमाग्नींत इंद्रियादिक होमद्रव्याचें हवन करून, बाकी राहिलेलें, जें आत्मसुख तेंच पुरोडाश म्हणून घेतलें **(१३८).** कोणी एक अशा यजन यज्ञानें–यजनानें–त्रिभुवनामध्यें मुक्त झाले. ह्या यज्ञक्रिया आन आन पण प्राप्त तें एकच :: कांहीं अशा रीतीनें यज्ञ करून त्रिभुवनांत मुक्त झाले : म्हणून **ह्या यज्ञ-क्रिया अनेक तरी प्राप्य तें एक**–ह्या यज्ञक्रिया जरी नाना प्रकारच्या आहेत तरी त्यांची अखेर फलप्राप्ति एकच आहे **(१३९).**

एक **द्रव्ययज्ञ** म्हणतात–द्रव्यादिक दान देणें जें– :: हे जे योग सांगितले त्यांपैकीं एकाला द्रव्ययज्ञ म्हणतात. एक तप आचरणाचीं साधनें सामग्री निपजवितात, तो **तपोयज्ञ** :: एकाला तपःसामर्थ्यानें केलेला

तपोयज्ञ म्हणतात. एक योगयागहि हटयोगादि करणारे आहेत, ते हे **सर्व यज्ञच** सांगितले :: एकाला अष्टांग साधनानें केलेला **योगयज्ञ** म्हणतात (१४०). एकानें शब्दाचे ठायीं शब्द यजिलेला तो **वाग्यज्ञ** :: ज्यामध्यें शब्दानें शब्दाचा होम केला जातो, त्याला **वाग्यज्ञ** म्हणतात. ज्या यज्ञांत ज्ञानानें ज्ञेय म्हणजे ब्रह्मवस्तु मिळते तो **ज्ञानयज्ञ** :: आणि ज्या यज्ञांत ज्ञानानें ब्रह्म मिळतें, त्याला **ज्ञानयज्ञ** म्हणतात (१४१).

**जितेंद्रियासच यज्ञ घडतो**–अर्जुना, हे सकळ कठीण, जे का अनुष्ठितां अति सांकडे, पण योग्यता-वशेंकरून जितेंद्रियासीच घडते :: अर्जुना, हे सर्व यज्ञ फार बिकट असून, त्यांचें आचरण करणें फार दुर्घट आहे परंतु ज्यानें इंद्रियें जिंकिलीं आहेत त्यास मात्र ते अधिकारपरत्वें करितां येतील (१४२). **भले ते प्रवीण ज्यांनीं आपणपां आत्महवन केलें**–भले ते प्रवीण, योगसमृद्धीनें महत्वाचे मानलेले, कारण स्वतःसच कीं त्यांनीं आत्महवनाचें केलें म्हणून :: योगसमृद्धीनें सुसंपन्न झालेले पुरुषच हे यज्ञ करूं शकतील. कारण त्यांनीं आपल्या जीवाचे–आत्म्याचे–ठिकाणीं हवन केलेलें असतें म्हणून (१४३). अपान वायूचे मुखीं प्राणद्रव्यें एकानें अभ्यासानें हवन केलीं :: कोणी अभ्यासाचे योगानें अपान वायुरूप अग्नींत प्राणवायुरूप द्रव्याचें हवन करितात (१४४). एका प्राणाचे ठायीं अपान अर्पण करितात–कोणी एक दोन्हीहि वायूंचा निरोध–विरोध–करितात, ते प्राणायामी म्हटले, हे पंडुकुमरा :: हे पंडुकुमरा, कोणी अपान वायु प्राणवायूंत मिळवितात, कोणी दोन्हीहि वायूंचा निरोध करितात त्यांना प्राणायामी, यज्ञ करणारे म्हणतात (१४५).

**ज्ञानयज्ञकर्ते**–कोणी वज्रयोगक्रमानें (–हठयोग क्रमानें) सर्व आहार जिंकून–नियमित करून–प्राणाच्या ठायीं प्राणच निःशंकपणें हवन करितात :: कोणी हठयोगाच्या क्रमानें सर्व आहार जिंकून प्राणवायुरूपी अग्नींत त्वरेनें प्राणाचें हवन करितात (१४६). मोक्षाची, मोक्षप्राप्तीची इच्छा करणारे मुमुक्षु–मोक्षकाम–असे सांगितलेले हे सकळ यजनशील यज्ञकर्ते असून, त्यांनीं यज्ञाच्या योगेंकरून मनोमळ धुऊन टाकलेले, क्षाळिलेले असतात :: अशाप्रकारें त्यांनीं त्या यज्ञाच्या द्वारें आपले कामक्रोधादिक विकार नाहींतसे केलेले असतात (१४७). **अविद्या अज्ञान जाळून टाकल्यावर स्वभावेंच शुद्ध स्वरूप उरतें–अग्नि आणि यज्ञ करणारा असा द्वैतभाव उरत नाहीं**–ज्या यजनानें अविद्याजात जाळिलें, नाहींसें केलें, हविलें, तेथें आतां जें स्वभावतः उरलें तें "निज"–जेथें तर अग्नि आणि होता असें कांहींच उरत नाहीं :: अशाप्रकारें सर्व अविद्या, अज्ञान जाळून टाकल्यामुळें त्याला स्वाभाविकपणेंच शुद्ध स्वरूप उरतें व अग्नि आणि यज्ञ करणारा असा द्वैतभाव राहत नाहीं (१४८).

ज्या यज्ञानें यजन करणाऱ्याचा काम पुरेसा होतो, पुरतो–यज्ञीं यजनाचें विधान संपतें, जेथूनच तेथेंच कीं हे सर्व क्रियाजात वोसरतें–नाहींसें होतें :: ज्या ठिकाणीं यज्ञ करण्याची इच्छा पूर्ण होऊन यज्ञक्रिया संपतात, आणि अर्थात् शेवटीं सर्व कर्में नाहींतशी होतात–(१४९). विचार जेथें रिघूं शकत नाहीं, हेतू साधना कामना ज्यास घेत – पाहत नाहीं, जें द्वैत दोषांच्या संगानें लिंपत नाहीं :: ज्या ठिकाणीं विचाराचा शिरकाव होत नाहीं, कामनेचा स्पर्श होत नाहीं, त्याठिकाणीं द्वैत दोषांचा स्पर्श होत नाहीं (१५०).

**यागविस्तार सांगितला** (१५२–१५६). **योगयागहीनाचें–योगयागरहिताचें–ऐहिक धड नाहीं, मग परत्रासंबंधींची ती गोष्ट कसची**–अनादिसिद्ध चोखट ब्रह्म यज्ञ अवशेष ते ब्रह्मनिष्ठ 'अहं ब्रह्मास्मि' या मंत्रेंकरून सेवितात :: असें जें अनादिसिद्ध व शुद्ध यज्ञावशिष्ट ब्रह्म, त्या ब्रह्माचें हे ब्रह्मनिष्ठ लोक 'अहं ब्रह्मास्मि'–मी ब्रह्म आहे–या मंत्रानें सेवन करितात व ब्रह्मरूप होतात (१५१). यज्ञअवशेष अमृतानें धाले ते अमरपदाला पावले–(अमर्त्यभावा आले)–जसें का आम्हीं म्हणूनच अनायासें ब्रह्म झालें :: त्याप्रमाणें यज्ञाचे शिल्लक राहिलेलें ज्ञानरूप अमृत पिऊन जे तृप्त होऊन अमर होतात, ते सहज ब्रह्मत्व पावतात (१५२). इतरांना, दुसऱ्यांना विरक्ति माळ घालीचना; ज्यांना संयम-अग्नीची सेवा घडेचना; जे जन्मले असून–नरदेहाला येऊन–कोणताच संयम यज्ञ करीत नाहींत :: ज्यांच्या हातून त्या यज्ञाचें आचरण

घडत नाहीं, ज्यांना विरक्ति माळ घालीत नाहीं, ज्यांना आत्मसंयमन करतां येत नाहीं व जन्मास आले असतां योगयागहि करीत नाहींत–(१५३).

ज्यांचा धड प्रपंच नाहीं, त्यांची परलोकची गोष्ट काय विचारावी ! असो ! :: अर्जुना, ज्यांची इहलोकीं धडगत नाहीं, त्यांची परलोकची हालहवाल कशाला पुसतोस, त्यांच्याविषयीं गोष्टच बोलणें नको (१५४). **याग बहुत प्रकारें बोलिले**–(असे) **अनेक याग सांगितले, ते सर्व चांगलेच आहेत असें वेदांनीं विस्तार करून म्हटले आहेत.** अशाप्रकारें जे तुला पुष्कळ प्रकारचे यज्ञ–(बारा प्रकार)–सांगितले, त्यांच्याबद्दल वेदांत पुष्कळ विस्तारानें चांगलें वर्णन केलें आहे (१५५). पण त्या विस्तारास काय करावयाचें आहे?–हे सर्व यज्ञ कर्मसिद्ध–कर्ममूलक असेच म्हणावेत : हे सर्व यज्ञ कर्मापासून सिद्ध झाले आहेत हें जो जाणतो, त्याला कर्मफळाचा दोष लागणार नाहीं; कर्माची बाधा त्याला–पावेल ना–होणार नाहीं :: हे सर्व यज्ञ कर्मापासून उत्पन्न झालेले आहेत, एवढं जाणलें असतां कर्माची बाधा होणार नाहीं (१५६).

**यज्ञाचें मूळ वेद–ज्याचें प्रथम फळ स्वर्ग–ते द्रव्ययज्ञ इत्यादि आहेत खरे, पण ते ज्ञानयज्ञाची बरोबरी–योग्यता पावत नाहींत**–अर्जुना, ज्या यज्ञाचे मूळ वेद आहेत आणि ज्यांत बाह्यक्रियांचाच खटाटोप फार आहे, व ज्याचें प्रथम फळ स्वर्ग आहे–तेथीलच्या अपूर्वतेची नवाई म्हणजे स्वर्गफळ होय (१५७). ते द्रव्ययज्ञादि यज्ञ आहेत खरे, पण सूर्यापुढें जसें नक्षत्रांचें तेज लोपतें, त्याप्रमाणें ते ज्ञानयज्ञाची योग्यता–बरोबरी पावत नाहींत (१५८). **योगी** उन्मेष नेत्र अंजन आत्मसुखप्राप्ति साधावयास ते विसरत नाहींत :: ज्ञानांजन डोळ्यांत घालून आत्मसुखरूप ठेवा मिळवण्याचें–तें मिळविण्याकरितां योगीजन रात्रंदिवस जागृत असतात (१५९).

**ज्ञान** – जे ज्ञान धांवल्या कर्माचा शेवट, आरंभिलेल्या कर्माचें प्राप्य स्थान–वसतीस्थान आहे, जें नैष्कर्म्य-बोधाची–ब्रह्मत्वबोधाची खाण आहे व आत्मप्राप्तीकरितां भुकेलेल्या साधकांच्या तृप्तीचें स्थान आहे–(१६०). ज्या ठिकाणीं प्रवृत्ति पांगुळली म्हणजे कर्माची प्रवृत्ति थांबली व तर्काची दृष्टि गेली, आणि ज्याच्या योगानें इंद्रियें विषयसेवन करणें विसरलीं–(१६१). मनाचें मनपण नाहींसें झालें, शब्दांची धांव खुंटली, बोलाचें बोलपण–बोल बोलण्याचे ते थांबले–आणि ज्या ठिकाणीं ज्ञेय ब्रह्म व्यापलेलें दिसतें–व आतां तर ब्रह्मवस्तु सांपडली आहे–(१६२). ब्रह्मवस्तु लाभल्यामुळें ज्या ठिकाणीं वैराग्याची कष्टप्रद स्थिति नाहींशी होते, वैराग्याचे श्रम परिहार होत आहेत–विवेकाचा सोस नाहींसा झाला–विचाराची हांव नष्ट होत आहे, आणि श्रमावाचून आपोआपच आत्मज्ञान होतें, सहजासहजींच न पाहतांहि आपण स्वतःच आपणा स्वतःस भेटला असें होत आहे (१६३).

**संतास भजल्यानें ज्ञानरहस्यप्राप्ति** (१६५–१७१). असें तें सर्वोत्कृष्ट ज्ञान–ज्ञान चांगलें असें–तें जरी का मनीं आहे–पूर्णपणें जाणावें असें–तें तुला मिळविण्याची इच्छा असेल तर तूं ब्रह्मसंपन्न असे जे संत त्यांची सर्वभावानें सेवा कर–त्यांना सर्वस्वानें भजावें (१६४). संत ज्ञानाचे घर होत–तेथें सेवाधर्म हा त्या घराचा उंबरठा आहे–तेथें सेवा हाच दरवाजा–तो हे सुभटा, आपल्या स्वाधीन कर. अर्जुना, तूं तिकडे वळून सेवाधर्मरूपी उंबरठा आपल्या स्वाधीन करून घे (१६५). तनमनधनेंकरून–कायावाचामनेंकरून–जीवप्राणेंकरून संतांच्या चरणांस लागावें व अगर्वता सकळ दास्य करावें म्हणजे संतांची सेवा कर; ती कशी म्हणशील तर शरीरानें, मनानें, जीवानें सर्व प्रकारांनीं गर्वरहित होऊन चरणांची सेवा करावी (१६६). मग आपलें अपेक्षित त्यांना पुसलें असतां ते सांगतील, ज्यायोगें मन–अंतःकरण बोधलें होऊन संकल्पास येत नाहीं–संसारसंबंधीं कल्पना करीत नाहीं–अशाप्रकारच्या सेवेनें प्रसन्न झाल्यावर त्या प्रसन्न स्थितींत त्यांना शिष्यानें जन्ममरण-दुःखरूप संसारनिवृत्तीविषयीं प्रश्न केला असतां, तेही कृपेनें उपदेश करितात–ज्या उपदेशापासून होणाऱ्या बोधाचें ऐश्वर्य असें आहे कीं, पुनश्च शिष्याचें अंतःकरणांत संसाराची कल्पना येत नाहीं (१६७).

**श्रीगुरुकृपाफल**–ज्या उपदेशापासून अंतःकरण ब्रह्माप्रमाणें निःसंशय व निर्धास्त होईल ज्यावेळेस–(**१६८**). त्यावेळेस आपणासहवर्तमान, आपणा स्वतःसकट अखंडित सर्व विश्व, सर्व भूतें माझ्या स्वरूपीं म्हणजे माझ्या अखंड स्वरूपाच्या ठिकाणीं पाहशील (**१६९**). ज्ञानप्रकाशानें दिवस उगवेल, **मोहरूपी अंधकार नाहींसा होईल,** तेव्हांच श्रीगुरुकृपा होईल, हे पार्था अगा!! अशा रीतीनें जेव्हां, **श्रीगुरूची** म्हणा का सत्पुरूषाची म्हणा, **कृपा होईल** तेव्हां तुझें अंतःकरणांत ज्ञानाच उदय होऊन मोहरूपी अंधःकार नाहींसा होईल (**१७०**).

**ज्ञानाचें थोर सामर्थ्य** (१७१–१७६). जरी तूं पापाची खाण–पातकाचा, कल्मषाचा आगर–भ्रांतीचा सागर अथवा भ्रमाचा पर्वत जरी असलास तरी–(**१७१**). तरी ज्ञानशक्ति इतकी प्रचंड आहे कीं, तिच्यापुढें पाप वगैरे सर्व तुच्छ आहे–असें चांगलें सामर्थ्य ज्ञानामध्यें आहे–ज्ञानशक्तीपुढें "पापाची खाण वगैरे" हें सर्व तुच्छ आहे, असें ह्या ज्ञानाच्या अंगीं उत्तम सामर्थ्य आहे (**१७२**). विश्व सत्य आहे ह्या विश्वभ्रमा–निराकार श्रेष्ठ–आत्मस्वरूप छाया साच–जगदाभास–विश्वभ्रम–ज्या ज्ञानानें विरून जातो, तेथें मनोमळ कसचे उरणारे–राहणारे–ऐसा म्हणजे, थोरल्या भ्रमासारखा अंधार **परमात्म ज्ञानाच्या उदयाबरोबर** नाहींसा होतो, अव्यक्ताचा एकदेशी लहान कवडसा–(परमात्मव्यापक प्रकाशास पुरेसा होत नाहीं)–ज्ञानप्रकाशानें तो कवडसा नाहींसा होतो (**१७३**).

**मनोमळ अति किडाळ** (१७४). त्या व्यापक प्रकाशापुढें हे मनोमळ, ह्या मनोमळासारखें क्षुद्र असें ह्या जगीं दुसरें कांहींहि नाहीं : अति हिणकट असे ते लगेच नाहींसे होणारे–ज्ञानशक्ति इतकी सामर्थ्यवंत अशी प्रचंड आहे कीं, ह्या जगांत तिच्या तोडीची दुसरी वस्तुच नाहीं :: ह्या ज्ञानापुढें मनांतील अज्ञानाची काय कथा!–म्हणून तुझ्या मनांत ही शंका येणें हेंच बरोबर नाहीं (**१७४**). **प्रदीप्त अग्नि इंधने भारे जाळून टाकतो :: त्याप्रमाणें सर्व कर्में ज्ञानस्वरूप अग्नि भस्म करून टाकतो. प्रळयकाळच्या वावटळीपुढें क्षुद्र ढग तुच्छ होत** (१७५). त्रैलोक्य पेटल्यावर, गगनांत पसरणाऱ्या धुराला पार उडविणारी **प्रळयकाळची** वावटळ जी तिच्यापुढें क्षुद्र ढग तुच्छ होत; आकाशांत धूळ उधळते ती धूळ क्षणार्धांत उडून जाते (**१७५**). **प्रळयाग्नि गवताच्या काड्यांनीं विझेल, दडपला जाईल काय?** –पवनाचा कोप, वाऱ्याच्या साहाय्यानें जो पाणीहि जाळून टाकतो तो प्रळयकाळचा अग्नि काय गवताच्या काड्यांनीं–गवत आणि काष्ठें–विझेल? (**१७६**).

**ज्ञान निरूपम** (१७७–१८३). असें हें विचार करणें असो, तें केव्हांहि नच होणारें–असो! ह्या गोष्टी कधीं घडून येणाऱ्या नाहींत आणि त्यांचा विचार करणें हें **विसंगत** (=असंबद्धता, विरुद्धपणा) दिसतें–ज्ञानाच्या बरोबरीनें तोललें तर पवित्र असें ह्या जगीं ज्ञानावांचून दुसरें कांहींहि नाहीं–ज्ञानाचा जों जों विचार करावा तों तों त्याच्या म्हणजे ज्ञानाच्या योग्यतेची पवित्र वस्तु दुसरी कोणतीहि दिसत नाहीं (**१७७**). ज्ञान हें उत्तम असें आहे : आणिक दुसरें उत्तम नाहीं–एक चैतन्यच :: ज्याप्रमाणें चैतन्य दुसरें नाहीं तें एकच! त्याप्रमाणें ह्या लोकीं ज्ञान हीच एक उत्तम वस्तु असून, त्याच्या कसोटीला दुसरी वस्तु नाहीं (**१७८**). जर महातेजाच्या–सूर्यतेजाच्या, सूर्याच्या कसोटीला, सूर्याच्या कसाला त्याच्या प्रतिबिंबाचें तेज–चोख प्रतिबिंब तेज–लागलें, किंवा जर आकाशाला आपल्या कवळांत कवटाळतां येईल–आकाश कवळिलें असतां कवळतां येईल–(**१७९**).

पृथ्वीच्या बरोबरीची दुसरी वजनदार वस्तु जर सांपडेल–पृथ्वीच्या बरोबरीनें वजनाचें जोडलें जाईल, तरच ज्ञानाची उपमा घडणारी–तरच अर्जुना, ज्ञानासारखी दुसरी वस्तु संभवेल (**१८०**). परोपरीनें पाहिलें तर, पुढतपुढतीं निर्धारानें पाहिलें तर, ज्ञानाची उपमा घडणारी–म्हणून पुष्कळ प्रकारानें वारंवार विचार करून

पाहतां ह्या ज्ञानाचा पवित्रपणा एका ज्ञानालाच आहे (१८१). अमृताची चव निवडितां येत नाहीं, ती अमृतासारखीच म्हटली, तसें ज्ञान ज्ञानासीच उपमिलें का उपमावें होतें :: अमृताची चव कोणी विचारिली असतां ती जशी अमृतासारखी म्हणावी लागेल, तशी ज्ञानाला ज्ञानाचीच उपमा देतां येते (१८२).

**ज्ञान कसें जाणावें हें अर्जुनाचें मनोगत जाणून, ज्ञानभेटीचा उपाय सांगणें करतो** (१८४-१८५). आतां ह्यापेक्षां ज्ञानासंबंधीं जास्त वाटाघाट करणें, आतां यावर आणीक कांहीं बोलणें, तें व्यर्थ वेळ घालविणें होय; कारण इथें बोलणें तें इत्थंभूततेचें झालें असल्याकारणानें असें म्हणणें भाग पडलें जें आपण बोलत आहांत तें यथार्थ होय, तुम्हीं बोलतां तें खरें आहे, असें अर्जुन म्हणत आहे-(१८३). पण तेंच ज्ञान कसें जाणावें असें विचारणें अर्जुनाचें होतें न होतें-तें ज्ञान कोणत्या उपायानें प्राप्त करून घ्यावें असें अर्जुन पुसणार तों-तोच त्याच्या मनांतील भाव ओळखिला, त्याचे मनांतील हेतु देवांनीं जाणला (१८४). देव म्हणूं लागले कीं-त्यांनीं मग अर्जुनास म्हटलें कीं-पार्था, किरिटी, ह्या गोष्टीकडे लक्ष दे. जें कांहीं-आतां ज्ञानाच्या भेटीचा, ज्ञानप्राप्तीचा उपाय तुजला सांगणार आहे (१८५).

**ज्यांत शांति आहे अशी ज्ञानश्रद्धा** पाहिजे (१८६-१९१). विषयांविषयींचा मानमरातब इंद्रियांना मुळींच महत्त्वाचा वाटत नाहीं-आत्मसुखाच्या गोडीनें ज्याचें मन सर्व विषयांविषयीं विटून जातें आणि ज्याच्या ठिकाणीं इंद्रियांची कधींच प्रतिष्ठा नाहीं-(१८६). जो श्रद्धावान मनाच्या चरणीं लागत नाहीं-आपलें दुःख मनाला सांगत बसत नाहीं-(जो मनांत कुढत नाहीं), जो प्रकृतीचें केलेलें गुणांचें होणें होत नाहीं-जो श्रद्धेच्या सेवण्यानें सुखी होऊन आहे :: जो आपली इच्छा आपल्या मनाला कळूं देत नाहीं, जो प्राचीन संस्कारानें उत्पन्न केलेल्या वासना विचारास घेत नाहीं-दाबून टाकतो, आणि जो ज्ञानप्राप्तीच्या श्रद्धेनें संतोष पावतो-(१८७). त्यासच ज्ञान हें हुडकीत येऊन पावतें होतें हें निश्चित!-ज्या ज्ञानिया का ज्ञानाचे ठायीं केव्हांहि सहजच संपूर्ण शांतीच असणारी होते :: त्याच पुरुषास ज्या ज्ञानांत ओतप्रोत शांति भरलेली असते असें ज्ञान शोधीत येऊन निश्चयानें प्राप्त होतें (१८८).

जें ज्ञान मनाच्या ठिकाणीं, हृदयाच्या ठिकाणीं स्थिर झालें म्हणजे प्रतिष्ठा पावणारें का प्रतिष्ठित झालें, म्हणजे मग मनांत शांतीचा अंकुर फुटून-उगवून पुढें आत्मबोधाचा विस्तार होतो (१८९). मग-तो जिकडे पाहील तिकडे-जिकडे पाहावें तिकडे त्याला शांतीच दिसते (देखणी होते देखिली) तेथचा निर्धार अपरंपार, तो सांगतां येत नाहीं-**त्या शांतीचे ठिकाणीं खरोखर आपपर भाव नसतो** (१९०). असा हा उत्तरोत्तर ज्ञानबीजविस्तार अमर्याद, तें कसें तें ऐक :: अशा रीतीनें ज्ञानाविषयींचें जेवढें वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे! तर ती गोष्ट आतां राहूं देत (१९१).

**ज्ञानहीनस्थिति**-ज्ञानहीन जीवितापेक्षां मरणें चांगलें (१९२-१९४). ज्या प्राण्याच्या ठायीं अशा प्रकारच्या ज्ञानाची आवड नाहीं, त्याचें जगणें काय म्हणावें! त्या जिणें काय म्हणावयाचें!! त्यापेक्षां मरण चांगलें (१९२). गृह जसें का ओस, एखादें ओसाड घर, देह चेतन्याशिवाय जसें, प्राणावांचून जसें शरीर, त्याप्रमाणें ज्ञानहीन मनुष्याचें जीवित मोहयुक्त होय, जीवित ज्ञानहीन भ्रांतीच असें-(१९३). अथवा ज्ञान आपलेसें झालेलें नाहीं, परंतु चाड, पर्वा, गरज, इच्छा जरी मनामध्यें असेल तरी तेथें ज्ञानप्राप्तीचा संभव आहे, झरा आहे, जीवन आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं :: खरें ज्ञान प्राप्त झालें नाहीं परंतु तें प्राप्त होण्याची जो मनुष्य इच्छा बाळगतो, त्याला कांहीं ज्ञानप्राप्तीचा संभव आहे (१९४).

ज्ञानप्राप्ति संभवाची कदाचित् नाहीं-गोष्ट ज्ञानासंबंधींची ती मनामध्यें आस्थाहि धरून नाहीं-तर संशयरूप अग्नीमध्येंच पडला म्हणावा = ज्ञान असण्याविषयीं गोष्ट राहिली, परंतु तें प्राप्त व्हावें अशी ज्यास कळकळ नाहीं, तो संशयरूप अग्नींत पडला असें समज (१९५). **अमृत आवडत नाहीं अशी अरुचि**

**तेथें मरणच ओढवलें :: विषयसुख रजानें ज्ञानासीच बेपर्वा असतो, माजतो, तो संशयानें अंगिकारिला, निःसंशय संशयांत पडला, निःसंशय नासला, तो इहलोक तसेंच परलोक-सुखास आंचवला.** अहो अमृतहि नच आवडत आहे, सहजच अरुचि जेव्हां, तेथें मरणच कीं आलें म्हणावें ना! का कीं **अमृतहि आवडत नाहीं** अशी **अरुचि** जेव्हां सहज उत्पन्न होते, तेव्हां त्या मनुष्याचें **मरण ओढवलें** आहे, असें जाणावें (१९६). **विषयसुख रजामुळें ज्ञानासीच माजतो, तो संशयानें अंगिकारिला व्हावा हें निःसंशय.** त्याचप्रमाणें **विषयसुखांतच जो आनंद मानतो** आणि **ज्ञान-प्राप्तीविषयीं बेपर्वा असतो, त्याला संशयानें ग्रासलें** यांत संशय नाहीं (**१९७**).

संशयामध्यें पडला तरी मग निःसंशय नाशला जाण, तो इहपरलोकास मुकला कीं :: अशारीतीनें जो **संशयांत पडला, त्याचा निःसंशय नाश झाला,** असें समज. म्हणून तो **इहलोकाला व परलोकच्या सुखास आंचवला (१९८). संशयी हिताहित जाणत नाहीं-संशय तें घोर पाप-ती प्राण्याला विनाशाची वागुर** (२००–२०१). ज्याला सन्निपात ज्वर झाला आहे त्याला ज्याप्रमाणें शीत उष्ण कळत नाहीं, आणि तो ऊन व चांदणें सारखेंच मानितो :: काळज्वरानें अंग पोळत आहे, शीत उष्ण जाणत नाहीं, ऊन चांदणें सारखेंच मानून असतो–(**१९९**). खरेंखोटें (लटकें), विरुद्ध हितकारक, हित अहित संशयी ओळखीत नाहीं :: त्याचप्रमाणें खरेंखोटें, अनुकूल, प्रतिकूल, हित अहितही संशयी पुरूषाला कळत नाहींत (**२००**).

जात्याच अंध त्यास रात्र का दिवस उमगणारें नव्हें, तसें संशयामध्यें असतांना कांहींहि मुळीं मनामच येत नाहीं–आवडतच नाहीं :: ज्याप्रमाणें जन्मांधास रात्र का दिवस ठाऊक नसतात, त्याप्रमाणें संशयी पुरुषाला कशाचीच ओळख नसते (**२०१**). संशयाहून थोर असें दुसरें घोर पाप नाहीं–प्राण्यास तर हा संशयरूपी वागुरच कीं अंगाभोंवतीं :: म्हणून संशयापेक्षां दुसरें भयंकर पाप कोणतेंच नाहीं. प्राण्याचा नाश करणारें हें एक जाळें आहे (**२०२**). **ज्ञानाच्या अभावानें असणारा हा संशय जिंकावा; कारण हा वाढता झाल्यानें अज्ञानाची गडद पडते, विश्वास मार्ग हरवतो–मोडतो, हृदयीं नच मावून असतो, बुद्धीला ग्रासतो तेव्हां तिन्ही लोक संशयात्मक होतात.** ह्याकरितां तूं त्याचा (संशय) संग सोडून आधीं ह्याला जिंक. ह्याचें वास्तव्य ज्ञानाच्या अभावीं असतें :: वास्तव तुवां संशय त्यजावा, पहिल्या प्रथम हाच जिंकावा, जो का ज्ञानाच्या अभावामध्यें–चैतन्यतत्त्वशून्यतेमध्यें असतो (**१०३**).

**संशयानें विश्वाचा – विश्वासाचा नाश** (२०४–२०५). अज्ञानाचें गडद पडतें, तेव्हां हा मनामध्यें पुष्कळसा वाढतो म्हणूनच विश्वासाचा मार्ग मोडतो :: जेव्हां अज्ञानाचा निबिड काळोख असतो तेव्हां हा संशय मनांत जास्त वाढतो. म्हणून श्रद्धेचा मार्ग सर्वथा नाहींसा होतो (**२०४**). हृदयामध्यें हा वाढला असतां मावत नाहीं, बुद्धीला गांठतो, तेथें मग लोकत्रय (तिन्ही लोक) संशयात्मक होतें :: हा अंतःकरणांत भरून राहतो असें नाहीं, तर हा बुद्धिलाहि ग्रासून टाकतो–तेव्हां आणि मग त्या मनुष्याला तिन्ही लोक संशयात्मक दिसूं लागतात (**२०५**).

**ज्ञानखड्गानें संशयनाश** (२०६–२०७). **हृदयस्थ संशयाचा नाश करून लवकर ऊठ, निष्काम कर्मयोग आचर** (२०८). पण इतका जरी तो वाढला तरी त्याला स्वाधीन करून घेण्याला एक उपाय आहे–तीव्र ज्ञानखड्ग जर हातीं असेल तर त्या तिखट शस्त्राच्या योगानें हा सर्व नाहींसा होतो, आणि मग त्याचा मनांतून समूळ नाश होतो :: असला तो संशय थोरावला तरी एका उपायानें स्वाधीनतेचा होऊन पराजित होईल जर का ज्ञानरूपी बरवें असें खड्ग हातीं आहे तर हा संपूर्ण नाहींसा होतो–मानसींचा समग्र शोक, दुःख, खत, ओरखडा निःशेष नाहींसा होतो (**२०६–२०७**). म्हणून हे पार्था

वेगावरतीं ऊठ, हृदयस्थ संशयाचा नाश करून आवेशानें तयार हो स्वधर्मरूपी युद्धास–निष्काम कर्मयोग आचर :: म्हणून पार्था, आपल्या मनांतील संशय नाहींसा करून लवकर ऊठ **(२०८).**

**श्रीकृष्ण कृपावंत होऊन म्हणाले, आतां अर्जुन पूर्वापार कथेच्या संगतीसंबंधानें समयोचित प्रश्न करील ते मराठे बोल, महत्त्व, श्रवणफल** (२०९–२२४). संजय धृतराष्ट्र राजास म्हणतो–राजा ऐक,–ज्ञानी जनांचे जे ज्ञानदीप भगवान् श्रीकृष्ण ते अशारीतीनें मोठ्या कृपेनें अर्जुनास म्हणाले :: सर्वज्ञांचा बाप जो श्रीकृष्ण, कृपावंत होऊन अर्जुनास म्हणत आहे–**(२०९).** पूर्वापार बोलण्यासंबंधीं विचारून–विचार पुढें घेऊन–अर्जुन समयोचित प्रश्न करील तें पुढें म्हटलें होणारें आहे :: तेव्हां ह्या पूर्वापार कथेचा विचार करून तो अर्जुन समयोचित असा प्रश्न करील **(२१०). मेळ बसणें, द्रव्यवैपुल्य, प्राप्ती, उत्कर्ष, रसगोडी, प्रेम–भक्तिभावदर्शन, संत, संपत्ति, योगस्थिति, स्वरूपदर्शन, रस, योग्यता, गोडी, निषाणध्वनि यांसंबंधीं पुढें बोलणें होणारें**–त्या कथेची **जुळणी अभिप्रायाची शोभा** व **रसाची गोडी** पुढें सांगण्यांत येईल :: संवादाचा पूर्वापार.संबंध लावून, भक्ति-भावरूपदर्शन रस योग्यता गोडीसंबंधीं पुढें बोलणें होणारें आहे **(२११).** ज्याच्या **बोलाच्या चांगले-पणावरून आठहि रस ओंवाळून टाकावेत** आणि जो **सज्जनांच्या बुद्धीला ह्या जगामध्यें विश्रांतीचें स्थान होय** :: ज्याच्या सौंदर्यावरून आठहि रस ओंवाळून टाकावेत, सज्जनचातुर्याला ह्या जगीं विसांवा कीं–**(२१२).**

ज्या **मराठी बोलापासून शांतरसच प्रगटेल** व **जो समुद्रापेक्षां गंभीर** असून **अर्थभरित** आहे, तो बोल ऐका :: तो **विकाररहित शांत** प्रकाशेल-तें मराठी बोल समुद्राहूनहि नितांत एकांततेचे ते परिसा **(२१३).** जसें सूर्यबिंब हें बचकेंत मावण्याएवढेंच दिसतें, परंतु त्याचे **प्रकाशाला त्रिभुवनसुद्धां पुरत नाहीं**–तशी या **शब्दार्थाची व्याप्ती** आहे असें **(अनुभवा)** अनुभवावें :: बचकेंत मावेल असें **सूर्यबिंब प्रकाश** पाहिला असतां **त्रैलोक्यहि पण अगदींच लहान,** तशी **शब्दाची व्याप्ति** अनुभवाची–ती अनुभवानें **खात्री करून घ्यावी (२१४).** किंवा **कल्पवृक्ष जसा कामी जनांच्या इच्छा पूर्ण करतो,** तसे ते बोल सर्व इच्छा पूर्ण करणारे आहेत म्हणून **ह्याच्याकडे लक्ष पुरवावें** :: प्रेम करणाऱ्यांच्या इच्छा तेथें कल्पवृक्ष फळें देणारा, तसे बोल बोलास व्यापक व्हावेत असें वाटत असेल तर लक्ष द्यावे **(२१५).**

**श्रोते** हो, तुम्हांला आणखी काय सांगावें, **तुम्हीं जाणतेच आहांत,** तेव्हां नीट **लक्ष द्यावें,** एवढीच माझी **विनंती आहे : असें हें** असो, स्वभावेंकरूनच सर्वज्ञ ते जाणणें जाणतातच, हितच होईल असें इथें चित्त देण्याचें करावें, अशी आपणांस माझी विनंती आहे **(२१६).** ज्याप्रमाणें एखादी सुंदर **स्त्री** सुंदर, गुणी व **कुलशीलवती** असून **पतिव्रता** असते, त्याप्रमाणें या **बोलण्याच्या पद्धतीवरून** या **बोलामध्यें सर्व अलंकार व शांति** हीं स्पष्ट दिसतील :: सामग्री शांति अंगीं वाहून आहे, सौदर्यवान् पतिप्राणा बोलण्याची योग्यता अंगीं बाणून आहे, साहित्य शांति बोलती कवित्व रचना कुलवान् पतिव्रता जशी–**(२१७). अगोदर साखरेची आवड** असून ती जर **औषधाच्या अनुपानांत दिली** तर ती आनंदानें **वरचेवर कां न खावी?** अगोदर **साखर आवडतसे** ती औषधासाठीं योजिली तरी **वारंवार सेवन करावी कां न? (२१८).**

साहजिकपणें मलयगिरी पर्वतावरील **सुगंध व मंद** असा **वारा** वाहत असून त्याला जर **अमृताची गोडी आली** आणि दैवयोगानें तिथें जर **पंचमसुरासारखा नाद कानीं आला** :: स्वाभाविकपणें मलय पर्वतावरील धीमा वारा त्यास अमृतासारखा सुगंध–स्वादु होत आहे, तेथेंच दैववशात् स्वर लाभाचा

झाला–जोडला गेला (स्वाभाविकपणेंच मलय पर्वतावरील धीमा सुगंध–मंद वारा वाहत असून, त्याला जर अमृतासारखा स्वादु होत आहे–अमृताची गोडी आली–तेथेंच दैववशात् मधुर पंचमसुरासारखा नाद, ध्वनी, स्वर, शब्द लाभाचा झाला–कानीं आला–(२१९). तर त्या वाऱ्याच्या स्पर्शानें–प्राणानें सर्व अंग निववील–गोडीनें जिव्हेला समाधान होईल–स्वादानें जिव्हा सरस्वतीस नाचवील–मधुर सुर ऐकल्यावर कान वाहवा म्हणतील–वेदच जणूं बोलते झाले असे!–(२२०). तसें ह्या कथेचें ऐकणें तें कर्णेंद्रियांस पारणेंच होत आहे–कानांचें पारणें फिटलें–कर्णेंद्रिय तृप्त होत आहे–संसारजनित दुःख विकाराशिवाय आपोआप नाहींसें होईल (२२१).

साऱ्या मंत्रानें वैरी मरत आहे, तर मग कशास ती कटारें बांधण्याचीं करावींत?–रोग दुधसाखरेनें गेला, मग निंब पिण्याचा तो कशास?–(२२२). मनास मार देणें नच करतां, इंद्रियांना दुःख नच देतां, येथेंच श्रवणामध्येंच कीं आयता मोक्ष आहे (२२३). असेल तितक्या समाधानानें कल्याणकारक असा हा चांगला गीतार्थ श्रीनिवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात, ऐकावा (२२४).

॥ हरिः ॐ तत्सत् ॥

---

टीप : (ओंवी नंबर १२५)—**दैवास्तव देहाचें पाळण। ऐसा निश्चय परिपूर्ण। जो चिंतीना देहभरण। तो महायोगी जाण दैवयोगें ॥ १२५ ॥** दैवास्तव, दैवाकरिताच कीं–दैवगत्याच हा देह प्राप्त झालेला–जो देहाचें पालनपोषण–देहभरण–चिंताग्रस्ततेचें करीत नाहीं तो दैवयोगेंकरून महायोगी होय. **म्हणोनि केवळ देहभरण। ते जाणें उघडी नागवण। यालागीं येथ अंतःकरण। देयावें ना ॥ २०९–अ. ३ ॥** आतां एकंदर ओंविया नंबर २२५ होय.

॥ श्रीगणेशायनमः ॥



प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ।
ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥

॥ हरिः ॐ । श्रीगणेशायनमः । श्रीगोपीजनवल्लभायनमः ॥

# श्रीज्ञानेश्वरी-सुबोधिनी

## अध्याय चवथा

## कर्मब्रह्मार्पणयोग

आजि श्रवणेंद्रियां पिकलें । जें येणें गीतानिधान देखिलें ।
आतां स्वप्नचि हें तुकलें । सांचा सारिखें ॥ १ ॥

आधीचि विवेकाची गोष्टि । वरि प्रतिपादी कृष्ण जगजेठी ।
आणि भक्तराज किरीटी । परिसत असे ॥ २ ॥

जैसा पंचम आलाप सुगंध । किं परिमळ आणि सुस्वाद ।
भला जाला विनोद । कथेचा ईये ॥ ३ ॥

कैसी आगळिक दैवांची । जे गंगा जोडली अमृताची ।
हो कां जें तपें श्रोतयांचीं । फळा आलीं ॥ ४ ॥

आतां इंद्रियजात आघवें । तिहीं श्रवणाचें घर रिघावें ।
मग संवादसुख भोगावें । गीतारहस्य ॥ ५ ॥

आजि–आजी. पिकलें–पाहलें, दिवस उगवला, उजेडलें, भाग्याचा उदय होऊन आहे : गीतानिधान = गीतारूपी ठेवा : तुकलें = सारखें झालें, डोलवलें, तोललें, मोजलें, मापलें, समतोल झालें, दिव्यदृष्टीनें अनुमान केलें गेलें; वजन, योग्यता, बरोबरी, वस्तु हातांत घेऊन वजनाच्या अंदाजानें तोलणें, तुकणें, तुलना करणें : (तुलना–मनोनिग्रह व योग या परस्परांची तुलना करूं नये : कारण मन अस्थिर कीं योगभ्रष्ट : पण योगानेंच मनोनिग्रह साधतो ना?) तुल्य झालें, बरोबरीला आलें. सांचा सारिखें–सांचा सरिसे : सरिस = तात्काळ सज्ज, बरोबर, समान, सिद्ध, योग्य, सारखें, ऐक्याच्या अर्थीं : एकमेका पुढें[1] :: सारिखें = तुल्य, अनुरूप,

---

[1] नवांची खाणी दहाव्याने शोखिली । अकराव्यानें जाली देशधडी ॥ १ ॥ तें ब्रह्मपंथीं माखलें ब्रह्मपंथीं माखलें । मरोनी जागृत जाले मन गे माये ॥ २ ॥ अवघें अंबर माझें तिंबलें । ब्रह्मरसें पिळिलें वो रंग नव्हे ॥ ३ ॥ सारवियोगें माझें कर्म बुडालें । निष्कर्म जालें म्हणोनी नातळे ॥ ४ ॥ जागृति स्वप्न बुडाली । रखुमादेविवरें सहित गिळिली ॥ ५ ॥

बरोबरीचें, एकाच प्रकारचें : : सांचा = ठसा ( लटकिया अक्षराचे साचे ११-२०८ ) (१). विवेक = सारासार विचार, वाटाघाट, भेद, एकांत, ( विवेकविश्रांत = अविचारी ). विवेकिन् = तत्त्ववेत्ता : गोष्टि-गोठी : कृष्ण-श्रीकृष्ण : भक्तराज = भक्त = निष्ठावंत, उपासक, तल्लीन ( भक्तियोग = उपासना ), राज = श्रेष्ठार्थी, जसें रत्नराज : परिसणें = ( विवेकप्रतिपादन सिद्ध करणें, आरंभ देणें तें ऐकण्यास भक्तराज बसले आहेत. ) परिस = १. लोखंडाचें सोनें करणारा दगड; २. ऐक; ३. स्पर्श करणें = ऐकणें, विस्तार करणें, कळणें व पढणें असें सांगणें (परिसणयाच्या राया = ऐकणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ) (२). पंचम आलाप[२] (आलापनं, आलापः इति अन्योन्य संबोधनपूर्वक भाषणस्य ) = सप्तस्वरांपैकीं पांचवा, कोकिळेचा स्वर. कि-की. परिमळ[३] = १. सुगंध; २. मैथुन; ३. संभोग; ४. विद्वत्सभा; ५. सुगंधी पदार्थ : जाला-जाहला : विनोद = आनंद, क्रीडा, कौतुहल, शोकपरिहार, श्रम घालविणें, श्रमपरिहार, मनोरंजन : : ईये-इये. सुस्वाद ( सु = सुंदर, चांगलें, पूज्य, योग्य रीतीनें, खुषीनें; स्वाद = चव, गोडी, आवड. स्वादनं = सुखविणें ). कथा = गोष्ट, उल्लेख, संभाषण, हकीकत ( कथानक = छोटी लहान गोष्ट ) (३). आगळिक = ( दैवाची = स्वर्गीयतेची, पूज्य, सत्त्व-गुणविशिष्ट, प्रारब्ध ) अपूर्वता, थोरवी आगळा, अधिक प्रताप, वरचढपणा, -पेक्षां अधिक चांगला. गंगा = गंगानदी. (गंगाधर = १. समुद्र; २. शंकर). जोडली-जोडिली. अमृताची-अमृताचि = अमृत[४] = देवलोकचें पेय-अजरामर करणारें, चौदावें रत्न, कृपामृत, अमर करणारें : : श्रोतयांचीं तपें = श्रोतृ, ऐकणारा, शिष्य. तपें = ( तप = तपश्चर्या ) अनेक तपें ( तप = ज्येष्ठ मास, ग्रीष्म ऋतु, सूर्य, उष्णता ). ( परंतप = त्रास देणें ). [ श्रोत्रिय = वेदवेत्ता ब्राह्मण. श्रोतस् = कान, तोंड, इंद्रिय, प्रवाह. श्रोत = कान, वेद, वेदपारंगतता. श्रौत = वेदसंबंधीं, यज्ञसंबंधीं, अग्निहोत्र : श्रौत्र = कानासंबंधीं, वेदपारंगतता. ] हो कां जें = अहो ! काय म्हणून बरें ! कशाकरितां, प्रश्नार्थक, उदाहरणार्थ, म्हणजे जणूं काय, कारण, कां बरें, मग कां बरें. तपें फळा आलीं = फळ-भार घेऊन आलीं आहेत; शब्द उगवत आहेत; योग योगास येत आहे, (१०-जे बोलणयाच्या रानीं हिंडता। नाइकिजे फळलेया अक्षराची वार्ता। ते वाचा केली कल्पलता। विवेकाची ॥ ) ( फळ = देणगी, ढाल, पातें, सारिपट, लाभ, पीक, फायदा, संतति, प्रतिबिंब, स्त्रीरज, रुंद इत्यादि फळाफळी ). विशिष्ट प्रकारचें कष्टसाध्य **पुण्याचरण** म्हणजे **तप** ( तपणें, तापणें; शरीर व मन शुद्ध करण्याकरितां किंवा देवदेवता प्रसन्न करण्यासाठीं ध्यान, मनन, शरीरकष्टादि करणें जें-पुण्याचरण : ) अध्यात्मदर्शन होत आहे जे-ते फळच कीं. पुण्यदर्शन = प्रिय सुंदर : : पुण्य घडण्यानें भाग्योदय होणारा, संतदर्शन होणारें, सन्मुखतेचें होणें जें, संतचरणांचें पावणें जें इत्यादि (४). इंद्रियजात-इंद्रियजात [ इंद्रिय = ज्ञानाचें किंवा कर्माचें साधन ( इंद्रिय-आयात = शरीर. इंद्रिय-आराम = विषयासक्त. इंद्रियग्राम = इंद्रियसमुदाय. ) जात = कारणभूत, प्रशस्त. ] आघवे-अवघे = सर्व : श्रवणाचे = [ श्रवण = कान, एक नक्षत्र, ऐकणें, अभ्यास, कीर्ति ( श्रवणगोचर, श्रवणपथ, श्रवणविषय = ऐकण्याचा टप्पा, ऐकण्याचा विषय ) ]. घर = गृह, घर, पत्नि-( श्रवण-अभ्यास = गृहस्थाश्रम, नांव, कुटुंब, समासांत पाळिव "गृहशकुंतिका"-) गृहजन = पत्नी : गृहपति = यज्ञ करणारा; गृहस्थाश्रमी : : संवाद = संभाषण, चर्चा, मेळ, बातमी. सुख = आनंद, आरोग्यसुख, कल्याण, आराम, स्वर्ग : : भोगावें = उपभोग घ्यावा, सोसावें,

[२] पंचम : कंठेभ्यश्चोत्थिताः निनादं नर्दंति गजाः। ऋषभं गावः। गांधारं अजादयः। षड्जं मयूराः। मध्यमम् क्रौंचा। धैवतमश्वाः। पंचमं कोकिला इति। इत्यमीतन्त्रीभ्यः कंठेभ्यश्चोत्थिताः।

[३] परिमळ : विमर्देत्थ संघर्षणादिनोत्पन्न जनमनोहर गंध परिमळ इति।

[४] अमृत : पीयूषम्, अमृतम्, सुधा इति ३ अमृतस्य। मुक्ति, कैवल्यम्, निर्वाणम् श्रेयः, निःश्रेयसम्, अमृतम्, मोक्ष, अपवर्ग इति ८ मोक्षस्य। अपः, वाः, वारि, सलिलम्, कमलम्, जलम्, पयः; किलालम्, अमृतम्, इत्यादि इत्यादि २७ जलस्य। यज्ञशेषे पुरोडाशाद्दौ अमृतम् इति। अयाचिते अमृतम् इति। प्रत्यहं याचिते मृतम् इति। अमृतम् तु घृते, पियूषे, यज्ञशेषे च ॥

अनुभवावें, खाणें, भोग [सुख (स्त्री.), वरुणपुरी]. गीतारहस्य–गीताख्य हें : आख्य = सांगणारा : : गीता = गाईलेलें : : रहस्य = गुप्त गोष्ट, गूढ, वर्म, उपनिषत्, एकांत [गृहअक्ष = झरोका : : गृहपालिन् = पहारेकरी : गृहआगत = पाहुणा : गृहआराम = घराजवळील बाग : : गृहउत्पात = घूस, उंदीर] (५).

आज श्रवणेंद्रिय पिकलें आहे, जें का ह्या ´इंद्रियानें–श्रवणानें आज गीतेचा ठेवा देखिला देखणेपणें–देखणेपणानें पाहिला आहे व आतां हें स्वप्रच जसें–खरेंपणच एक सर्व तेथें ब्रह्माच्या बरोबरीनें तोललें–तोलून घेतलें आहे–असेंच तोललें जात आहे–ब्रह्मच सुखास आलें आहे. (१)

[**अभंग** :— या पिकलिया अमृताची गोडी केवी जाणती इतर जन । वाचा बोलिजे सेविता निवे प्राणु गे माये ॥ १ ॥ सुखाचा साचा केविं बोलिजे । जिवाते कैंविं सुईजे ॥ २ ॥ अमृतकराचे रश्मि चकोर सेविती । तें सुख कोण कैसें बोलिजे रया ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठलु भेटलिया । ते सुख कोण कैसे सांगिजे रया ॥ ४ ॥

**कृतार्थ झालेले पुरुषच आत्मानंदाचा उपभोग घेतील–तो भोग शब्दानें सांगतां येणार नाहीं व सामान्य जीवास कळावयाचाहि नाहीं**–मुमुक्षु-अवस्थेंत श्रवणमननाच्या अभ्यास-कालीं चिदात्मानंदाचा अनुभव–असंभावनादिकांनीं प्रतिबद्ध असतो म्हणून त्यास कच्चा आनंदानुभव आहे असें म्हटलें, तर असंभावनादि सर्व निवृत्त होऊन अप्रतिबद्ध आत्मानंदानुभव आला म्हणजे त्यास पिकलेला अनुभव असें म्हणण्यास हरकत नाहीं–त्या पिकलेल्या अमृताची म्हणजे आत्मानंदाची गोडी इतर जीव कसे जाणतील? जाणणार नाहींत–पण श्रीगुरुमुखांतून उपदेश श्रवण केल्याबरोबर, प्राण म्हणजे जीव, संसारतापांतून शांत होतो : अशा सत्य परमानंदाची गोष्ट अनधिकाऱ्यास सांगणारा सांगेल कसा? आणि त्या अनधिकारी जीवास तो समजून देतां तरी कसा येईल? चंद्राच्या चांदण्यांतून चंद्रामृताचा अनुभव चकोर घेतात, त्यावेळीं त्यांना जो आनंद होतो, तो शब्दानें कोण सांगेल? कोणासही सांगतां येणार नाहीं. रखुमादेवीचा स्वामी श्रीविठ्ठल याचें पारमार्थिक स्वरूपाचें दर्शन जर भाग्यानें कोणास झालें, तर तें सुख तोच जाणेल! दुसरा कोण वर्णन करील?

तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैती भक्ति आहे ।
जे अनुभवाचि जोगे नोहे । बोला ऐसे ॥ १८–११५२ ॥]

मुळांतच अहो ही विवेकाची गोष्ट! जीवित-सौंदर्याची ती–अशी ही रम्य कथाच! याहीवर जगाच्याहि जगापेक्षां ज्येष्ठ श्रेष्ठ असे स्वतः भगवान् श्रीकृष्णच कीं त्यासंबंधीं बोलण्या–प्रतिपादण्याचें करीत आहेत, आणि भक्तश्रेष्ठ अर्जुन (किरीटी) तें परिसण्याचें, ऐकण्याचें करीत आहे : हे असें अहो! आतां परमभाग्य उदेलें आहे कीं–. (२)

जसा सप्त स्वरांपैकीं पंचम कोकिलास्वर आलाप सुगंधतेचा झाला, वर परिमळ सुगंध दरवळलेला आहे, तेथें स्वादासच कीं तो सुगंध आला आहे, अशी ती रम्यकथा जेथ सुगंधतेची गोष्ट पुण्यच पाहत आहे, असा भलाच कीं एक विनोदच होऊन आहे–ह्या कथा–गोष्टीसंबंधींचा–. (३)

दैवी आगळी अशीच एक कागाळी आगळिकतेची : जेथ दैवाची–स्वर्गाची–ती विशेष गोष्ट बोलिली जावी. अहो येथें तर अमृताची नदीच कीं, गंगा ती साधली, मिळाली, भेटली आहे जसें का आतां श्रोत्यांचीं अनेक जन्मांचीं जपेंतपें–तपाचींहि तपें फळभार घेऊन आलीं आहेत. (४)

तत्काल आतां सर्वेच्या सर्व इंद्रियजातानीं, इंद्रियांनीं तर ह्या स्वादास आलेल्या–पिकलेल्या–श्रवणाच्या घरींच रिगावा करून असावें; तरच मग हे संवादसुख, गीतारहस्याचें तें–श्रीकृष्णार्जुनाचें तें–परस्पर प्रश्नोत्तर-रूप भाषणाचें सुख अनुभवण्याचें–उपभोगण्याचें होईल–. (५)

**हा अतिशय अतिप्रसंगें । सांडुनि कथा ते सांगे ।**
**जे श्रीकृष्णार्जुन दोघे । बोलत होते ॥ ६ ॥**

**ते व्हेळीं संजय रायातें म्हणे । अर्जुन अधिष्ठिला दैवगुणें ।**
**जे अतिप्रीति श्रीनारायणें । बोलिजत असे ॥ ७ ॥**

**जें न सांगेचि पित्या वसुदेवासि । जें न सांगे माते देवकिसी ।**
**जें न सांगेचि बंधु बळिभद्रासि । तें गुह्य अर्जुनासि बोलत ॥ ८ ॥**

**देवी लक्ष्मी येवढी जवळिक । परि न देखे या प्रेमाचें सुख ।**
**आजि श्रीकृष्णप्रेमाचें बिक (सुख) । यातेंचि आथी ॥ ९ ॥**

**सनकादिकांचिया आशा । वाढिनलिया कीर बहुवसा ।**
**परि त्याहि येणें मानें यशा । येतीचि ना ॥ १० ॥**

हा अतिशय-हा अतिसो = पाल्हाळ, अतिशय : अति प्रसंगें-अतिप्रसंगें = असामान्य समय, संगति, नाद, आसक्ति, (ताबेदार जसा) अनुराग, निष्ठा. सांडूनि-सांडुनि : : कथा ते-कथाचि ते : श्रीकृष्णार्जुन-कृष्णार्जुन, (दोघे : :) (६). ते व्हेळीं-ते वेळीं : संजय-संजयो : दैवगुणें अधिष्ठिला = दैव गुणें-दैवगुणें : = दैवी संपत्तीच्या गुणांनीं का थोर भाग्यानें युक्त. अतिप्रीति = सुख, आनंद, कृपा, प्रसन्नता, प्रेम, आवड, स्नेह, उत्कट इच्छा, तृप्ति, संतोष (७). अर्जुनासि-अर्जुनेसी : : वसुदेव = (पिता) यदुवंशीय शूर राजाचा पुत्र, श्रीकृष्णपिता. देवकिमाता = देवक राजाची कन्या, कृष्णमाता, वसुदेवपत्नि. बंधु बळिभद्र : (बल, बलभद्र, बलराम इत्यादि = वसुदेवपुत्र) बळराम, कृष्णाहून थोरला. हा शेषावतार होता. गदायुद्धांत निष्णात होता. याचे भीम व दुर्योधन हे शिष्य होते. नांगर व मुसळ हीं याचीं शस्त्रें. यांवरून यास हलायुध, मुसली इत्यादी नांवें आहेत-हा उदार, सरळ, न्यायी पण अति रागीट होता, व अक्षविद्या व मद्य हीं यास फार प्रिय होती. गुह्य = एकांताचें, रहस्य, गुप्त गोष्ट (८). देवी लक्ष्मी = संपत्ति-१४ रत्नांपैकीं[५] पहिलें रत्न. येवढी जवळिक = इतकी सन्निध राहणारी. परि न देखे-तेही न देखे : प्रेमाचें सुख = मधुर, आनंद, सहज. श्रीकृष्ण-प्रेमाचें बिक (सुख) = बिक = सामर्थ्य, बल. आथी = आहे (९). वाढिनलिया-वाढीनल्या : : कीर बहुवसा = अतिशयच, निश्चयत्वेंकरून. त्याहि येणें मानें येशा-यशा येतीच्चि ना = याप्रमाणें (येणें मानें) आशा त्याच्या यशास येईनात (१०).

अतिप्रसंगाचा-असामान्यतेचा-अतिशय पाल्हाळ तो सांडून, संजय ती कथा सांगत आहे-जें कांहीं श्रीकृष्ण व अर्जुन असे दोघे बोलत होते ...... (६)

त्यावेळीं संजय, राजा धृतराष्ट्रास म्हणत आहे कीं-अहो, आज अर्जुन दैवगुणानें अधिष्ठिला आहे-कारण काय तर तो मोठ्याहूनहि मोठ्या प्रीतीस येऊन आहे. ते जे का श्रीनारायण भगवान् श्रीकृष्ण त्यांनीं आज वाक्यविस्तार-रचना कथा सांगण्या-बोलण्याचें होत आहे. (७)

जें, पिता जो वासुदेव त्यासही सांगण्या-बोलण्याचें करीत नाहीं, जें का माता देवकी जी तिजलाही पण नच सांगण्याचें होत आहे, जें का बंधु बळिभद्र त्यालाहि नच सांगण्यासारखें झालें आहे, तें गुह्य, अर्जुनाशीं बोलण्या-चालण्याचें करीत आहे-अर्जुनातेंच सांगत-बोलत आहे. (८)

[५] चतुर्दशरत्नानि : १. लक्ष्मी, २. कौस्तुभ, ३. पारिजातम्, ४. सुरा, ५. धन्वंतरि, ६. चंद्र, ७. कामधेनु, ८. ऐरावत, ९. अप्सरा, १०. उच्चैःश्रवस्, ११. हालाहल, १२. शार्ङ्गधनु, १३. शंख व १४. अमृत हीं क्षीरसमुद्रांतून काढलेलीं रत्नें.

अहो, देवी जी लक्ष्मी श्री, ती तर नेहमींच्या नेहमींच येवढ्या केवढ्या तरी जवळपणाच्या–जवळिकेच्या–अशी तरी, हीपण तें कांहीं ह्या प्रेमाचें–ह्या प्रीतीचें सुख देखणेपणानें देखत–पाहत–नाहीं. आज तर अहो, भगवान् श्रीकृष्णाच्या जवळिकतेच्या प्रेमाचें बिक–बल, सामर्थ्य ह्या अर्जुनासच प्रेमाच्या जवळच्या योग्यतेचें असें झालें आहे. (९)

सनक, सनंदन, सनत्कुमार, ह्यांच्या आशा वाढलेल्या फोंफावलेल्या अशा–आम्हींच कायते देवाच्या प्रीतीचे, प्रेमाच्या अशा निश्चयत्वें अतिशयतेच्या बहुवसतेचा–पण त्यांनाही कांहीं येथें यशास येणें, प्रेमाचें होणें, भगवंताच्या प्रेमाच्या जवळिकतेचें होणें हें साधलें नाहीं–त्यांच्या प्रेमाच्याहि दैवास तें आलें नाहीं–त्यांच्या आशांना भगवंताच्या गुणांनीं यश, श्री, औदार्य, इत्यादींचे यशाचे का जयाचे अंकुर आले नाहींत. (१०)

**या श्रीजगदीश्वराचें प्रेम । येथ दिसतसे निरुपम ।**
**कैसें पार्थें येणें सर्वोत्तम । पुण्य केलें ॥ ११ ॥**
**हो कां जयाचिया प्रीति । अमूर्त हा आला व्यक्ति ।**
**मग एकमेकियाचिये स्थिति । आवडतसे ॥ १२ ॥**
**ये-हवि हा योगियां नाडळे । वेदार्थासि नाकळे ।**
**जेथ ध्यानाचेहि डोळे । पावती ना ॥ १३ ॥**
**तें हा निजस्वरूप । अनादि निष्कंप ।**
**परि कवणें मानें सकृप । जाला आहे ॥ १४ ॥**
**हे त्रैलोक्यपदाची घडी । आकाराची पैलथडी ।**
**कैसा याचिये आवडी । अवतरला असे ॥ १५ ॥**

श्रीजगदीश्वर = ( जगत्+ईश्वर ) जगन्नाथ, जगदीशचंद्र, जगदीश :: येथ–एथ : निरुपम = अद्वितीय, ज्याला उपमा नाहीं असें. सर्वोत्तम पुण्य = सर्व प्रकारांनीं पुण्य उत्तमतेस आलेलें तेथें पुण्य करण्याच्या रीती मुळींच शिल्लक ठेविलेल्या नाहींत (११). अमूर्त हा आला व्यक्ति = अज देहधारी नच तो देहधारीपणानें व्यक्तीचा झाला आहे–मग एकमेकियाचिये स्थिति–मज एकवंकी याची स्थिति = एकमेक ऐक्य स्थिति एक-रूपतेची झालेली ती अवस्था. आवडतसे–आवडत असे = ( एकरूप ) वाटत आहे (१२). नाडळे = आढळत–भेटत नाहीं. नाकळे = समजत नाहीं, आकळत नाहीं, आवरत नाहीं (१३). निजस्वरूप–निजरूप = नित्य ब्रह्मरूप स्वरूप. अनादि निष्कंप = आदि नाहीं ज्यास असा अनादि निश्चल. कवणें मानें सकृप झाला–जाला–जाहला आहे = किती तरी कृपायुक्त झाला आहे (१४). हे–हा : त्रैलोक्यपदाची–पटाची घडी = त्रैलोक्य पाऊल, पद, वस्त्र, उगमस्थान. आकाराची पैलथडी = आकाराचें पैलतीर. कैसा याचिये आवडी अवतरला असे = आपल्याच आवडीवर स्वाधीन झाला आहे जसा (१५)

अहो, ह्या जगदीश्वराचें–जगत्+ईश्वराचें प्रेम–येथें ह्या अर्जुनामध्यें अति निरुपमतेचें, ज्यास उपमा नाहीं असें–येथें सर्व उपमांना उल्लंघिलें जसें, अशा निरुपमतेच्या कोटीस येऊन आहे, अहो, कसें तें ह्या पार्थानें सर्वांहिपेक्षां अनुत्तम–उत्तम–पुण्य केलें–( पुण्योगंधः पृथिव्यांच )–त्याचें असणें हें दशयोजन फांकत आहे सुगंधत्वानें...... (११)

असेंही म्हणणें रास्तच कीं अहो, ज्याच्या प्रीतीस्तव अमूर्त[६] म्हणजे अव्यक्त, आत्मस्वरूप आत्मसुख-युक्ताचे विदेही परमात्मा तरी हा व्यक्तीस आला आहे–मला तर ह्याची एकवंकी एकाकार स्थिति, अथवा एकवटलेली स्थिति[७] आवडत आहे–आल्हाद देत आहे. (१२)

---

[६]अमूर्तपण = अव्यक्त भाव. मूर्त = व्यक्त, सगुण, दिसणारा. मूर्ती = सगुणरूपाच्या आश्रयानें (मूर्तिचेनि मेळे).

[७]संस्था, मर्यादा, धारणा, स्थिति ४ न्याय्यमार्ग स्थितेः । आस्या, आसन, स्थिति इति ३ आसनस्य ।

येन्हवीं पाहिलें असतां हा योगियांना केव्हांहि आढळत नाहीं–वेदार्थासही कळत नाहीं, नाकळे–ज्या आकळण्यामध्यें तर त्या वेदार्थाचे ठायीं ध्यानाचे ते डोळे तर केव्हांहि पोहोंचणारे–पावणारे होतच नाहींत कीं...... (१३)

असा तो निजस्वरूप[८] नित्यरूप हा अनादि[९] असा म्हणजे जन्मरहित निष्कंप अचल[१०] असा, अहो कोण जाणे, काय जाणो कीं येथें आतां हा तर अहो मोठ्याच मोठ्या मान्यतेच्या महत्त्वाचा होऊन दयाळू-पणास[११] आला आहे–सकृप म्हणजे दयाळू झाला आहे–जाहला आहे. (१४)

हा परमात्मा त्रैलोक्यरूपी पटाची[१२], वस्त्राची घडीच एक केलेला, घडीचा झालेला, आकाराच्या तर परतीरावर असलेला–पलीकडच्या कांठचा–पैलथडीचा–अहो कसा काय हा या पार्थाच्या आवडीमुळें आवडीवरच कीं आवरला, आकळला, अवतरला–स्वाधीन झाला आहे पाहा–(१५)

**श्रीभगवानुवाच—**

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।**
**विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥**

[ विवस्वान्[१३] = सूर्य (भास्वान्, विवस्वान्, सप्ताश्व, हरिदश्व इत्यादी सूर्याच्या ३७ नांवांपैकी). मनु[१४] = मनु (मन) राजा एक देहपुरी। असे नांदतु त्यासी दोघी नारी। (तुका० वासुदेव). इक्ष्वाकु = (इक्ष्वाकु कटुतुम्बी = दुध्या कडु भोपळा). ]

**अन्वय :** अहम् इमम् अव्ययम् योगम् विवस्वते प्रोक्तवान् । विवस्वान् मनवे प्राह (इमम् अव्ययम् योगम्) । मनु इक्ष्वाकवे (इमम् अव्ययम् योगम्) अब्रवीत ।

**अर्थ :** मी हा शाश्वतचा असा योग विवस्वान नांवाच्या सूर्याला सांगितला; विवस्वानानें तो मनूला सांगितला व मनूनें इक्ष्वाकूला सांगितला–उपदेशिला–बोलिला (१).

---

[८]स्वके, आत्मीये, नित्ये, चिरस्थिते निजः ।

[९]आदि, पूर्वः, पौरसयः, प्रथमः, आद्यः, इति ५ आद्यस्य ।

[१०]अचल–अतिस्थिर. (स्थानुः, स्थिरतर, स्थेयान् इति ३ अतिस्थिरस्य) ।

[११]दयालु = दयालु, कारुणिकः, कृपालु, सूरत इति ४ दयाशीलस्य। दया। कृपा। अनुकंपा। कारुण्य। करुणा। घृणा। अनुक्रोशः इति ७ करुणस्य ।

[१२]सुचेलकः, पटः इति २ शोभनवस्त्रस्य। उत्साहवर्धनः, वीरः इति २ वीरस्य। शूरः, वीरः, विक्रान्त इति ३ शूरस्य। शृंगार, शुचि, उज्ज्वल इति ३ शृंगारस्य। हसः, हासः, हास्यम् इति ३ हासस्य। बीभत्स, विकृतम्, इति २ बिभत्सस्य। विस्मय, अद्भुतं, आश्चर्यम्, चित्रम् इति ४ अद्भुतस्य। भैरवम्, दारुणम्, भीषणम्, भीष्मम्, घोरम्, भीमम्, भयानकम्, भयंकरम्, प्रतिभयम् इति ९ भयानकस्य। रौद्रम्, उग्रम् इति २ रौद्रस्य ।

[१३]इक्ष्वाकूचा पिता वैवस्वत् सातवा मनु. सांप्रत याचेंच मन्वंतर चालू आहे. [ विवस्वत् = १) सूर्य, २) अरुण, ३) देवता, ४) ७वा मनु. ]

[१४]मनुप्रजापति : चौदा मनु एका कल्पांत असतात. प्रजपति स्वायंभुवः। स्वारोचिष। उत्तम। तामस। दैवत। चाक्षुष। वैवस्वत। सावर्णि। दक्षसावर्णि। ब्रह्मसावर्णि। धर्मसावर्णि। रुद्रसावर्णि। देवसावर्णि। इंद्रसावर्णि। असे चौदा मनु एका कल्पांत असतात.

धर्मराजः, पितृपतिः, समवर्ती, परेतराट्, कृतान्तो, यमुनाभ्राता, शमनो, यमराड्, यमः; कालो, दण्डधरः, श्राद्धदेवः, वैवस्वतः, अन्तकः इति १४ यमस्य ।

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।**
**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥**

[परंतपः = शत्रूंना ताप देणाऱ्या (अर्जुना). एव = याप्रमाणें. परंपराप्राप्त = परंपरेनें प्राप्त झालेला. इमम् अव्ययम् योगम् = हा शाश्वत योग. राजर्षि विदः = राजऋर्षीनीं जाणला. स इह महता कालेन = तो ह्या जगीं–ह्या पृथ्वीवर–बराच काल गेल्यामुळें. योगो नष्टः = योग नाहींसा झाला–लोपला.]

**अन्वय :** परंतप! परंपरा प्राप्तम् इमम् अव्ययम् योगम् राजर्षयः विदुः एवम् । स योग इह महता कालेन नष्टः ।

**अर्थ :** हे शत्रुतापना अर्जुना! फक्त राजऋर्षीनींच याप्रमाणें परंपरेनें प्राप्त झालेला शाश्वततेचा असा योग जाणला–संपादिला : तो योग ह्या जगीं–पृथ्वीवर–दीर्घकाल लोटल्यामुळें–(महता कालेन)–बराच काल गेल्यामुळें–नाहींसा झाला आहे (२).

**मग देव म्हणे पंडुसुता । हाचि योग आम्हीं विवस्वता ।**
**कथिला परि ते वार्ता । बहुता दिवसांची ॥ १६ ॥**

**मग तेणें विवस्वतें रवि । हे योगस्थिति आघवी ।**
**निरूपिली बरवी । मनुप्रति ॥ १७ ॥**

**मनुनें आपण अनुष्ठिली । मग ईक्ष्वाकुसि उपदेशिली ।**
**ऐसी परंपरा विस्तारिली । आद्य हे ॥ १८ ॥**

**मग आणीकही या योगातें । राजऋषी जाले जाणते ।**
**परि तेथुनि आतां सांप्रतें । नेणिजे कोण्हि ॥ १९ ॥**

**प्राणिया कामीं भरू । देहाचि वरी आदरू ।**
**म्हणोनि पडिला विसरू । आत्मबोधाचा ॥ २० ॥**

**अव्हांटलिया आस्थाबुद्धि । विषयसुखाची परमावधि ।**
**जीव तैसा उपाधि । आवडे लोकां ॥ २१ ॥**

पंडुसुता = पांडुसुता. विवस्वता = सूर्याला. विवस्वता योग आम्हीं हाचि = सूर्याला हाच कर्मयोग (निष्कामतेचा असा) आम्हीं : कथिला = सांगितला. बहुता दिवसांची वार्ता ते = वार्ता = दुसऱ्यांच्या सांगण्यावरून पाहणें जें कांहीं ज्यास वार्ता म्हटलें-राहणें; संभाषण म्हटलें–पुष्कळ दिवसांची ती बातमी **अभंग :**—देखण्याच्या तीन जाती। वेठी वार्ता अत्यंती ॥ १ ॥ जैसा भाव तैसे फळ। स्वाती तोय एकजळ ॥ २ ॥ पाहे सांगे आणि जेवी। अंतर महदंतर तेवी ॥ ३ ॥ तुका म्हणे हिरा। पारखिया मूढा गारा ॥ ४ ॥ वार्ता–राहणें, बातमी, संभाषण, पोटाचा धंदा, व्यापार व शेती, वांगें (वार्तामात्र = वरपांगी ज्ञान :: वार्ताहर = दूत, कावड वाहणारा, व्यापारी). बहुता = बहुत्व. वैपुल्यम् (= आधिक्य, विपुलता, विस्तार) (बहुद = उदार) (विपुल = विशंकटम्, पृथु, बृहत्, विशालम्, पृथलम्, महत्, वड्रम्, रु, विपुलम् इति ९ विस्तीर्णस्य) (१६). तेणें विवस्वतें रवि = विवस्वत नांवाच्या सूर्यानें. आघवी योगस्थिति = सर्व योग. योग = जीव-परमात्मऐक्य. स्थिति = स्वरूपरचना. बरवी = चांगली, सुंदर. मनुप्रति निरूपिली = मनूला–मनुप्रजापतीला सांगितली. चौदा प्रजापति एका कल्पांत असतात [(मनु–मन–मनुराजा देहपुरी (अभंग पाहा)]. मनु = (१) मननशील, विद्वान. (२) अंतःकरण. (३) चौदा मनूंपैकीं प्रत्येक (स्त्री, मनुपत्नि). मनुः + अंतर ३०६७२०००० वर्षे. मनुजः = मनुष्य. मनु + अधिपः = राजा (१७).

मनुनें आपण अनुष्ठिली = मनुप्रजापतीनें आपण धर्मकृत्यक्रियेची केली (अनुष्ठान = करणें, वर्तन, क्रिया, धर्मकृत्य). इक्ष्वाकुसि = इक्ष्वाकुला = सूर्यवंशाचा पहिला राजा, वैवस्वत मनूचा पुत्र. या इक्ष्वाकूनें वसिष्ठापासून अध्यात्मविद्या संपादिली ( अनुसरणें = भजणें, मागें जाणें). उपदेशिली = शिकविली (व्या. आद्योच्चारण), निर्देश, मंत्र–शिकविणें. ऐसी परंपरा विस्तारिली = ही परंपरा महाभारतांत नारायणीयोपाख्यानांत अशी सांगितली आहे. परंपरा = क्रम, परंपरा, पद्धत, कुळ, जात, (परंपरीण = परंपरागत) (परंपराकं = यज्ञपशुहिंसा). विस्तारिली = वाढ, फैलाव, विस्तीर्णता, रुंदी, सर्व हकीकत (ग. व्यास) फैलाव करून सांगितली आहे. (विस्तर = प्रणय, प्रार्थना, आधार, आसन, पीठ, समूह, वैपुल्य, बोलण्याचा पाल्हाळ, विस्तार, फैलाव.) स्तृ + वि = वृद्धिंगत करणें, विस्तृत करणें, ताणणें (संस्तरः = रचना, अनुष्ठान, विस्तार, शय्या, स्थंडिलरचना, यज्ञ). आद्य हे–आद्य हे गा = पहिली, मूळची, श्रेष्ठ, आधींची, प्रारंभाची–विष्णूची परंपरा ही. ("त्रेतायुगादौ च ततः विवस्वान् मनवे ददौ। मनुश्चलोक भृत्यर्थं सुतायेक्ष्वाकवे ददौ॥" शांतिपर्व ३४८-५१). संपादणें–पद + सम् = संपन्न करणें, बनवणें, सज्ज करणें, सिद्धीस नेणें, देणें, होणें, संपन्न होणें, युक्त होणें (१८). आणीकही = दुसरे, इतर, निराळे, आणि, इतरप्रमाणें; अधिक जोरानें, दुसऱ्या घरीं, इतर ठिकाणीं (१–२५७). राजऋषि–राजर्षि [ = ऋषि = पश्चात्ताप पावलेला, १. पुराणप्रसिद्ध तपस्वी, २. वेद, ३. मंत्र, ४. किरण, ५. गोरोचन, ६. वानर, ७. ज्ञानी, ८. जीव :: श्रुतर्षि, कांडर्षि, परमर्षि, महर्षि, राजर्षि, ब्रह्मर्षि, देवर्षि असे सात प्रकार]. [ऋषिऋण = तर्पण, वेदाभ्यास, इत्यादी. ऋषिधान्य = वरी, देवभात. ऋषिपंचमी = भाद्रपद शुद्ध पंचमी. ऋषिपुत्रकः = दवणा वनस्पति. ऋषिप्रोक्ता = रानउडीद. ऋषियज्ञ = वेदाध्ययन. ऋषिश्रेष्ठ = पुंडरीक. ऋषि–वनस्पति = मुरुडशेंग]. जाले–जाहले. तेथुनि–तेथोनि. सांप्रतें = सांप्रतम् = हल्लीं, योग्य तऱ्हेनें नेणिजे कोण्हि = कोणीही जाणत नाहीं (१९).

कामीं भरू–कामी भर (भर = नाद, श्रम, सायास). (कामी = विलासी मनुष्य, विलास धारण करणारा, विलासभार वाहणारा, रति. भर = ओझें–भार–धारण करणारा, ढोंग, वैपुल्य, आधिक्य) रतीच्या–विलासाच्या–ठिकाणीं वैपुल्य, आधिक्य, आसक्ति धारण. (कामिन् = स्त्रीलंपट, प्रेमळ, कामातुर. आत्मंभरि = अप्पलपोट्या, पोटभरू, आपमतलबी). प्राण = पंचप्राण[१५], जीव, अंतःकरण, सर्वस्व, देहाचि[१६] वरी आदरू–देहाचिवरी आदर = देहाचे ठायींच सर्वथैव आदर, सन्मान, काळजी, उत्सुकता, विनंति, यत्न, लक्ष. [देह = १. शरीर, २. माखणें, ३. तट. देहधर्म = आहार, निद्रा, इत्यादी देहाचे सहजधर्म. देहबंध = शरीराचा बांधा. देहवत्, देहभृत् = प्राणी, जीवात्मा. देहसंचारिणी[१७] = कन्या :: आदरणं = लक्ष देणें. आदर आतिथ्य = अतिथीचा सन्मान, योग्य पाहुणचार. देहंभर–देहंभरि = पोटभरू]. वर ( = देहाचि वरी) = पसंती, वर, अभिष्ट, उत्तम, वेष्टन, पेक्षां, देहासच आदर, प्रेम देणारा. देहबुद्धीवरच जास्त टेकणारा. विसरु–विसर = पसरणें, फैलावणें, समूह. (विसार = प्रसार). आत्मबोधाचा = (बोध = ज्ञान, विचार, बुद्धि, जागृति, उमलणें, उपदेश) = आत्मज्ञान, पुरुषजागृति, ज्ञानजागृति (२१).

अव्हांट = आडमार्ग. आस्थाबुद्धि = (आदर, विचार, काळजी) आस्तिक्यबुद्धि. विषयसुखाची = ज्ञानेंद्रियांचे रूपादि विषय, भोग्य वस्तु, पदार्थ. परमावधि = (परम + अवधि) परम सीमा, हद्द, अंत, मुदत, करार, समाप्ति, वेळ. जीव तैसा उपाधि = देहादि प्रपंच. जीव = प्राण, आयुष्य, जीवात्मा, लिंगशरीर,

[१५] (प्राण = ) घ्राणेंद्रिय, इंद्रिय, श्वास, हृदयस्थ वायु, जीव, वारा, बल, देहस्थ पंचप्राण, जीवात्मा, परमात्मा, प्राणाप्रमाणें प्रिय वस्तु, अन्न, कवित्वशक्ति, काव्यरस, जगणें, विष्णु.

[१६] प्राणिन् = १) प्राणी, जीव, २) जिवंत, बलिष्ठ.

[१७] देहिन् = प्राणी, मनुष्य, आत्मा. देहिनी = पृथ्वी. क्षेत्रज्ञ, आत्मा, पुरुष इति ३ शरीराधिदैवतस्य।

जीवंतपण, जीवंत. जीवित, प्राणी, व्यवसाय, कर्ण, बृहस्पति, पृथ्वी, धनुष्याची दोरी, खणखण शब्द, निर्वाह-साधन. उपाधि = त्रास, अडथळा. १. शुद्ध स्वरूपाला अन्यरूप देणारें किंवा अन्य भासविणारें द्रव्य (रंगीत पाण्यांत रंग उपाधि). २. तांबड्या फुलामुळें, स्फटिक तांबडा : : तांबडें फूल ही उपाधि : : (उपसर्ग, माया, संसार, पसारा, त्रास, कारण, हेतु, धर्मचिंतन) = उपाधि. आवडे लोकां = विश्व, प्रजा, लोक, समुदाय, विषय, फळ, भोग्य वस्तु, आवडती-आवरती होणारी. लोक = मनुष्य, जनता, जनव्यवहार, जग, निवासस्थान, निजस्वरूप, विषय, चक्षुरींद्रिय, प्रकाश, फल, भोग्यवस्तु, जन, विश्व, भुवन, विश्वाचा भाग (२१).

यावर देव "कां जे महर्षि आणि तया देवा। येरा भूतजात सर्वा। मी आदि म्हणोनि पांडवा। अवघडु जाणतां ॥ ६७-२ ॥ श्रीकृष्ण म्हणत आहेत कीं, हे पंडुसुता, हाच योग-आत्मयोग-योगांतील उत्तम योग -कर्मयोग-निष्काम कर्मयोग आम्हीं विवस्वत् जो भगवान् सहस्ररश्मि[१८], त्यास कथिला-सांगितला-बोलिला-उपदेशिला. पण ती गोष्ट सद्यःकालाचे मानानें, अति पुरनानची होय-बहुत दिवसांची जुनीपुराणी अशी-(१६)

त्या रवीनें-विवस्वतानें-मग नंतर ही सर्व आघवी योगस्थिति बरवेपणानें-उत्कृष्टपणानें-मनु जो मानव-जातीचा मूळ पुरुष त्यास निरोपिली-निरुपमतेनें निरोपणाची केली-निरोपच जसा का एक सांगावयाचा-(१७)

आपण मनूनें अनुष्ठिली, (हा योग उत्तम असा चांगला पण "अर्जुना" तूं परिससी। परिसोनि अनुष्ठिसी। तरि आम्हांसि वाणि कायसी। सांगावयाची ॥ १६९-५), अनुष्ठानाची केली व नंतर मग इक्ष्वाकु जो सूर्यवंशी राजा त्यास उपदेशिली-(जी दैविकी वाचा। जें उपदेश दे नाभिकाराचा। तें नवरस दीपाचा। पवाड लाभे ॥ ७-१०). अशी परंपरा-श्रीकृष्ण-विवस्वान् (रवि)-मनु-इक्ष्वाकु-(परंपरा) आद्य अशी विस्तारिलेली-आहे. (१८)

यावर मग आणखीही कांहीं राजऋषी त्या कर्मयोगास-कर्मयोगाच्या निष्कामतेस-जाणते असे शहाणे झाले; पण त्यानंतर आतां तेथून म्हणजे इक्ष्वाकु-राजर्षि-नंतर तेथचा तो उपदेश कोणीही जाणत नाहीं, त्यासंबंधीं नेणतपणच एक सर्वत्र सांप्रत वर्तन आहे-नेणिजे- (१९)

प्राणी विषयभोगकामना-कामावर भर देणारा, इंद्रियांच्या आधीनतेनें देहावरच सर्व आदर असलेला-सर्व आदर देहात्मभावासच-देहासच-दिलेला म्हणून आत्मबोधाचा, ज्ञानयोगाचा विसर पडून आहे, आत्मबोध विसरला-(आपलेंपण-स्वतःचें जें तें कांहींच उमगेना. तेथें यज्ञचक्र तसेंच उघड नागवण जी विषयाचरणाची जेथ आत्मघातच एक-केवळ देहभरण जें-तेथें अंतःकरण देयावेना असें जें कांहीं मागें परोपरीनें सांगितलें तें मुळींच आठवणीचें होईना-निजवृत्ति ती विसरली)- (२०)

आस्थाच मुळीं नाहीं, तेथें बुद्धीच मुळीं अव्हासव्हा झाली, एक विषयसुखाची सर्वथैव परम परम अशी सीमाच अवधीच-लोकांना यकःश्चित जीवपणाचीच उपाधि एक आवडीची होऊन आहे. (२१)

**येऱ्हवीं तन्हि खवुणियांच्या गांवीं। पाटाउवें काय करावीं।**
**सांगे जात्यांधा रवि। काय आथी ॥ २२ ॥**
**किं बहिरेयां वे आस्थानीं। कवणि गीतातें मानीं।**
**किं कोल्हा चांदणिं। आवडी उपजे ॥ २३ ॥**

[१८] रवि : सूरः। सूर्यः। अर्यमा। आदित्यः। द्वादशात्मा। दिवाकरः। भास्करः। अहस्कर। ब्रध्नः। प्रभाकरः। विभाकरः। भास्वान्। विवस्वान्। सप्ताश्व। हरिदश्व। उष्णरश्मि। विकर्तनः। अर्कः। मार्तण्डः। मिहिरः। अरुणः। पूषा। द्युमणिः। तरणिः। मित्रः। चित्रभानु। विरोचनः। विभावसु। ग्रहपति। त्विषांपति। अहर्पति। भानु। हंसः। सहस्रांशुः। तपनः। सविता। रविः। इति ३७ सूर्यस्य।

**पैं चंद्रोदया आरुतें । जयांचे डोळे फुटती असते ।**
**ते कावळे केंवि चंद्रातें । वोळखती ॥ २४ ॥**
**तैसी वैराग्याची शींव न देखती । जे विवेकाची भाष नेणती ।**
**ते मूर्ख केंवि पावती । मज ईश्वरातें ॥ २५ ॥**
**कैसा नेणों मोह वाढीनला । तेणें बहुत काळ व्यर्थ गेला ।**
**म्हणोनि योग हा लोपला । लोकिं ईये ॥ २६ ॥**

ये-हवीं–येरवीं. तन्हि = तर, मग, हि, सुद्धां, तरीहि, तसें असलें तर. खवुणियांच्या–खवणयांच्या = जैनपंथी, क्षपणक. (खवणा = दिगंबरदीक्षा घेणारा). गांवीं = घरीं, दारीं, गांवीं (तेथचे नसणें जें). दृष्टीनें (दिगंबरांना कापड काय उपयोगाचें होतें!) पाटाउवें–पाटावे = उंचीं वस्त्रें (पाटाव = उंच रेशमी वस्त्र). जात्यांधा-जात्यंधा = जन्मतः अंध जो. (जात = जन्म, उत्पत्ति). काय आथी = काय होय (२२). किं–का. बहिरेयांचे–बहिरयांच्या (बहिरमुख = बहिरामुका : बहिरवास = बाहेर राहणें). आस्थानि–आस्थानीं = समुदायांत, सभेमध्यें, ठिकाणीं. (आस्थान = सभा, आदर, आस्थान = सभा). कवणि–कवण गीतातें मानीं = कोण गीताला मान देणार! गाण्याला मानमान्यता कसची! कसची ती गीत गाण्यास मानणारी–मानलें जाणें तें, मान देणें तें, कोण तें गाण्यास मानणारें! ऐकणार–सन्मान, गौरव, मान देणारा, पूजणारा. कोल्ह्या–कोल्हेया (चांदणि आवडी उपजे) = धूर्ताला, लबाड कोल्ह्याला अंधारच बरा वाटतो. त्याला चांदणें–प्रकाश–आवडणार नाहींच. कोल्ह्याला चांदण्याची आवड केव्हांही (कसची ती–केव्हांहि) उमजणार नाहीच. कोल्हा = जंबु, जंबुक, जमूक, नीच माणूस, (जांभूळ = जंबुल) [१० जंबुकस्य–शिवा, भूरिमायः, गोमायुः, मृगधूर्तकः; शृगालः, वंचुक, क्रोष्टा, फेरुः फेरवः, जंबुकः][१९] चांदणं = चंद्राचा प्रकाश, (चंद्रिका, कौमुदी, ज्योत्स्ना इति ३ चंद्रप्रभायाः) चांदणें (२३).

चंद्रोदया आरुतें–आरौतें = चंद्र-उदयाच्या अगोदर, चंद्रोदयाच्या आधीं. आरौतें = आधीं. (परौतें = नंतर). जयांचे डोळे फुटती असते = ज्यांचे डोळे फुटती म्हणजे मिटलेले असतात. [मीलनं = १. डोळे मिटणें, २. (फुलाचें) मिटणें; मीलित = न फुललेलें, संकुचित.] कावळे[२०] चंद्रातें केंवि वोळखती = चंद्रोदय

[१९] जंबुक = कोल्हा, नीच माणूस, जांभूळ, वरुण. जंबुल–जंबूल = जांभूळ, केवडा, वधुवरांची केलेली थट्टा. (कोल्हा = धूर्तकः, जंबु–जंबू, नीच माणूस. कोल्हा = शिव. कोल्ही = भालू, पार्वती. भालूकी = म्हातारी कोल्ही, भालू.) (कोकिळा–(स्त्री.)–प्रियकर (स्त्री.)–१. लुच्चा, खोडसाळ, दूरदर्शी, चैनी, जुगाऱ्या. २. लोखंडाचा कीस.) वारुण = वरुणाचें, जलाचें १. पाणी, २. (ज्यो.) शतभिषज् नक्षत्र. वरुण = जलचरांचा राजा, देवविशेष, जलाचा अधिपति, उदक वायवर्णा, (व.), परमेष्टि, सूर्य, स्वर्लोक (न.) जिरे. वरुणात्मज = जमदग्नि, मद्य. वरुणालय = समुद्र. वरुणानी–वरुणपत्नि. वारुणव्रत = योजलेलें काम ताबडतोब करणें. वारुणि = अगस्ति ऋषी. वारुणी = पश्चिम दिशा, मद्य, मद्यविशेष, दूर्वा, गंडदूर्वा, शतावरी, कंडवळ.

[२०] कावळा : काकः, करटः, अरिष्टः, बलिपुष्टः, सकृत्प्रजा, ध्वाङ्क्षः, आत्मघोषः, परभृत, बलिभुक्, वायसः, इति १० काकस्य. काग = कावळा. काण = डोमकावळा = एक डोळ्याचा. काकः = निंद्य पुरुष, कावळा, लंगडा (खंज), पांगळा, (पंगु), पाण्यांत डोकें बुडविणें, कोकिळ, काकसमूह. [काकजात = कोकिळ. काकपक्ष = झुलपें. काकपद = शब्द गळल्याची खूण (/\). काकत्व = राजाचा मध्यम सेवक. काकशालि = काळी साळ. (काकलः–डोमकावळा, कंठभूषण). काकरुकः = भित्रा, नम्र, दरिद्री, स्त्रीवश पुरुष, दिवाभीत, कपट.] (जयंत काककथा = १. जयन्त, पाकशासनि २. इंद्रपुत्रस्य। चंद्रासारखें मुख दिसत आहे; तूं सीतेस पाहत असशील तर आजपासून तुझें व चंद्राचें वांकडें राहील, असा शाप दिलेला कावळ्याला कदाचित्). नराणां नापिकः धूर्तः। पक्षीणांचैव वायसः॥ वायस = कावळा, आगरुचंदन, टर्पिण तेल. वायः = विणणें. वायदंडः = धोटा (कोष्टयाचा).

कावळयाच्या उपयोगीं पडत नाहीं–कामास येत नाहीं. कावळयाचा रंग काळा–काळया रात्रीं घरांतील कामें चंद्राच्या चांदण्यानें होणारीं नव्हत; तेथें दिवाच पाहिजे : जसें का–(स्फुट = फुटलेलें, विकसित. स्फुटनं = फुटणें, उमलणें. स्फुटित = व्यक्त केलेलें, विकसित, फुटलेलें, रुंद, थट्टा केलेला) (२४). शीव = हद्द, सीमा. वैराग्याची शींव न देखति = प्रपंचाबद्दल अनासक्तीची शींव–हद्द–जे पाहत नाहींत. विवेकाची भाष नेणती = सारासार विचाराची–भाष–बोलणें, सांगणें, म्हणणें–प्रतिज्ञा जे नेणतात. ते मूर्ख केंवि पावती मज ईश्वरातें = ते अविवेकी कसे बरे पावते होतील मज ईश्वरास–(२५). मोह = प्रेमाचें वेड, मूर्खपणा, मतिभ्रम. वाढीनला = अधिक करणें, वाढ होणें, वृद्धि पावला–झाला, महत्त्व दिला गेला. बहुत काळ व्यर्थ गेला = दीर्घ काळ गेला. योग लोपला ईये लोकिं = ह्या मृत्युलोकीं हा योग लोप पावला (२६).

यःकश्चित् जीवपणच एक तें, सर्वेच्या सर्व जीव धर्माच्या उर्मींनीं ग्रासलेले, जेथ शोक, मोह, क्षुधा, तृषा, जरा, मरण ह्यांनींच आवरलेलें हें जीवपण तेथें कमचें तें प्रेमाचें जन्मलेलें, प्रीतीचें झांकलेलें, सगुण आच्छादिलेलें तें कमचें ! पण एक सर्वेच्यासर्व जें कांहीं जवळ आहे नाहीं तें सर्व अविद्येचें हपापलेंपणच एक आवडून घेतलेलें–अहो, जेथें सर्व नागवेंपणच–मुळींच कमला तो पांघरायाचा आधार नाहीं–तेथें नागवें–नागवें जेथें वस्त्र पांघरणें–नेसणें कमचें–दिगंबर त्याचे मुळीं सर्व गांव, तेथें विचाररूपी उंचीं वस्त्रें तरी कोण काय कामाचीं तीं–जेथें जन्मतःच आंधळेंपण एक तेथें सूर्याची ती मातब्बरी कमल्या महत्त्वाची ती–सर्व आंधळेपणा-पुढें ज्ञानसूर्याची ती असणारी कर्तबगारी काय कसची तर.... (२२)

---

जीवः असुधारणम् इति २ प्राणधारणस्य ।

असवः प्राणाः इति २ प्राणानाम् ।

जीव = बृहस्पति = बृहस्पतिः, सुराचार्यः, गीष्पतिः, धिषणः, गुरुः, जीवः, अङ्गिरसः, वाचस्पतिः, चित्रशिखण्डिनः इति ९ बृहस्पतेः ।

चित्रशिखण्डिनः = मरीचिरंगिरा अत्रिः पुलस्त्यः पुलहः क्रतु । वसिष्ठश्चैति सप्तैव ज्ञेयाश्चित्र शिखण्डिनः ॥

मरीच्य त्रिमुखा सप्तर्षयः — चित्रशिखण्डिनः संज्ञा मुख शब्दात् पुलस्तादयः ।

जीवंजीवः — पक्षि = हारितः, मद्गुः, कारण्डवः, प्लवः, तित्तिरिः, कुक्कुभः, लावः, जीवंजीवः, चकोरकः, कोयष्टिकः, टिट्टिभकः, वर्तकाः, वर्तिका इति १३ ।

ऊर्मि : उर्मिः, वराटकः, स्वातिः, वर्णकः, झाटलीः, मनुः, मूषा, सृपाटी, कर्कन्धूः, यष्टिः, शाटी, कटी, कूटी इति ११ भावक्रियायाः । भंग, तरंग, ऊर्मिः, वीचिः इति ३ लहर्याः । उल्लोळ, कल्लोळ, महत्सूर्मिषु ।

ऊर्मिका : अङ्गुलीयकम्, उर्मिका इति २ अङ्गुल्याभरणस्य ।

ऊर्मिमत् = वक्र = अरालम्, वृजिनम्, जिह्मम्, ऊर्मिमत्, कुञ्चितम्, नतम्, आविद्धम्, कुटिलम्, भग्नम्, वेल्लितम्, वक्रम् इति ११ ।

आस्था : आस्थानि सभा । यत्नः प्रयत्नः । उभौ आस्था । उपाधिः धर्मचिन्ता इति २ धर्मचिन्तनस्य । तत्र "उपाधिः" पुंसि । आधिः, मानसी व्यथा इति २ मनःपीडायाः । कुटुम्बव्यापृतः, अभ्यागारिकः, उपाधिः इति ३ कुटुम्बपोषणादिव्यापारयुक्तस्य । लोक–लोकेशः = हिरण्यगर्भो लोकेश स्वयंभुश्चतुराननः इत्यादी, इत्यादी. लोकेश = ब्रह्मदेव–ब्रह्मा, आत्मभूः, सुरज्येष्ठः, परमेष्ठी, पितामहः, धाता, अब्जयोनिः, द्रुहिणः, विरिञ्चिः, कमलासनः, स्रष्टा, प्रजापतिः, वेधाः, विधाता, विश्वसृट्, विधिः, इत्यादि २० ब्रह्मा ।

अथवा असें म्हणूं कीं, सर्व बहिरेंपणच एक–बहिऱ्याच्या समेमध्यें कसली ती गानी–गीतास मानण्याचें तें–कसची मान्यता गीतास मिळाली असें नाहींच. कोल्ह्यास[२१] पोटीची ती-अंगची चांदण्याची आवड केव्हांहि नाहींच! जीवउपाधि आवडलेली, खवुणियच्या गावीं–पाटाउवें, जात्यंधा–रवि, कोल्ह्या–चांदणें, कावळे–चंद्र, वैराग्य शींव नाहीं, विवेकहीन मूर्ख, तेथें ईश्वर पावणारा नाहीं...... (२३)

चंद्र उदयाचे अगोदरचमुळीं ज्यांचे असलेले डोळे फुटतात, ते कावळे[२२] चंद्रास कां बरें–कसचे बरें ओळखणारे होतील? (२४)

त्याप्रमाणें वैराग्याची मुळीं कसलीही सीमा, मर्यादा, शीवच माहीत नाहीं, कसचें तें, वैराग्य म्हणजे काय तें जाणणें होणारें–ज्यांना विवेकाची बोली, भाष्, भाक्, भाख माहीत नाहीं–जाणणें नाहीं-असे ते मूर्ख कसचे बरें मज ईश्वरास मिळणारे, पावणारे, पोंहोंचणारे होणारे–असे कधींही नच होणारे कीं–ज्यांना आपलें-पण नाहीं–अर्थ पुरुषार्थाचें अंग नाहीं–त्यांना ह्या परमात्म्याशीं–(कर्तव्य कसचें तें) काय करावयाचें आहे? (२५)

अहो! अहो!! मोह हा कमा–केवढ्यातरी वाढतेपणाचें प्रमाण घेऊन आहे–मोह वाढला, थोर झाला आहे–मोह हा सहा उर्मीमधील एक, पण ह्या मोहानेंच तें सहापटीचें होऊन होणें झालें–ह्या लोकीं त्यामुळें बहुतकाळ व्यर्थ गेला–आणि म्हणूनच कीं हा निष्काम कर्मयोग–ह्या लोकांमध्यें-ह्या लोकीं लोप घेऊन आहे–लोपला आहे–लपणारा झाला. (२६)

---

[२१]कोल्हा— भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा। तेथें अनुभवाचा काय पंथ ॥ १ ॥
वाढवुनि जटा फिरे दाही दिशा। तरी जंबु वेषा सहजस्थिति ॥ २ ॥
कोरोनिया भूमि करी मध्यें वास। तरी उंदीरास काय वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें कासया करावें। देहासि दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

कांहीं जन भगवी वस्त्रें घेतात, तो कांहीं अनुभव होण्याचा मार्ग आहे काय? त्याप्रमाणें भगव्या रंगाची साहजिक कुत्रीं नसतात काय? (१). मस्तकावर जटा वाढवून जे दशदिशा (नग्न) हिंडतात, त्याप्रमाणें कोल्ह्याची वागणूक साहजिक असते (२). कित्येक जमिनीमध्यें विवर करून राहतात, तसें आपआपल्या बिळामध्यें राहणारे उंदीर कमी आहेत काय? (३). तुकाराम महाराज म्हणतात, असें करण्याचें काय कारण आहे? व्यर्थ देहाला दंड कां करावा? (४).

कोल्हा : जोंवरि तोंवरि जंबुक करि गर्जना। जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥ १ ॥
तोंवरि तोंवरि सिंधु करि गर्जना। जंव त्या अगस्ति ब्राह्मणा देखिलें नाहीं ॥ २ ॥
तोंवरि तोंवरि वैराग्याच्या गोष्टि। जंव सुंदर वनिता दृष्टि देखिली नाहीं ॥ ३ ॥
तोंवरि तोंवरि शूरत्वाच्या गोष्टि। जंव परमाईचा पुत्र दृष्टी देखिला नाहीं ॥ ४ ॥
तोंवरि तोंवरि माळामुद्रांचीं भूषणें। जंव तुक्याचें दर्शन झालें नाहीं ॥ ५ ॥

*जोंपर्यंत वाघ पाहिला नाहीं, तोंपर्यंतच कोल्ह्याची गर्जना–१. जोंपर्यंत अगस्ति ब्राह्मणाला पाहिला नाहीं, तोंपर्यंतच सिंधूची गर्जना–२. जोंपर्यंत सुंदर स्त्री दृष्टीस पडली नाहीं, तोंपर्यंतच वैराग्याचें व्याख्यान-३. जोंपर्यंत दुसऱ्या मातेच्या पोटचा शूरवीर योद्धा पाहिला नाहीं, तोंपर्यंतच शूरत्वाच्या गप्पांची महती–४. तुकाराम महाराज म्हणतात, जोंपर्यंत माझी गांठ पडली नाहीं, तोंपर्यंतच साधूपणाच्या व्याख्यानाचें प्रतिपादन–(५).*

[२२]कावळा : जयाचें डोळे फुटती असते। ते कावळे कैंवि चंद्रातें। वोळखती ॥ ४–२४ ॥ निंब निंबोळियां मोडुनि आला। तरी काउळियां सुकाळ जाला। तैसा भक्तिहिनु वाढिन्नला। दोषाची लागी ॥ ९–४३९ ॥ टाळिये काउळा सांपडे ॥ १७–३०१ ॥–जेव्हां कावळा टाळींत सांपडावा, तेव्हां तामसी पुण्यकृत्य करतो. (*काकतालीय न्याय*); विवेकु काउळिया। नाहीं जैसा ॥ १८–५५६ ॥ चंद्राचा उदय जैसा। उपयोग नोहे वायसा॥ ३–१९८ ॥ चोखी होईल वायसा–कावळा काळयाचा पांढरा होऊं शकत नाहीं–१६–२८५. शूद्र कावळयास यज्ञावशेष घालीत नाहींत–१८–१४८९.

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

[अद्य = आज. पुरातनः योगः = जुनापुराणा योग, रूप. भक्तः असि सखा असि–माझा भक्त आहेस, तसेंच सखा–मित्रही पण आहेस. ते–तुजला. हि एतद् उत्तमम् रहस्यम् = हें असें उत्तम रहस्य.]

**अन्वय :** स एव अयं । योगः पुरातनः । अद्य प्रोक्तः । मया ते । मे भक्तः सखा च असि । इति । हि । एतत् उत्तमम् रहस्यम् ।

**अर्थ :** परंपरेचा प्राचीन योग, तोच हा आज मी तुला सांगत आहें. कारण तूं माझा भक्त आहेस; तसेंच स्नेहीपण आहेस. याजसाठीं तुला हा योग सांगितला, व त्यांतही हें उत्तम रहस्य, ज्ञान (तत्त्व) आहे (३).

**तोचि हा आजि आतां । तुजप्रति कुंतीसुता ।**
**सांगितला आम्ही तत्त्वतां । भ्रांति न करी ॥ २७ ॥**

**हें जीवींचें निज गुज । परि केंवि राखों तुज ।**
**जें पढियसि तूं मज । म्हणौनियां ॥ २८ ॥**

**तुं प्रेमाचा पुतळा । भक्तिचा जिव्हाळा ।**
**मैत्रियेची चित्कळा । धनुर्धरा ॥ २९ ॥**

**तुं अनुसंगाचा ठावो । आतां तुज काय वचूं जावो ।**
**जऱ्हि संग्रामारूढ आहो । जालो आम्ही ॥ ३० ॥**

**तऱ्हि नावेक हें साहावें । गाज्य वज्य हि न धरावें ।**
**परि तुझें अज्ञानत्व हरावें । लागे आधि ॥ ३१ ॥**

तत्त्वतां = तात्पर्यानें, सत्यत्वेंकरून, खऱ्या स्वरूपावर, तात्त्विक-रीतीनें [(तत्त्व[२३] = मन, शरीर, ब्रह्म, परमात्मा, देवता, तात्पर्य, मंद मंद नृत्य, सत्य-खरें स्वरूप, मूलतत्त्व, वस्तुस्थिति). तत्त्वज्ञ, तत्त्वविद् = तत्त्वज्ञानी, वेदांती. तत्त्वज्ञान = यथार्थ ज्ञान, ब्रह्मज्ञान. तत्त्वन्यास = (न्यास = पूजेमध्यें देहावयवावर मंत्रांनीं देव इत्यादींची स्थापना करणें). तत्त्व ठेवणें = तत्त्व, खूण, ठेव. तत्त्वसंख्यानम् = सांख्यमत. तत्त्व अभियोग = महत्त्वाचा आरोप]. भ्रांति न करी = (संभ्रम भ्रांति = मिथ्यामति, मिथ्याज्ञान, भ्रम, अयथार्थ-ज्ञान, गोंधळ, घोटाळा, संशय, चंचलता, चूक, भूल) संशय घेऊं नको, शंकित होऊं नको. (भ्रांति = भ्रांति, मिथ्यामति भ्रम इति ३). कुंतीसुता = अर्जुना[२४] (२७). जीविचे–जीवींचें–अंतरीचा, अंतःकरणांतील इच्छा, जीवभाव : निजगुज = आत्मभावरहस्य, निजस्वरूपगुह्य, निज, नित्य, ब्रह्म. केंवि राखों तुज = तुजकडून कसें सांभाळलें जाईल–जें कां–हें तुजला नच सांगतां कसें ठेवूं. पढियसि–पढियेसि तूं मज = (पढियंते = आवडते, प्रिय. पढणें = म्हणणें. पढियावो = प्रेम, आवड. पढिये = आवडतें) मजला "म्हणणें" तें आवडतं करीत आहेस : तूं मजला

[२३]तत्त्व : करचरणादिभिः यद्विलंबितं नृत्यादिकं तत् तत्त्वमित्युच्यते ।

[२४]कुंतिभोज–एक राजा, कुंतिपिता, "शूर" राजाचा मित्र. याला अपत्य नसल्यामुळें यानें कुंतीला दत्तक घेतलें होतें. कुंति–यदुवंशीय "शूर" राजाची कन्या, कुंतिभोजानें दत्तक घेतलेली : पंडूची भार्या. हिनें लहानपणीं दुर्वासापासून पुत्रप्राप्तीचे मंत्र मिळविले होते. कर्ण, धर्म, भीम, अर्जुन यांची माता : सूर्य, यम, वायु व इंद्र यांच्या अंशानें हे चौघे झाले : : आणि अश्विनीकुमारांचे मंत्र माद्रीला दिले, त्यांपासून नकुळ सहदेव झाले.

आवडतोस म्हणून (२८). प्रेमाचा पुतळा (=मूर्ति) प्रेम[२५] (प्रीतीकर) करणारी मूर्ति. भक्तीचा जिव्हाळा= भक्तीच्या जिव्हाळ्याची जागा अंतःकरण, भक्ति, जीवनझरा. भक्ति = उपासना, सेवा, श्रद्धा. मैत्रियेची चित्कळा= ( =जीव, आत्मा) मित्रस्य कर्म मैत्र्यं मैत्री वा=मैत्री[१]. [मित्र = सूर्य, स्नेही, दोस्त. (शत्रूच्या पलीकडचा राजा, दोस्त–रा०). मित्रयुः = रीतभात जाणणारा, प्रेमळ, मित्र, मित्र जोडणारा. मित्रसाहः = मित्राचे दोष पोटांत घालणारा.] [२]कळा–चंद्राची कळा, किरण, शक्ति, कौशल्य, नौका, मूर्ति (२९). अनुसंगाचा ठावो = अनुषंग, संगति संबंध, साहचर्य, निकट संबंध, सख्य, विश्वास, सीमा, हद्द. वचूं जावो–वंचो जावो = वंचू = प्रतारणा (प्रतारणं = ठकविणें. प्रतारकः = ठक) करावी. संग्रामारूढ जालो–जाहलों = युद्धाला सज्ज झालों आहों (३०). तन्हि–तरी. नावेक=क्षणभर. गाज्य वज्य हि–गाजबज्यही = गजबज, गोंधळ, गडबड. अज्ञानत्व=अडाणीपणा, अविद्या, माया, (वे०). (नकळत, चुकून समासांत). साहावें=सोसणें, भोगणें, होऊं देणें, माफ करणें (३१).

तोच हा निष्काम कर्मयोग आज आतां ह्यावेळेस सांप्रत–हे कुंतिसुता, तुजला–तुजप्रत आम्हीं तत्त्वतः सांगितला–भ्रांत होऊं नको–भ्रांतीचा अवलंब करूं नको–भ्रांती न करी...... (२७)

असें हें माझ्या जीवींचें, अंतःकरणींचें, निज नित्य गुज गोष्ट गौप्य, ज्यायोगें गुजराण होणारी ह्या जीविताच्या संपन्नतेची–ती तुझें कसेंही करून रक्षण करो!–कारण जें कांहीं तूंच मजला पडिभंता होऊन आहेस म्हणून—(२८)

धनुर्धरा, हे कुंतिसुता, तूं प्रेमाचा पुतळा, भक्तीचा जिव्हाळा.... (२९).

अनुरागाचा ठाव, आतां तुझें वंचन करावें तें कां–जरी आम्हीं संग्रामावर आरूढ, तरी तुजपासून लपवावें म्हणून....(३०).

तरी क्षणभर हें सहन करावेंच–करावें–गाजणें, वाजणें तें मनीं धरावें नच; पण तुझें अज्ञानत्व, अज्ञानपण, तें अगोदर काढावें लागत आहे–तुझें अज्ञान तें आधीं नाहींसें करावें असें होऊन आहे. (३१)

**अर्जुन उवाच—**

**अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।**
**कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥**

[अपरम् = अलीकडचा. भवतः = आपला. परम् = फार पूर्वीचा. विवस्वतः = सूर्याचा. कथम् एतद् विजानीयाम् = हें कसें जाणावें जें का. त्वम् आदौ प्रोक्तवान् = आपणच अगोदरचे असे–प्रथमचे ते योग बोलणारे, योग सांगणारे ते–]

**अन्वय :** भवतः जन्म अपरं । विवस्वतः जन्म परं । त्वम् आदौ प्रोक्तवान् इति । एतद् । कथम् विजानीयाम् ।

[२५]प्रेमा, प्रियता, हार्दम्, प्रेम, स्नेह इति ५ प्रेम्णः ।

[१]मैत्रेयी–याज्ञवल्क्य पत्नि. ही ब्रह्मनिष्ठ होती. मैत्रेयः–पराशरशिष्य. यानें पांडवांशीं वैर न करण्याबद्दल दुर्योधनास सांगितलें, पण त्यानें न ऐकतां, उन्मत्तपणानें आपली मांडी थोपटली, तेव्हां भीमाची गदा मांडीवर बसून मरशील, असा यानें शाप दिला. मित्र–रवौ मित्रः । मित्रम्, सखा, सुहृत् इति ३ मित्रस्य । सख्यम्, साप्तपदीनम् इति २ मैत्र्याः । अतः शत्रोः परं मित्रम् (विषयात् स्वदेशात् अनन्तरो राजा शत्रुः स्यात्), (तरणिः, मित्रः, चित्रभानु, सूर्यस्य)।

[२]कला : चंद्रमण्डलस्य षोडशो भागः कला संज्ञा । त्रिंशत्काष्ठा मिलित्वैका कला । स्त्रीलिङ्ग, शिल्पे गीतवाद्यादिनैपुण्ये । कालभेदे त्रिंशत्काष्ठात्मके काले कला । चित्, चन्, इति २, असाकल्ये । साकल्य वचनं पारायणम् इति । आसंग वचनं तुरायणम् इति ।

**अर्थ :** आपलें बोलणें विसंगत आहे. अलिकडचा-सद्यःकालचा आपला जन्म. विवस्वानाचा जन्म तर फारच पूर्वींचा-दूरचा-सृष्टि-उत्पत्तीबरोबरचा-आपणच अगोदर-आदौ-प्रथम-बोलणारे, योग सांगणारे असें हें कसें बरें-खरें मानावें-जाणलें जावें तें? (४).

**तंव अर्जुन म्हणे श्रीहरि । माय आपुलियाचा स्नेह करी ।**
**तेथ विस्मय काय अवधारी । कृपानिधि ॥ ३२ ॥**
**तुं संसारश्रांताचि साउली । अनाथा जीवांची माउली ।**
**आमतें कीर प्रसवली । तुझी कृपा ॥ ३३ ॥**
**देवा पांगुळ यखादे विजें । तन्हि जन्मोनि जोजार साहिजें ।**
**हें बोलों काई तुझें । तुजचि पुढें ॥ ३४ ॥**
**आतां पुसेन जे मी कांहीं । तेथें निकें चित्त देईं ।**
**तेंविचि देवें कोपावें नाहीं । बोला एका ॥ ३५ ॥**
**तरि मागील जे वार्ता । तुंवा सांगितली होती श्री अनंता ।**
**ते नावेक मज चित्ता । मानेचिना ॥ ३६ ॥**
**जे तो विवस्वत म्हणिजे काई । ऐसें हें वडिलां ठाउकें नाहीं ।**
**तरि तुवांचि केंवि कहीं । उपदेशिला ॥ ३७ ॥**
**तो आईकिजे बहुता काळाचा । आणि तुं तंव श्रीकृष्ण सांपैचा ।**
**म्हणोनि गा ये मातुचा । विसंवाद ॥ ३८ ॥**
**तेंवीचि देवा चिरित्र तुझें । आपण कांहींच नेणिजे ।**
**हें लटिकें केंवि म्हणिजे । येकि हेळा ॥ ३९ ॥**
**परि हिचि मात आघवी । मी परियसे ऐसी सांगावी ।**
**जें तुवांचि तयां रवि केंवि । उपदेश केला ॥ ४० ॥**

आपुलियाचा-आपुलेयाचा = बालकाचा. कृपनिधि-कृपानिधे. स्नेह = ओलावा, प्रेम, आवड, कृपाळु, मित्र. विस्मय = नवल, आश्चर्य (संशय, गर्व). अवधारी = ऐकावें (३२). संसारश्रांताचि = संसारानें श्रमलेल्यांची. अनाथा = दुबळ्या गरिबाचा. आमतें = आमुतें = आम्हांस. तुझी कृपा प्रसवली आमुतें (कीर = निश्चयत्वें) = आम्हांस जन्म देणारी ती तुझी कृपा होय (३३). विजें-विइजे = व्यावें, जन्म द्यावा, उत्पन्न व्हावें. यखादे-एकाधे : जोजार = जंवजाळ, बोजा, त्रास. पांगुळ यखादे विजें तन्हि जन्मोनि जोजार साहिजें = एकादें पांगळें मूल आईला झालें, तर ती त्याच्या जन्मापासून त्याच्या खस्ता खाते (३४). निकें चित्त देईं = चांगलें चित्त द्यावें (३५). वार्ता = गोष्ट, खुशाली, बातमी. नावेक चित्ता मानेचिना = क्षणभर चित्तास मानवत नाहीं-चित्त मानत नाहीं (३६). विवस्वत म्हणिजे काई-कायी = सूर्य, विवस्वत म्हणजे तो कोण काय! तो सूर्य कोण नि काय! वडिलां ठाउकें (ठाउवें) वाडवडिलांनाहि-पूर्वजांनाहि माहीत नाहीं. तरि केंवि कहीं-तरी केंवी कहीं = तन्हि कसा केव्हां-(३७). आईकिजे बहुता काळाचा = फारच जुन्या काळचा-विवस्वान्-फारा दिवसांचा. श्रीकृष्ण सांपैचा = अलिकडचा. सांपैचा = सांप्रतचा, सांप्रतकाळचा. ये मातुचा विसंवाद = या गोष्टीचा, कथेचा विरोध दिसतो- (३८). चिरित्र-चरित्र = जीवनकार्य, पराक्रम, सदाचरण, कृत्य, अवस्था, स्थिति, चरित, स्वभाव, आचरण-चरित्र, इतिहास-. येकि हेळा = एकदम, एकेवेळीं, एकदां, एकाच वेळीं, एकदम (३९). हिचि मात आघवी = अशी ही सर्व गोष्ट. परियसे-परियेसे = ऐकेन. जें तुवांचि तयां रवि केंवि-जें कां तुंवा तया रवी = जे कां तुम्ही त्या रवीस-विवस्वतास-(४०).

तेव्हां तेथें यावर अर्जुन म्हणत आहे, श्रीहरी, हे कृपानिधी, ऐकावें कीं, माय ती–आई ती–आपल्याचा स्नेह करतेच, पोटींचें प्रेम तें एका आईजवळच, तेथें विस्मय तो कसचा, अहो श्रीहरी मायबापा (कृपानिधि)! . . . .(३२)

आम्हां अनाथ जीवांची–संसारांत श्रांत झालेल्यांची, म्लान झालेल्यांची, दमलेल्यांची कीं, तुम्हीं अहो माउली, साउली आहांत! आम्हांस प्रसवली ती तुमची कृपाच एक! –आम्हीं अनाथ जीव, पण कृपाच तुमची आम्हांस जगवीत आहे, तुमच्या कृपेनेंच आम्हीं जगत-वांचत आहोंत–जीवन जीवित प्रसवून, ती आम्हांस वांचवीत आहे. अहो, ह्या अमृतदृष्टीच्या कृपेचें, नवलाचें असें देणें तें, परम परम रहस्याचें असें तेंच आपण आथी, कृपापीयूष असे होत. (३३)

अहो देवा! तुम्हांस ठाऊक आहेच कीं, एकादे पांगुळ वीलें–वीयालें–जन्मलें तरी जन्मलेल्याचा–जन्मभर त्याचा जोजार साहणें होतेंच, असें हें तुमचेंच म्हणणें आहे–व तें तुमचें तुम्हांपुढें बोलावें तें कशास? . . . . (३४)

आतां यावर मी कांहीं एकादें पुसणें करीन–करीत आहें, तेथें बालकाचें जसें विचारणें म्हणून चित्त द्यावें–तसेंच येथें देवांनीं आतां माझा एक प्रश्न विचारण्यावर नच कोपावें–नच रागास यावें–अहो! (३५).

मागील वार्ता तुम्हीं अनंतांनीं सांगितली होती, ती तर माझ्या मनाला मुळींच मानवेना–माझें मन तें मानीत नाहीं–माझें चित्त क्षणभर का होईना, पण तें मनावर घेण्याचें करीना–मानण्याचें–मान्यतेचें करीचना! (३६)

कारण काय तर, जो कांहीं कोण तो कसा–कसला–कसचा हें तर वाडवडिलांनाहि माहीत–ठाऊक नाहीं, कसचें तें हें माहीत नाहीं; तर तुम्हींच केव्हां व कसचा उपदेश केलेला म्हणावा तो! . . . . (३७)

तो रवि तर अहो बहुत बहुत काळाचा जुना पुराणा, पुरातनचा असा, काळचा काळही लोटला असेल; त्याच्या असण्यानें तें, आणि तुम्हीं तर श्रीकृष्ण भगवान् अगदीं सांप्रतचे–सांपैचे–असे (सां+पैस+चे) आणि या कारणास्तवच मुळीं ह्या उपदेशासंबंधींचा एक विसंवादच होत आहे, येत आहे, होऊन येत आहे. (३८)

त्याचप्रमाणें पाहावें तो हे देवा! श्रीकृष्णा! श्रीकृष्ण (दिव्यते असौ सः) भगवान् तुमचें हें चरित्र मला तर कांहींच समजत–जाणवत नाहीं. तुम्हालासुद्धां ह्या श्रीकृष्णाचें चरित्र श्रीकृष्ण जे भगवान तुम्हीं–त्यांनींहि जाणणें नाहीं–व असें आहे तर मग हें खोटेंनाटें, लटकें आहे असें म्हणावें तरी कसें? –येकि हेळा–एकदमच्या एकदम तें! (३९)

पण हीच गोष्ट–मात–बुद्धि–सर्वच्या सर्व मी ऐकेन–परिसेन, समजेन–माझ्या जाणीवेंत उतरेल अशी बेताबेतानें सांगावी, जें का काय तुम्हीं त्या रवीस केव्हां, कसा, कसचा तो–उपदेश तो केला म्हणावा तें. . . . (४०)

श्रीभगवानुवाच—

**बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।**
**तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥**

[व्यतीतानि = होऊन गेलेले. न त्वं वेत्थ = तुला त्याचें ज्ञान नाहीं; तूं तें जाणत नाहींस.]

**अन्वय :** अर्जुन, तव मे च बहूनि जन्मानि व्यतीतानि। अहं तानि सर्वाणि वेद, परंतप, न त्वं वेत्थ।

**अर्थ :** हे अर्जुना, तुझे व माझे अनेक जन्म झालेले, ह्या भूमीवर, ते मी माझी ज्ञानशक्ति मायेनें, द्वैत भक्तीनें आच्छादित नाहीं म्हणून सर्व जाणतों–त्याचें स्मरण मला आहे. हे परंतप! तूं कांहीं ते (मायेमुळें) जाणत नाहींस (५).

**तंव श्रीकृष्ण म्हणे पंडुसुता । तो विवस्वत जै होता ।**
**तैं आम्हीं नसो ऐसि चित्ता । भ्रांति जरी तुज ॥ ४१ ॥**

**जरी तुं गा हें नेणसि । पैं जन्में आम्हां तुम्हांसि ।**
**बहुतें गेलि परि न स्मरसि । आपुलि तुं ॥ ४२ ॥**

**मी जेणें अवसरें । जें जें होऊनि अवतरें ।**
**तें समस्तेंहि स्मरें । धनुर्धरा ॥ ४३ ॥**

भ्रांति = भ्रांति, मिथ्या मति, भ्रम (४१). जन्में आम्हां तुम्हांसि–आम्हा तुम्हासि = अनेक जन्म (४२). आपलि–आपुलि न स्मरसि तुं = तुला ती स्मरत नाहींत. जेणें–जेणें जेणें अवसरें = ज्या ज्या प्रसंगीं. अवतरें = अवतार घेतों. (अव+तॄ = उतरणें). समस्तेंहि–समस्तही = सर्व (४३).

श्रीकृष्ण म्हणतात कीं, हे पंडुसुता, जेव्हां, ज्याकाळीं तो विवस्वान होता, तेव्हां त्यावेळीं–काळीं आम्हीं नसूं अशी जर का तुझ्या चित्ताला भ्रांति वाटते.... (४१)

जर का तुझ्या हें जाणिवेंत येत नाहीं–तुझें चित्त हें नेणतेंपण घेऊन आहे–पण असें समज कीं, तुम्हां-आम्हांस जन्में तीं बहुत बहुत गेलेलीं, पण तीं आपलीं जन्में तूं नच स्मरत आहेस–अनेक जन्म तुला ते स्मरत नाहींत–तुला त्यांचें स्मरण नाहीं. (४२)

हे धनुर्धरा! मी ज्या ज्या अवसरानें, प्रसंगीं, संधीस अथवा योग्य काळीं जें जें कांहीं होऊन उतरतों, अवतरतों, अवतार घेतों (स्वाधीन होतों), तें सर्व कांहीं (–समस्त–समस्त–) मी आठवतों, स्मरतों–सर्व, एकीभूत, संयोग, पूर्णता, सलोखा केलेला जो–

**अभंग**

पंडारा दाऊनियां थोकसी । देखिलेंपण केवीं जाये अंग लपविसी ।
तरी वेधा काय करिसी । मा शहाणपण तुझें नव्हे रे गोंवळा ॥ १ ॥
आम्हीं येकवीध जीवें तुंवा केले आधातुरें ।
वर्षावो वोसरलिया वोल्हासु जाय ।
तैसी न होत प्रेमळ उखरें गोंवळा ॥ २ ॥
देठीं गुंफलिया फुलें डाळलिया आहाच तंव कांहीं न दिसे रे ।
परी घ्राण इंद्रियांच्या अंगसुखा समर्थ कोण असे रे गोंवळा ॥ ३ ॥
या बोला मानवोनी बापरखुमादेविवरें विठ्ठलें दिधलें आपआपणियांते ।
तैपासुनी तें लपणेंची पारुषलें उभा पंढरिये येणें वेषे रे गोंवळा ॥ ४ ॥

स्मृतीस आणतों, (साहित्यशास्त्रामधील अलंकारच कसे), स्मरण मला असतें. (४३)

**अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।**
**प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥**

[अजः अपि सन् = नच जन्मणारा जरी. अव्ययात्मा = अविनाशी. (खर्च न होणारा = ज्ञान-शक्तीनें क्षीण न होता, परिपूर्ण असाच नेहमीं असणारा–) आत्मा. भूतानाम् ईश्वरः अपि सन् = भूतांचा–

जीवांचा व दृश्य वस्तूंचा ईश्वर, स्वामी, कर्ता तरीसुद्धा. स्वाम् प्रकृतिम् अधिष्ठाय = आपल्या त्रिगुणात्मक प्रकृतीचा–मायेचा आश्रय करून. आत्ममायया संभवामि = स्वतःच्या मायेनें युक्त होऊन ईश्वरी शक्तीनें, चिन्मय अशा चिदानंद रूपानें, संभवतो, जन्मतो.

**अन्वय :** अव्ययम् आत्मा अजः अपि भूतानाम् ईश्वरः अपि सन् (त्रिगुणात्मक) स्वाम् प्रकृतिम् अधिष्ठाय आत्ममायया संभवामि ।

**अर्थ :** अविनाश जन्मरहित असा, जीवांचा (यच्चयावत् दृश्य वस्तूंचा) भूतांचा ईश्वर स्वामी सर्व शक्तीमान असा–आत्मा असूनसुद्धां आपल्या मी त्रिगुणात्मक ईश्वरी शक्तीचे, प्रकृतिचे अधिष्ठानानें–आत्ममायेनें (चिन्मय असा) संभवतों, उद्भवतों (६).

**म्हणोनि आघवें । मागील मज आठवें ।**
**मि अजहि परि संभवे । प्रकृतियोगें ॥ ४४ ॥**
**माझें अव्यय तत्त्व तरि न नासे । परि होणें जाणें येक दिसें ।**
**तें प्रतिबिंबें मायावसें । माझाचि ठाईं ॥ ४५ ॥**
**माझी स्वतंत्रता तरि न मोडे । परि कर्माधीन अैसा आवडे ।**
**तेंहि भ्रांति बुद्धि तरि घडे । येऱ्हवीं नाहीं ॥ ४६ ॥**
**किं येकचि दिसें दूसरें । तें दर्पणाचेनि आधारें ।**
**यऱ्हविं काय वस्तुविचारें । दुजें आहे ॥ ४७ ॥**
**तैसा अमूर्तचि मी किरीटी । प्रकृति जैं अधिष्ठि ।**
**जैसा का नट नटे नटी । कार्यालागीं ॥ ४८ ॥**

आघवें-हें आघवें = सर्व हें. मि–मी. अजहि परि संभवे = अजन्मा तरी मी जन्मतों. प्रकृति = मूळधर्म, स्थिति, स्वभाव, वंश, कुळ, मूळ कारण, योनि, ब्रह्म, शब्दाचें मूळ, रूप, माया, अविद्या, कित्ता, त्रिगुणाची साम्यावस्था, जीवन, वासना, शिस्न, योनि, आई, प्रजा, राज्य, सात अंगें, राजसमूह, सांख्यांचीं मूळतत्त्वें. प्रकृति-आपद = शुद्धिवर येणें. प्रकृति-भज = मरणें, प्रकृति-पुरुष = कारभारी, प्रधान. प्रकृति-मंडळ = राजसमूह, प्रजासमूह. प्रकृतिमत् = सात्त्विक, मूळचा. प्रकृतिविद्ध = सहज, स्वाभाविक. प्रकृतिस्थ = (१) मूळचे निरोगी. (२) बद्ध झालेला. (३) शुद्धिवर आलेला. प्रकृतियोगें = आदिमायेचा अंगिकार करून–[३](४४). अव्यय तत्त्व–अव्ययत्व = अविनाशपणा. तत्त्व = सत्य, वस्तुस्थिति, खरें स्वरूप, मूलतत्त्व, परब्रह्म, परमात्मा, मन, शरीर. तत्त्वज्ञ, तत्त्वविद् = तत्त्वज्ञानी, वेदांती. तत्त्वज्ञान = यथार्थज्ञान, ब्रह्मज्ञान. तत्त्वसंख्यान् = सांख्यमत. न नासे–न नसे = नाश पावत नाहीं. होणें जाणें एक दिसें = उत्पन्न होणें व जाणें एकरूप दिसतें. स्वस्वरूपीं मायावसें प्रतिबिंबें = मायेच्या योगानें आत्मस्वरूपातच प्रतिबिंबतें (४५). स्वतंत्रता–स्वतंत्रता ( =आधीनता). कर्माधीन अैसा आवडे = स्वाधीन कर्माच्या असा आवडणारा. भ्रांति बुद्धि तरि घडे = बुद्धि भ्रमली, संशयाची झाली, मोहांत पडली, तरच घडते–(४६). वस्तुविचारें = वास्तविकतः, वस्तूचा विचार केला तर. वस्तु = सत्य पदार्थ, स्वभाव, सत्त्वांश. विचार = युक्तायुक्त विचार, चर्चा, चौकशी (४७). अधिष्ठि प्रकृति जैं = मायेचा आश्रय करतो; मायायुक्त होतो. जैसा का नट नटे नटी–तैं साकारपणें नट नटी = कार्यासाठीं जसा नट नटत्वें नटतो–(४८).

[३]प्रकृतियोगें–प्रधानम्, प्रकृतिः इति २ सत्त्वादिगुणसाम्यावस्थायाः । संसिद्धिः, प्रकृतिः, स्वरूपम्, स्वभावः, निसर्गः, इतिः ५ स्वभावस्य । पौराणां श्रेणयोऽपि प्रकृतयः स्युः इति २ । स्वामी, अमात्य, सुहृत्, कोशः, राष्ट्रम्, दुर्गम्, बलम् इति ७ राज्याङ्गानि; एतान्येव प्रकृतिशब्दवाच्यानि स्युः । योनौ लिङ्गे च प्रकृतिः । संगतिः संगम योगशब्दः ।

आणि म्हणून मागील, जुनें, पूर्वीचें सर्व कांहीं अवघें-जें जें कांहीं सर्व घडलेलें तें मजला आठवाचें असतें-मी जन्मरहित "अज" तरी प्रकृतीच्या योगेंकरून, आदिमायेचा आश्रय करून, मी संभवे-जन्म घेतों, जन्माचा (हेतु) होतों-उचितपण ऐश्वर्य ज्ञान इत्यादींचा होतो. (४४)

माझें अव्यय-(शाश्वत, अविनाशी, खुशाल, सुरक्षित) असें ब्रह्मतत्त्व (सत्य), तें तर मुळींच बाधा का नाश पावत नाहीं-नासत, बिघडत, मोडत नाहीं; पण जें कांहीं उत्पन्न होतें, जन्मतें, जातें, वगैरे तें एकत्वेचें (एकच, एकरूप) दिसतें, व तें मायेच्या योगेंकरून माझ्याच ठिकाणीं म्हणजे आत्मरूपांतच प्रतिबिंबित झालेलें दिसतें. (४५)

माझी स्वतंत्रता-दुसऱ्याच्या आधीन नसणें जें, वयांत येणें जें, कर्ता (असें जें कांहीं व्याकरणांत येणारें), ती नच मोडते, पण कर्माच्या सर्वथैव आधीन असाच दिसतो, असतो, आवडतो, व तेंही तसें घडतें जर का बुद्धि ही भ्रांत, भ्रमाची, मिथ्या मतीची जर का झाली असेल तरच फक्त-येऱ्हवीं नाहीं- (४६)

तें भ्रमाचें कसें म्हणावें तर, दर्पणांत पाहण्यानें का आरशाच्या आधारावर, एक जें सरळ तें तर दुसरें (तिसरें)च एक असें दिसतें. येऱ्हवीं वस्तुविचारानें-वस्तुसंबंधीं विचार केला तर-वास्तविक पाहिलें असतां तेथें दुजें नाहींच! (४७)

तसा मी अमूर्तही (अव्यक्त-आत्मस्वरूपाचें-निर्गुण अविनाशीपण)-देहधारी नसूनही, आत्मस्वरूप, अव्यक्त, आदि असूनही, हे किरीटी, जेव्हां का, जर का प्रकृति अधिष्ठित होतो, मायायुक्त होतो, मायेचा आधार करतो, तेव्हां जसा का नटच एक, नट का नटी होऊन कार्यासाठीं साकारपणें नटतो. (४८)

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥**

[ग्लानिः = थकवा, दुबळेपणा, उतरती कळा. अभ्युत्थानम् = उत्कर्ष, उठणें. सृज् = उत्पन्न करणें.]

**अन्वय :** भारत, धर्मस्य ग्लानिः यदा यदा भवति, अधर्मस्य अभ्युत्थानम् भवति, तदा आत्मानं सृजामि अहम् ।

**अर्थ :** हे भारता, धर्माची ग्लानि, थकवा, उतरती कळा-हानी-जेव्हां जेव्हां होते, अधर्माचा पगडा बसतो, उत्कर्ष होतो: अधर्म मोहिमेवर निघतो, अधर्म युद्धाची तयारी करतो, अधर्मच आपल्या सन्मानार्थ उठतो, तेव्हां मी आपल्याला उत्पन्न करतों (७).

**हे धर्मजात आघवें । युगायुगिं म्यां रक्षावें ।**
**ऐसा बोल हा स्वभावें । आद्य असे ॥ ४९ ॥**

**म्हणोनि अजत्व परतें ठेवि । मी अव्यक्तपणहि नाठवि ।**
**जे वेळीं धर्मातें अभिभवि । अधर्म हा ॥ ५० ॥**

धर्मजात = सर्व प्रकारचे धर्म. युगायुगिं-युगीयुगीं-युगायुगीं = प्रत्येक युगाचे ठिकाणीं-प्रत्येक युगीं, युगामध्यें. (युग+अयुग = युगायुगीं. अयुग = विश्वोत्पत्ति, पूर्वीचा काळ, एकटा. अयुग अर्चिस् = अग्नि. अयुगनेत्र = शंकर. अयुगबाण = मदन. अयुगवाह = सूर्य.) रक्षावें = रक्षणाचें करावें. बोल = ध्वनि, आवाज. बोल (दोष)-ओघ (प्रवाह). ओघ (प्रवाह) = जल इत्यादींचा ओघ; वाहणें; प्रवृत्ति; व्यवहार; अखंडपणा. स्वभावें = सृष्टिक्रम. आद्य = मूळामध्यें, पहिल्यांदा, आरंभापासून, प्रारंभींचा (विष्णु). (आदिः, पूर्वः, पौरस्त्यः, प्रथमः, आद्यः इति ५ आद्यस्य। पौरस्त्यः = पूर्वेकडील, मुख्य, आधींचा) (४९). म्हणोनि-म्हणौनि. अजत्व परतें ठेवि = न जन्मणें, जन्मरहितपण बाजूस ठेवतो. (अज-शुभः, छागः, बस्तः, छगलकः,

अजः इति ५ अजस्य । विष्णुहरौ, छागोबस्तः एते अजाः।) अव्यक्तपणहि नाठवे = इंद्रियांना अगोचर (सां.), प्रधान, निराकारत्व–निराकारपण–अविनाशित्व–(पलीकडे) माझें मी आठवीत नाहीं. अव्यय = ब्रह्म, खुशाली, शाश्वत, सुरक्षित. अव्ययीभाव = अविनाशित्व, न खर्चणें. अव्यक्त = अजितश्चाव्यक्तश्चेति विष्णावपि वर्तेते। अधर्म धर्मातें अभिभवि = जेव्हां हा अधर्म–पाखंड, नास्तिक. धर्म-धर्मास–पूर्वींच्या सदाचारास–जिंकतो, व्यापतो; अधर्म धर्माचा पराभव करतो; अधर्म धर्माचा ऱ्हास करतो. (ऱ्हास = क्षय, नाश,–आवाज, टंचाई.) (५०)

अवघे हे धर्मजात–सर्व प्रकारचे धर्म–म्यां युगायुगीं–प्रत्येक युगाच्या ठिकाणचे ठिकाणीं रक्षावें असा हा सृष्टिक्रमाचा बोल–ओघ आरंभापासून आद्य असा स्वभावेंकरून कीं– (४९)

माझें (अजत्व) नच जन्मणें जें तें कीं बाजूस पलीकडे ठेवतो–(नच जन्मणेपणें जन्मतां) माझें निराकारत्व, निर्गुणत्व अव्यक्तपणही म्हणजे अविनाशित्व मी आठवीत नाहीं; जेव्हां का अधर्म, नास्तिक पाखंड धर्म जो, तो धर्मास–सदाचारास शह देतो, व्यापतो, पराभवितो, जिंकतो, अभिभवतो. (५०)

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

[ त्राहे = रक्षण कर ! (आत्राटिल / आत्राटणें × अस्फुरिला / आस्फुरणें) त्राहविली = त्रासविली. त्राहाटवणें = प्रतिष्ठेस चढविणें. परित्रास = भीति : [ परित्राणः अ. ८५४ = १) रक्षण. २) स्वसंरक्षण. ३) मारणाऱ्याला निवारणें ]; त्राणं (त्रै) रक्षित [ त्र–त्रै–रक्षणारा (आतपत्र); त्रायणं = रक्षण. १) रक्षण. २) आश्रय. ३) चिलखत ]. साधु = चांगलें, योग्य, गुणी, पुण्यशील, सद्वर्तनी, प्रिय, कुलीन, निर्दोष, शुद्ध, साधुसज्जन, (व्यापारी, सावकार); (साध्वी, पतिव्रता), कल्याण, शाबास–(साधुकार = स्तुति. साधुदोहा = दुधाळ गाय. साधुधी = सासू. साधुमत् = सुखी. साधुवाह–वाहिन् = शिकविलेला घोडा.) विनाशाय च दुष्कृताम् = विनाश = नाश, नश्वर- *जगत्कार्य ब्रह्म, अदर्शन*, गुप्त होणें. *विनाशउन्मुख = नष्टप्राय. विनाशधर्मन् = नाशिवंत, अस्थिर.* धर्मसंस्था-पनार्थाय = (धर्म = पुण्यकर्म, चाल, संप्रदाय, प्रावीण्य, आचार, शास्त्रोक्त कर्तव्य, न्याय, नीति, योग्यता, स्वभावगुण, विशिष्ट गुण, सादृश्य, यज्ञ, वेदरहस्य, (उपनिषद), यम, धनुष्य, आत्मा, अहिंसा, सत्संग, जीव. स्थापन = (संस्था = आज्ञा पाळणें, थांबविणें, स्थिर राहणें, स्थापणें, ठेवणें, सांत्वन करणें) = आधार होणें, स्थिर करणें, स्थापन करणें, व्यवस्था करणें, चित्तैकाग्र्य, घट्ट रोंवणें, आवळणें, पुंसवन संस्कार. सम् = सहित, बरोबर, पूर्ण, पुष्कळ, अति, सारखे, समोर. दुष्कृतं = दुष्कृतिः = १) पातक. २) दुष्ट कृत्य. दुष्कृत्, दुष्कृति = पापी, दुष्ट. संभवामि = उत्पन्न होणें, शुद्ध करणें, मिसळणें, संभवणें, मिळविणें, मिळणें, समर्थ असणें, संयोग पावणें, सेवन करणें, विचार (तर्क) करणें, मानणें, समजणें, पूजा-सत्कार करणें, शक्य असणें, उपभोगणें, जवळ जाणें. युगे युगे = प्रत्येक युगामध्यें.]

**अन्वय :** साधूनां परित्राणाय । दुष्कृताम् विनाशाय । च । धर्मसंस्थापनार्थाय । युगे युगे । संभवामि ॥

**अर्थ :** साधुसज्जनांच्या रक्षणासाठीं, दुष्ट कृत्याचा नाश करण्यासाठीं आचार, शास्त्रोक्त कर्तव्य, नीति, न्याय स्थापण्यासाठीं, स्थिर करण्यासाठीं, प्रत्येक युगामध्यें मी उत्पन्न होतों (८).

**तें वेळि आपुल्याचेनि कैवारें । मि साहाकार होउनि अवतरें ।**
**मग अज्ञानाचें आंधारें । गिळूनि घालि ॥ ५१ ॥**

**अधर्माचि अवधि तोडि । दोषाचि लिहि फेडि ।**
**सज्जनांकरवि गुढि । सुखाचि उभवि ॥ ५२ ॥**

**दैत्यांची कुळें नाशी । साधूंचा मान गिंवसी ।**
**धर्मासी नीतीसी । शेस भरी ॥ ५३ ॥**

**मी अविवेकाचि काजळि । फेडूनि विवेकदीप उजळि ।**
**तैं यागिया पाहे दिवाळि । निरंतर ॥ ५४ ॥**

**मग सत्सुखें विश्व कोंदें । धर्म जगिं नांदें ।**
**भक्तासि निघति दोंदें । सात्विकांची ॥ ५५ ॥**

**तैं पापाचा अंचळ फिटे । पुण्याचि पाहाट फुटे ।**
**जैं मूर्ति माझी प्रगटे । पंडुकुमरा ॥ ५६ ॥**

**ऐसेयां काजालागिं । अवतरें मि युगायुगीं ।**
**परि हेंचि वोळखे जो जगिं । तोचि विवेकिया ॥ ५७ ॥**

आपुल्याचेनि = निजभक्तांच्या, स्वजनांच्या, माझे आपुले जे सज्जन त्यांच्या. कैवारें = अंगिकारानें, पक्षानें, कैवारानें, निश्चयानें. साहाकार–साकार = आकार धारण करून. साहाकार = मदतनीस. आंधारें = अज्ञानाचा काळोख. गिळूनि घालि = टाकून देतो, टाकतो (५१). दोषाचि लिहि फेडि–लिहिली फाडी = पातकाच्या सनदा फाडून टाकतो, धर्मविरुद्ध लिखाणाचा नाश करतो. अधर्माचि अवधि तोडि = (अवधि = वेळ, सीमा, मर्यादा) अधर्माची वेळ मोडतो, तोडतो–धर्मविरुद्ध आचारांची हद्द नाहींशी करतो. सज्जनांकरविं सुखाचि गुढी उभवी = साधुसज्जनांकडून सुखाच्या ध्वजपताका उभारतो; धार्मिक सदाचारी भक्तांकडून धर्माचा विजय–गुढी, ध्वज–उभारतो (५२).

दैत्यांची कुळें नाशी = धर्मास अपाय करणारे जे दुष्ट, त्यांचीं कुळें सर्व नाहींशी होतात, पळून जातात. दैत्यदेव = वरुण, वायु, दितिपुत्र, मद्य औषध. साधूंचा मान गिंवसी = साधूंचा मान शोधून देतो, देववितो; सज्जनांना पुन्हां सन्मान प्राप्त करून देतो. धर्मासी नीतीसी । शेस भरी = धर्म व नीतीचें लग्न लावतो, त्यांना एकत्र नांदावयास लावतो–धर्म व सदाचार, सत्य यांचें ऐक्य करतो. (शेस = मळवट भरणें) (५३). अविवेकाचि काजळि । फेडूनि विवेकदीप उजळि = (अविवेकाचि = अविचाराची, अज्ञानाची. काजळि = अंधार, अज्ञान.) = शुद्ध होणें, प्रकाशित होणें. तैं यागिया–योगिया. पाहे = उजाडें, प्रकाशतें. निरंतर = नित्य, सतत (५४).

मग सत्सुखें–स्वसुखें = स्वतःच्या सुखानें, आनंदानें, आत्मसुखानें. सत् = मूर्त व्यक्त पृथ्वी आप तेज सुख आनंद. विश्व कोंदें = (विश्व = स्थूलदेहाभिमानी जीव–जग सर्व) = स्वर्ग-आनंदाच्या योगें दाटपणें भरतें. धर्म–धर्मचि जगीं नांदे = सुखानें राहतो, व्यवहार करतों. भक्तासि–भक्ता निघति दोंदें सात्विकांची = (दोंद = मोठें पोट, पोट सुटलेलें) भक्तरूपी सात्विक भावाची, सामर्थ्याची, कसाची, सत्त्वगुणाची, सुखाची पोटें सत्त्वगुणांनीं परिपूर्ण होतात (५५). तैं पापाचा अंचळ फिटे = (अंचळ = पदर, ओंचा–अचळ = अचळ = डोंगर. फिटे = मुक्त होणें). पापाचा पदर, ओंचा, डोंगर नाहींसा होतो, सुटतो. पुण्याचि पाहाट फुटे = (पाहाट = प्रभातकाल) सत्कार्य सदाचाराची, धार्मिक नैतिक गुणांची पहाट होते–प्रभातकाल उगवतो. जैं मूर्ति माझी प्रगटे = जेव्हां माझी मूर्ति, प्रतिमा, आकार, रूप, उघड स्पष्ट, जाहीर होतें. पंडुकुमरा–पांडुकुमरा (५६). ऐसेयां काजालागिं = कामां, उपयोगाकरितां, प्रसंगीं वेळ पडेल तेव्हां. अवतरें मि युगायुगीं–युगीयुगीं = युगायुगीं मी अवतरतों, खालीं पृथ्वीवर येतों, प्रकट होतों, उघड होतों. विवेकिया = विचारी, समंजस, तत्त्ववेत्ता (५७).

तेव्हां मी आपुल्याचेनि-स्वजनांच्या-निजभक्तांच्या कैवारानें-पक्षानें मी आकार धारण करून, साकार होऊन, अवतरतों व मग अज्ञानाचे अंधारे, अज्ञानाचा काळोख गिळून टाकतों, गिळून घेतों, गिळून घालतों (५१).

अधर्माची अवधि-धर्माविरुद्ध आचाराची सीमा-हद्द तोडून नाहींशी करतों-दोषाचि लिहि फेडी = धर्माविरुद्ध लिखाणाचा नाश करतों-सज्जनांकडून, धार्मिक सदाचारी भक्तांकडून, धर्माचा विजयध्वज-गुढी-उभी करतों-उभारतों-पताका गुढी सुखाची ती उभवितों, उभारतों (५२).

धर्मास अपाय करणारे दुष्ट, त्यांचीं सर्व कुळें नाशाचीं करतों-साधुसज्जनांना पुन्हां सन्मान प्राप्त करून देतों-(साधूंचा मान गिंवसी), धर्म आणि सदाचार, सत्य यांचें ऐक्य करतों. धर्माचे नीतीशीं लग्न लावून (मळवट भरतों) व त्यांना एकत्र नांदावयास लावतों (५३).

नच सारासार विचार जो त्याची काजळी काढून टाकून टाकी व सारासार विचाररूपी-विवेकदिवा (दीप) उजळ करतों, तेव्हां अहो यागिया-यज्ञ करणारा तो त्यास तर निरंतरची अशी दिवाळीच होते. (५४)

तेव्हां त्या सुखानें विश्व कोंदकोंदून जाऊन धर्मच एक जगीं नांदूं लागतो, व भक्तांना तर-सारासार विचारांची व सात्त्विकाची, विवेकाची दोदेंच कीं निघूं लागणारीं होतात-भक्त सत्त्वगुणांनी परिपूर्ण होतात. (५५)

तेव्हां मग सहजच पापांचा डोंगर फिटला होतो; पुण्याची पहाट-प्रभातकाळ फुटतो; जैं म्हणजे जेव्हां का माझी मूर्ति हे पांडुकुमरा, प्रगटते. (५६)

ऐशिया काजालागीं-त्या असल्याच कीं कामाकरितां-कारणावर, युगांच्या युगीं अवतरतों; पण हेंच जो ओळखतो तोच कीं जगीं विवेकी, विचारी समजावा. (५७)

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥**

[जन्म कर्म च मे = माझे मायारूप जन्म, कर्म साधुरक्षण कर्तव्य अधिकार. दिव्यं = अलौकिक. पुनर्जन्म न एति = पुनर्जन्माला प्राप्त होत नाहीं. मां एति = मलाच मिळतो. तत्त्वतः यो वेत्ति = जो यथार्थ रीतीनें जाणतो. सः = तो. देहं त्यक्त्वा = देहधारणस्थिति सोडल्यावर.]

**अन्वय :** अर्जुन । यः मे दिव्यं । जन्म कर्म च । एवं तत्त्वतः वेत्ति । सः । देहं त्यक्त्वा । पुनर् जन्म न एति । माम् एति ।

**अर्थ :** हे अर्जुना! अशातऱ्हेचें माझें लोकोत्तर अलौकिक (असें मायारूपानें) जन्मणें, तसेंच (साधु-रक्षण-कर्तव्य) कर्म (अधिकार) जो यथार्थपणें जाणतो, तो देहधारण सोडल्यावर पुनर्जन्माला प्राप्त न होतां मलाच प्राप्त होतो-मजशींच मिळतो (९).

**माझें अजत्वें जन्मणें । अक्रियताचि कर्म करणें ।**
**हें अविकार जो जाणें । तो परममुक्त ॥ ५८ ॥**

**तो चालिला संगे न चले । देहिचा देहि नाकळे ।**
**मग पंचतत्त्वीं तत्त्वतां मिळे । माझाचि रूपीं ॥ ५९ ॥**

अजत्वें जन्मणें = न जन्मणेपणानें जन्मणें-माझें अजत्वानें जन्मणें. अक्रियताचि कर्म करणें = न करणेपणानें कर्म करणें, अक्रियतेनें कर्म करणें. अविकार = लिप्त न होणेचा गुण; ही विकार न पावणारी स्थिति जो जाणतो तो. परममुक्त = तो संसारबंधरहित असा मुक्तच (५८). संगे चालिला न चले = तो

चालला दिसून चालत नाहीं. देहिचा देहि नाकळे = देहि असून देहांत मिळत नाहीं. पंचतत्त्वीं–पंचत्वीं–माझाचि रूपीं तत्त्वतां मिळे = मरणकाळीं तत्त्वदृष्टया माझ्या रूपांतच मिळून जातो (५९).

माझें (अजत्वें जन्मणें) न जन्मणेपणानें जन्मणें, (अक्रियताचि कर्म करणें) कर्म न करणेपणानें कर्म करणें हे अविकार (लिप्त न होण्याचा गुण) जो जाणतो तो परममुक्त, संसारबंधरहित होय–समजावा. (५८)

तो चालत असलेला तरी चालत नाहीं, देहांत मिसळत नाहीं, देहांत असून कळत नाहीं, देहाचा देहाला मिळत नाहीं; व मग मरणकाळीं तर माझ्याच रूपामध्यें कीं मिळून जातो–. (५९)

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

[वीतरागभयक्रोधा = वीत म्हणजे नष्ट झालेले आहेत, राग म्हणजे विषयप्रेम, भय (= भीति), व क्रोधादि विकार ज्याचे. मन्मया = उपासनेनें मत्स्वरूप झालेले. मां उपाश्रिता = माझ्याच (गुरुत्वाच्या) आश्रयावर अवलंबून राहणारे. बहवः = पुष्कळ. (स्थितप्रज्ञ, पुण्यवंत). ज्ञानतपसा = ज्ञानतपाचरणानें. पूता = पवित्र होऊन. मत् भावं आगताः = माझ्या स्वरूपाला मिळालेले आहेत.]

**अन्वय :** बहवः । वीतरागभयक्रोधाः । मन्मया । माम् उपाश्रिताः । मन्मयाः । ज्ञानतपसा पूताः मन्मयाः । मद्भावम् आगताः ।

**अर्थ :** पुष्कळ (पुण्यवंत) स्थिरबुद्धीचे असे, नष्ट झालें आहे विषयप्रेम (राग), तसेंच भय, तसेंच क्रोधादि विकार ज्यांचे असे, माझ्या आश्रयावर अवलंबून असण्यानें, उपासनेनें मत्स्वरूप झालेले, ज्ञानतपाचरणानें पवित्र होऊन, माझ्या स्वरूपाला मिळाले आहेत (१०).

**ये-हविं परापर न शोचिति । जे कामनास्तु होति ।**
**वाटा केवळि न वचति । क्रोधाचियां ॥ ६० ॥**
**सदा मियांचि आथिले । माझियां सेवा ज्याले ।**
**किं आत्मबोधें तोषले । वीतराग जे । ॥ ६१ ॥**
**ते तपोतेजाची राशी । किं येकायतन ज्ञानासी ।**
**जे पवित्रता तीर्थासी । तीर्थरूप ॥ ६२ ॥**
**ते मद्भावा सहजें आले । मी तेचि ते होउनि ठेले ।**
**जे मज तया उरले । पदर नाहीं ॥ ६३ ॥**
**सांगे पितळेची गंधि कळिक । जैं फिटली होय निःशेष ।**
**तैं सुवर्ण आणीक । जोडु जाईजे ॥ ६४ ॥**
**तैसे यमनियमि कडसले । जे तपोज्ञानें चोखाळले ।**
**मि तेचि ते जाले । येथ संशय काईसा ॥ ६५ ॥**

परापर न शोचिति = मागील पुढील; (परकीय स्वकीय जनासंबंधीं), मी-माझेसंबंधीं उदासीन राहून शोक करीत नाहीं. कामनास्तु–कामनाशून्य = इच्छा नाहीं असा; कामिकतेचा अस्त झाला. क्रोधाच्या वाटांनीं, मार्गांनीं (न वचति) जात नाहींत. केवळि–कोण वेळीं–(६०). मियांचि आथिले सदा = मद्रूपतेनें सदा संपन्न. ज्याले माझियां सेवा = सेवेसाठींच कीं माझ्या जगले वांचले. जे वीतराग आत्मबोधें तोषले = निरिच्छ ते, संतुष्ट, आत्मज्ञानानें कीं–(६१). ते तपोतेजाची–तपोतेजाचिया राशी = तपें तेजें जीं अनेकशीं, त्यांची त्याच्यामध्यें राशीच एक. किं येकायतन ज्ञानासी = ज्ञानाचें एकच घर, एकच स्थान; ज्ञान तेंच एक गृह, घर का स्थान.

तीर्थरूपानें तीर्थांसी पवित्रता देणारे = तीर्थरूपत्वें तीर्थांना पवित्र करणारें, पवित्रता देणारें-(६२). सहजें ते मद्भावा आले=सहज माझ्या स्वरूपाचे झाले, स्वरूपाला आले. तेचि मी ते होउनि ठेले=मी तेच कीं, मी तेंच तें ज्ञान, ब्रह्म. जे मज तयां उरलें। पदर नाहीं = त्यांच्या माझ्यामध्यें अंतर का पडदा उरला नाहीं (६३).

पितळेची गंधि कळिक-काळिक सांगे = पितळेचा कळंक कीट. निःशेष-निःशेख फिटली जैं होय = सर्वप्रकारें फिटला, नाहींसा झाला तर. तैं आणीक-काई आणीक सुवर्ण जोडु जाईजे = अहो तेंच कीं सुवर्ण; तेथें दुसरें आणीक कुठचें तें सुवर्ण आणण्याची जरुरी नाहीं (६४). यमनियमि तैसे कडसले = अष्टांगयोगांनीं शुद्ध झाले. तपोज्ञानें चोखाळले जे = तप व ज्ञान (ज्ञानतपानें) यांनीं निर्मळ झाले. तेचि मि ते (मी) जाले = मीच ते झाले. परमात्मा जो मी-तेच कीं ते झाले. येथ काईसा-कायसा-कासया संशय = इथें संशय कसचा न् काय-तप = प्रकाशणें, तापणें, तप करणें जें, तपश्चर्या. ज्ञान = तत्त्व कळणें, जाणीव, जाणणें, ब्रह्मज्ञान. यमनियमरूपी अंगें = यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि (६५).

येऱ्हवीं पाहिले असतां, जे मागील पुढील कशाचाहि शोक करीत नाहींत, जे इच्छाशून्य अथवा कामना-शून्य-न इच्छितां सकाम उत्पन्न होत नाहीं-तसेंच क्रोधाच्या वाटेस जात नाहींत-केव्हांही क्रोधाच्या मार्गास जात नाहींत, जे नेहमींच्या नेहमीं-सदाची मद्रूपतेनें संपन्न .... (६०)

(मियांचि आथिले) माझ्या सेवेनेंच-सेवापणें-जगले वांचले-जियाले, अथवा असें म्हणूं कीं, असे ते वीतराग म्हणजे निरिच्छ ते एका आत्मबोधांतच-स्वतःसंबंधींची ज्ञानजागृति-प्रसन्नतेनें संतुष्ट असे संतोषले.... (६१)

ते तप व तेजाची रासच अथवा ज्ञानाचें सर्वथैव स्थान, एकच घर अथवा तीर्थरूप पवित्र असेच कीं-तीर्थांची पवित्रताच कीं म्हटले ते— (६२)

ते सहज स्वाभाविकपणेंच माझ्या स्वरूपाला आले-माझ्या भावास पावले-माझ्या भावरूपास आले. आतां मी तेच कीं ते असे झाले-होऊन आहेत-होऊन राहिले आहेत. कारण काय तर, त्यांच्या व माझ्यांत कमलाहि पदर-अंतर-पडदा नाहीं म्हणून. (६३)

सांगा कीं पितळेची कीड काळिका गंधि, जेव्हां का सर्वस्वीं निःशेष, संपूर्णपणें नाहींशी झाली होते, तेव्हां तर तें सुवर्णच कीं! काय आणीक दुसरें तिसरें सोनं काय आणखी जोडावें मिळवावें पाहावें लागतें? (६४)

त्याप्रमाणें जे कोणी कांहीं अष्टांगयोगामधीलची जी यमनियमरूपी अंगें, आठ योगांचीं तीं तेथें निर्मळ शुद्ध झालेले जे तपानें ज्ञानानें, अथवा तप म्हणजेच ज्ञानानें निर्मळ झाले-चोखाळले-ते तर मीच ते होत-मी तेचि ते झाले होत. येथें कसचा तो संशय! (६५)

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥ ११॥**

[ये = जे. *यथा* = ज्या भावनेनं (पेरावें तसें उगवतें). मां प्रपद्यन्ते = माझी आराधना करतात. (प्रपद = पादाग्रम्, प्रपदम् इति २ पादाग्रस्य।) तान् तथा एव = त्यांना तसेंच कीं मी. अहं भजामि = मीहि भजतों. (भजामि = मीच त्यांचे मनोरथ पूर्ण करतों. भजमानम् = युक्तम्, औपयिकम्, लभ्यम्, भजमानम्, अभिनीतम्, न्याय्यम् इति।) मनुष्याः सर्वशः = सर्वप्रकारें सर्व मनुष्यें. मम वर्त्म = माझ्या मार्गासच (वर्त्म-अयनम्, वर्त्म, मार्गः, अध्वा, पन्थाः, पदवी, सृतिः, सरणिः, पद्धतिः, पद्या, वर्तनी, एकपदी, इति १२ मार्गस्य।) अनुवर्तन्ते = अनुसरतात; माझ्या मार्गाला अनुसरून वागतात-वागवितात. (अनुवर्तते-अनुवर्तन-अनुरोधः अनुवर्तनम् इति २ आनुकूलस्य।)]

**अन्वय :** पार्थ, माम् ये यथा प्रपद्यन्ते । तान् तथा एव अहम् भजामि । मनुष्याः सर्वशः मम वर्त्म अनुवर्तन्ते ।

**अर्थ :** हे पार्था, जे मला जसे भजतात, त्यांना मीही तसेंच भजतों. मनुष्यप्राणी सर्वतः माझ्या मार्गासच अनुसरतात (११).

**येऱ्हवीं तरि पाहि । जे जैसें माते माझ्या ठायीं ।**
**भजति तयां मीहि । तैसाचि भजे ॥ ६६ ॥**

**देखे मनुष्यजात सकळ । हें स्वभावता भजनशीळ ।**
**जालें असें केवळ । माझां ठाईं ॥ ६७ ॥**

**परि ज्ञानाविण नासलें । जे बुद्धिमेदासि आलें ।**
**त्यासि एकचि यया कल्पिलें । अनेकत्व ॥ ६८ ॥**

**म्हणोनि अभेद् भेद देखति । यया अनामा नाम ठेविति ।**
**देवी देव म्हणति । अचर्चाते ॥ ६९ ॥**

**जे सर्वत्र सदा सम । तेथ विभाग अधमोत्तम ।**
**मतिवशे संभ्रम । विवंचिति ॥ ७० ॥**

येऱ्हविं-येऱ्हवी. तरि-तरी. पाहि-पाही. जे जैसें माते माझ्या ठायीं-जैसे माझ्या ठायीं. भजति-भजती-(६६). मनुष्यजात सकळ = मनुष्यमात्र; ह्या मनुष्यलोकांत नास्तिक कोणीच नाहीं. कारण-श्रद्धामयोऽयं पुरुषः [नु = १) स्तुति करणें. २) शक्यता, जणुं काय. मु = मनुष्य? (मनुष्यः). मु = मुख, मुखडा. मनुष्य-मनु-मननशील. मन् = पूजा करणें, मानणें, समजणें, मान देणें, विचार करणें. मनुष्य = मनुष्य, (मनुष्येंद्र, मनुष्येश्वर, मनुष्यदेव) मनुष्ययज्ञ = आतिथ्य]. स्वभावता = प्रकृति, सहजधर्म, मूळ गुण; मायेमुळें. भजनशीळ = (भजन = सेवा, पूजा, उपभोग, मालकी). भजनशील = स्वभाव, वर्तणुक, चरित्र, सुस्वभाव, सद्वर्तन. शुचौ शुद्धे चरित आचरणे शीलम् । जाले-जाहाले. केवळ माझां-माझ्या. केवळ = फक्त, पूर्ण. ठाईं-ठायीं. केवळ माझां ठाईं = फक्त माझ्याच की ठिकाणीं-(६७). परि-परी. ज्ञानाविण नासलें = नाशिले. जे बुद्धिमेदासि आलें-विविध धर्म-पद्धति = पण आपण सच्चिदानंदरूप आहोंत हें न कळल्यामुळें बुद्धीच्या ठिकाणीं भेद उत्पन्न होऊन ह्या मला एकालाच अनेकत्वें पाहतात (६८).

म्हणोनि-म्हणउनि. अभेद-अभेदि-अभेदी, भेद देखति = भिन्नपणा, प्रकार, स्थिति, गुह्य गोष्ट. अनामा-अनामया = नामरहिताला; चर्चा करण्यास अशक्य त्या मला. नाम-नामे. नाम = शंका, संभव, विस्मय, निंदा अर्थीं, प्रसिद्धि, नांव, खरेंच. नामन् = शब्द, नांव, व्याकरणांतील नाम. अनामक = आंगठीचें बोट. ठेवतात = करतात. देवी देव-देवी देवो. देव = दैविक, तेजस्वी, देव, ईंद्र, राजा, धर्म, पति, परमात्मा, इंद्रिय. देवी = देवी, दुर्गा, सरस्वति, पट्टराणी, अंगणांतील ओटा, ब्राह्मण-स्त्री. देवता = देव, मूर्ति. अचर्चाते = वर्णनातीत, अनिर्वाच्य जो मी त्या मला. चर्चा, चर्चिका = अभ्यास, खल, वाद, वादविवाद, विचार, (अंगउटी). चर्च् = बोलणें, चर्चा करणें, निंदणें, भूषविणें, शिकणें. चर्चन् = अभ्यास, घोकणें, उटणें लावणें. अचर+चर. अचर = स्थावर, वृषभ, सिंह, वृश्चिक व कुंभ राशी ह्या अचर म्हणजे स्थावर राशी होत. स्थावर = १) स्थिर, स्थूल शरीर, न हालणारे. २) अचल वस्तु, वृक्ष, स्थावर मालमत्ता. स्था+वृ = जगणें × आच्छादणें (६९). सदा सम सर्वत्र = सारखें, एक प्रमाण असलेलें. सदा = नेहमीं. सम = पूर्ण (सारखें, संपूर्ण, प्रामाणिक, सर्व, सह, एकत्र, एकाच काळीं). तेथें विभाग अधमोत्तम = उच्चनीच असे भेद तेथें. अधम = नीच, निर्लज्ज, विषयी, लंपट : [पतीचे वाईट चिंतणारी स्त्री. (स्त्री.)] उत्तम = मुख्य, श्रेष्ठ,

पहिला, शुभ, शेवटला. उत्तम अंग, गात्र = डोकें. उत्तमऋण = सावकार. मतिवशें–मतिवशे संभ्रम विवंचिति = बुद्धीस–मतीस वश होऊन भ्रमानें मानतात,–चिंता विचाराचे करतात. (विप्रलब्धः, वञ्चितः इति २ कर्मणं प्राप्तस्य) विभाग = वाटा, हिस्सा, तुकडा. मति = मन, बुद्धि, विचार, हेतु, निश्चय, अभिप्राय, आदर, सल्ला. (मत = सन्मानित, सत्कृत, संमत, मान्य, संमति, पंच, मत, अभिप्राय). संभ्रम = भ्रांति, उत्साह, त्वरा, भीतीमुळें होणारी धांदल, उद्वेग, भ्रम (७०).

येऱ्हवीं तन्हि असें पाहा कीं, जे कोणी माझ्या ठाईं–ठायाठाय–जसे भजतात–कृपा करतात, सेवा करतात, प्रेम करतात तयांना मीहि तसाच भजतों, अनुसरतों, संभोग करतों, अनुसरतों, वाटून घेतों–विभागतों. (६६)

असें पाहा–देखणेपणें देख कीं, सर्वेही मनुष्यजात म्हणून जी आहे, सकळ ही स्वभावतःच–(प्रकृति मूळधर्म जी माया, तिच्याच मुळीं मूळधर्माप्रमाणें) भजनशीळ–उपभोगरूपीच कीं सद्वर्तन म्हटलें–ती स्वाभाविक वर्तणूकच म्हटली असे ते केवळ माझ्याच कीं ठिकाणीं असे उपभोग स्वभावाचे झाले आहेत–श्रद्धमयोऽयं पुरुषः — (६७)

परंतु ज्ञानाशिवायच मुळीं, आपण सच्चिदानंदस्वरूप आहोंत हें न कळल्यामुळें, बुद्धि भेदाची होऊन एकाचे ठायीं अनेकत्व पाहतात; म्हणजे तत्त्व न कळल्यानें, जाणतेंपण नसल्यानें, केवळ नासले, नाशिले, नाहींसे झाले (नासले = दारावरचा भाग झाले?). कारण काय तर, त्यांची ती बुद्धि–अथवा जे का ते बुद्धिभेदाचे झाले–बुद्धीचे दास झाले–बुद्धीचे जे धर्म तेथें म्हणजे–जाणणें, ज्ञानशक्ति, ज्ञानविवेक, कल्पना, समजूत, जाणीव, हेतु, युक्ति, इत्यादींच्या ठायींचें होणें तें भेदास आलें–भोंक पाडलें गेलें,–फरकाचें झालें, बदललें, भिन्नभाव–नाश–द्वैत झालें, यया एकचि त्यासि–त्यांनीं अनेकत्व कल्पिलें म्हणून.... (६८)

......आणि म्हणूनच कीं, ते अभेद, न विभागलेले, एकरूप, साम्य, एकरूपतेचे जे, त्याचे ठायीं भेद, बदल, द्वैत, भिन्नतेचा भाव पाहतात, देखतात. ह्या अनामास–नाम नसलेल्यास–अनामन्, अनामक, आंगठीचें बोट, नाम ठेवतात; देवी देव ह्या अचर्चाते म्हणतात–म्हणजे जेथें बोलणेंच नाहीं, जें वर्णनातीत आहे, भूषविणें का निंदा करणें नाहीं अशास देव देवी म्हणतात. (६९)

जे सर्वत्र म्हणजे सर्व ठिकाणीं, सदा नेहमीं, सम पूर्ण (सारखे, संपूर्ण, प्रामाणिक, सर्व, सह, एकत्र, एकाच काळीं), तेथें अधम का उत्तम, उच्च नीच विभाग (वाटा, हिस्सा, तुकडा, अंश,) नाहींत–मतीस,–मन, बुद्धि, विचार, हेतु, निश्चय, अभिप्राय, आदर, सल्ला–स वश होऊन संभ्रम विवंचतात–विचार करतात, मानतात, फसवितात, भ्रमांत पाडतात, अडथळा करतात. (७०)

**कांक्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ।**
**क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥**

[कांक्षन्तः = इच्छा (इच्छा, कांक्षा, स्पृहा, इत्यादि) करणारे. यजन्त इह देवताः = ह्या लोकींच्या देवता अथवा ह्या लोकीं अग्नि, वरुण इत्यादि देवतांची उपासना करतात. क्षिप्रं = लवकर. मानुषे लोके = ह्या मनुष्यलोकीं. कर्मजा सिद्धिः भवति = कर्मापासून उत्पन्न होणारी सिद्धि, फलप्राप्ति, (लवकर) होते. कर्मणां सिद्धिं = केलेल्या कर्माचें फळ मिळावें अशी इच्छा–सिद्धि–]

**अन्वय :** कर्मणां सिद्धिं कांक्षन्तः इह देवताः यजन्ते । हि । मानुषे लोके कर्मजा सिद्धिः क्षिप्रं भवति ।

**अर्थ :** कर्माचें फळ मिळावें अशी इच्छा करणारे ह्या लोकींच्या देवतांची उपासना करतात; कारण ह्या मनुष्यलोकीं कर्म करण्यापासून होणारी फलप्राप्ति–सिद्धि–लवकर मिळते (१२).

मग नाना हेतु प्रकारें । यथोचिते उपचारें ।
मानलि देवतांतरे । उपासिती ॥ ७१ ॥
येथे जें जें अपेक्षित । तें तैसेंचि पावति समस्त ।
परि ते कर्मफळ निश्चित । वोळख तुं ॥ ७२ ॥
वांचुनि देते घेते आणिक । निभ्रांत नाही सम्यक ।
येथ कर्मफळसूचक । मनुष्यलोकीं ॥ ७३ ॥
जैसें क्षेत्रि जें पेरिजें । तें वांचूनि आन न निपजे ।
कां पाहिजे तेंचि देखिजें । दर्पणाधारें ॥ ७४ ॥
ना तरि कडया तळवटि । जैसा आपलाचि बोल कीरिटी ।
पडिसाद् होउनि उठि । निमित्तयोगें ॥ ७५ ॥
तैसा समस्ता यां भजना । मी साक्षीभूत अर्जुना ।
तेथें प्रतिफळें भावना । आपलाली ॥ ७६ ॥

नाना हेतु प्रकारें = अनेक उद्देश, साधन, निमित्त, सादृश्य भेदांनीं. यथोचिते उपचारें = योग्य रीतीनें; रम्य; पूजेच्या साहित्यांनीं, सत्काराच्या प्रकारांनीं, सेवांनीं. मानलि–मानिली देवतांतरे उपासिती = अनेक देव मानून उपासितात. मान् = गर्विष्ठ होणें, पूजणें, विचार करणें. (आस्+उप् = सेवा, उपासना करणें, सेवन करणें, आश्रय करणें, जवळ जाणें, बसणें, आचरणें, पाळणें, वेळ घालविणें) (७१). येथ–एथ. अपेक्षित समस्त तें पावती = इच्छित, (अगत्य, जरुरी) एकीभूत, सर्व तें त्यांना मिळतें, पोंहोचतें. कर्मफळ निश्चित ते ओळख = कर्मफळच निवांत, निर्धास्तपणें जाण. कर्मफळ = देवलाभ, परिणाम. निष्काम कर्मयोगाचे = संन्यासफळ सहज. कर्मफळाशी विटला = वैराग्य आलें (७२). वांचुनि देते घेते आणिक = शिवाय वास्तविक पाहतां आणीक जें जें कांहीं देतें घेतें असें तें. निभ्रांत नाही सम्यक = खरें पाहतां देणारा किंवा घेणारा कर्माशिवाय दुसरा कोणीहि नाहीं, हें निःसंशय (निभ्रांत). मनुष्यलोकीं कर्मफळसूचक येथ = येथें ह्या मनुष्यलोकीं कर्मच एक दर्शक, बोधक, सूत्रधार, (चहाडखोर का निंदक) (अप्रत्यक्ष कथनं सूचनं). सूचक = बोधक, चहाडखोर, निंदक, दर्शक; सुई, शिक्षक, सूत्रधार, कुत्रा, कावळा, कोंबडा, पिशाच्च (७३).

जैसें क्षेत्रि जें पेरिजें = शेतांत जें पेरावें जसें. तें वांचूनि आन न निपजे–आन निपजे = त्याशिवाय दुसरें नाहीं; दुसरें कांहीं नसतें, उपजतें, उगवतें–शेतांत पेरावें जें तेंच उगवणार, दुसरें नाहीं. पाहिजे तेंचि दर्पणाधारें देखिजें = आरशांत जें पाहावें तेंच दिसतें (७४). कडया तळवटि–कडेया तळवटी = डोंगराच्या कड्याखालीं. आपलाचि बोल निमित्तयोगं पडिसाद होउनि उठि = आपलेंच बोलणें निमित्तयोगें प्रतिध्वनि होऊन उठतें. निमित्त = निशाण, लक्ष, साधन, कारण. निमित्तकृत् = कावळा. निमित्त-ज = जोशी, ज्योतिषी. निमित्त-वर्म = प्रायश्चित्त. पडसाद = प्रतिध्वनि. पडिपाड–युक्ति, रीत. साद = खचणें, थकवा, कृशता, नाश, दुःख. सादन = थकवा, नाश, ऱ्हास, गृह. सादिन् = घोडेस्वार, रथस्वार, हत्तीवर स्वार. शब्द = आवाज, ध्वनी, पदवी, कीर्ति, व्याकरण (७५).

तैसा समस्ता यां भजना = तसा ह्या एकीभूत, सर्व भजनास–सेवेस, पूजेस, उपभोगास, मालकीस, विभागणें जें त्यास. भजणें = विभागणें, मालकी, सेवा, उपभोग, संभोग, प्रेम, कृपा. अर्जुना मी साक्षीभूत = (साक्षीन् = पाहणारा, साक्षीदार, परमात्मा) :: भूत = वास्तविक सत्य, खरें, नित्यसिद्ध वस्तु : मी हे अर्जुना साक्षीदार असा खरा परमात्माच–नित्यसिद्ध वस्तुच कीं खरें पाहिलें असतां. साक्षिभूत = साकार. तेथें प्रतिफळें भावना आपलाली = (आपलाली = ज्यांची त्यांची) "भावनेसारखें फळ मिळतें," हा महत्त्वाचा सिद्धांत ध्यानीं असावा. (भावना = कल्पना, भक्ति, निष्ठा, विचार, स्मृति, आठवण), (भावन = आकार देणें, हेतु, कल्पना, निष्ठा, तर्क, स्वभाव, तत्त्व, कृति, प्रयत्न, क्रिया). (फल+प्रति = प्रतिबिंब पडणें, उलट खाणें, फेड करणें)–(७६).

वर मग नाना अनेक हेतु–उद्देश, निमित्तसाधन तर्क, पुरावा,–धरून ठेवून करून, प्रकारांनीं, भेद-सादृश्यांनीं, यथायोग्य अशा साधनानें, पूजेच्या साहित्यानें, उचित अशा उपचारांनीं मानली–मानलेली–देवता–दैवतें–देवांचीं अंतरे निरनिराळीं, म्हणजे अनेक देव मानून उपासतात–उपासिती–सेवतात, सेवेचीं करतात; पूजन, अभ्यास, चिंतन, आसन इत्यादींचीं करतात (इजा × हिंसा)– (७१)

तेव्हां तेथें येथें, ह्या ठिकाणीं जें जें कांहीं–आशा, जरुरी, अगत्य, काळजी,–अपेक्षा केलेलें, तें तसेंच समस्त सर्व एकीभूत पावतात-पण असें हें जाण कीं, तें कर्मफळच एक असें निश्चित–ठरलेलें, निर्णय केलेलें, अपराधी ठरलेलें–ओळखावेस कीं तुंवा– (७२)

देतें का घेतें असें; देणारा किंवा घेणारा असा, आणीक कांहीं कर्मावांचून दुसरें कांहींहि सम्यक्–बरोबर असणारें, योग, प्रिय, बिनचूक– असें नाहीं, असें निभ्रांतपणें म्हणजे निःसंशय जाण. येथें ह्या मनुष्यलोकीं एक फक्त कर्मफळच कीं असें ह्या मनुष्यलोकानें सूचनेचें केलें (सूचक = बोधक, चहाडखोर, निंदकदर्शक), असें सुचविलें कीं, मनुष्यलोक हा म्हणजे कर्मफळच एक. कर्मफळ = मनुष्यलोकीं = मनुष्यलोक म्हणजे-[ सूचक = सुई, शिक्षक, सूत्रधार, कुत्रा, कोंबडा, कावळा, पिशाच, दर्शक का बोधक (चहाडी, निंदा)]. (७३)

शेत पेरावें जसें–शेतामध्यें जें पेरावें तेंच उगवणार, त्याशिवाय दुसरें कांहीं नच उपजणारें का निपजणारें; अथवा असें पाहा कीं, आरशांत जें पाहावें तेंच दिसतें; आरशाच्या आधारानें पाहिलें, पाहावें जें तेंच दिसणार केव्हांहि– (७४)

अथवा डोंगराच्या कड्याच्या तळीं, कड्याखालीं का गिरिकंदरामध्यें निमित्तमात्रेंकरून आपलेंच बोलणें–आपला शब्दच, आवाज, ध्वनि, पदवी, कीर्ति, व्याकरण-कीं हे किरीटी, प्रतिध्वनि, पडसाद (का पडशब्द ?) पडिसाद होऊन उठतो (उत्तिष्ठतो), ऐकूं येतो– (७५)

त्याप्रमाणें ह्या समस्त भजनाला–मी–हे अर्जुना, साक्षीभूत–साकार असा असून, येथें तर ज्याची त्याची जशी जशी भावना-[मनाचा भाव–मान–चित्तस्य समुन्नतिः परस्मात्उत्कर्षचिंतनेनौनायं मान उच्यते :: सवन–सुत्या, अभिषवः, सवनम् इति ३ सोमाभिषवस्यः (संधानम् अभिषवः इति २ मद्यसंधानस्य)] (सोमरस काढणें, यज्ञीय स्नान, दारू गाळणें)–(कल्पना, भक्ति, निष्ठा, विचार, स्मृति, आठवण) तशी, तशीच कीं त्याला ती भावना प्रतिफळणारी होते–(प्रतिफल, प्रतिफलन = प्रतिबिंब, फेड, सूड) फलद्रूप होते, सिद्धीस जाते. येथें भावनेसारखें फळ मिळणें, हा महत्त्वाचा सिद्धांत ध्यानीं धरावा. (७६)

**चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।**
**तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥**

[चातुर्वर्ण्य = १) सत्त्व, २) रज, ३) तम हे तीन गुण व ४) शम, दम, शौर्य, तेज, कृषि, वाणिज्य व सेवादि कर्में यांच्या भेदानें (विभागशः) परमेश्वरानें चार वर्ण उत्पन्न केले आहेत. गुणकर्मविभागशः – मया सृष्टं = मी–ईश्वरानें–निर्माण केले आहेत. मां तस्य अव्ययम् अकर्तारम् अपि कर्तारम् विद्धि = मलाच तेथीलचा अकर्तः ( = भेदनिवृत्ति, तादात्म्य), अव्ययम् ( = ब्रह्म, अविनाशी, शाश्वत, अविनाशित्व)–तरीसुद्धां कर्ताच कीं जाण—]

**अन्वय :** गुणविभागशः । कर्मविभागशः । मया चातुर्वर्ण्यं सृष्टम् । अपि मां । तस्य कर्तारम् । अकर्तारम् अव्ययम् विद्धि ।

**अर्थ :** गुणभेदानें–विभागानें, कर्मभेदानें–विभागानें, मीं चार वर्ण उत्पन्न केले–तेथचा कर्ता मी जरी तरी पण मला अकर्ता (भेदनिवृत्त), अव्यय (ब्रह्म) असाच जाण (१३).

**आतां याचि परि जाण । चाऱ्ही हे वर्ण ।**
**रचिले म्यां गुण । कर्मविभागें ॥ ७७ ॥**

**जे प्रकृतीचेनि आधारें । गुणाचेनि व्यभिचारें ।**
**कर्में तदनुसारें । विवंचिलि ॥ ७८ ॥**

**येथ येकचि हे धनुष्यपाणि । परि जाले गा चहूं वर्णि ।**
**ऐसि गुणकर्म कडसणि । केली सहजें ॥ ७९ ॥**

**म्हणोनि ऐकें पार्था । हे वर्णभेद संस्था ।**
**मी कर्ता नव्हे सर्वथा । याचिलागीं ॥ ८० ॥**

रचिले–सृजिले. गुण कर्मविभागें = त्रिगुण व कर्मभेदें चार वर्ण (निर्माण केले). (रच् = बनवणें, घडणें, रचणें, बसवणें, ठेवणें, शृंगारणें). सृज् = मोकळें पसरणें, (सृष्ट = निर्मित. सृष्टि = सृष्टपदार्थ जगदुत्पत्ति, जन्म, मूळधर्म, स्वभाव). गुण कर्मविभागें = हे चातुर्वर्ण्य माणसांनीं आपल्या सुखसोईसाठीं बनविले नसून मया सृष्टं–म्हणजे मी ईश्वरानें निर्माण केले आहेत (७७). प्रकृतीचेनि आधारें = प्रकृतीचा आधार घेऊन. गुणाचेनि व्यभिचारें = गुणांच्या मिश्रणानें. कर्मे तदनुसारें विवंचिलि = त्यावरच कीं कर्में–चिंता, विचार करून ठरविलेलीं आहेत. गुणाः सत्त्वरजस्तमः । प्रधानं प्रकृतिः इति (सत्त्वादिगुणसाम्यावस्थायाः) सत्त्वं, रजः, तमः, एते गुणाः प्रकृतेर्धर्माः । (संधि, विग्रहः, यानम्, आसनम्, द्वैधम्, आश्रयः इति षट् गुणाः ।); (मौर्वी, ज्या, शिंजिनी, गुणः इति ४ धनुर्गुणस्य ।). सूपकारः, बल्लवः, आरालिकः, आन्धसिकः, सूदः, औदनिकः गुणः इति ७ पाककर्तुः ।; (शुल्बम्, वराटकम्, रज्जुः, वटी गुणः इति ५ रज्जोः ।). (सत्त्वरज आदौ, शौर्यचातुर्यादौ, संधिविग्रहादौ इंद्रिये च गुणः ।) (७८). येथ–एथ. येकचि–एकचि. धनुष्यपाणि = धनुर्धरा. येकचि चहूं वर्णि जाले = मुख्य, तोच, निश्चळ, असामान्य, खरें–चार वर्णांनीं (झाले) आहेत. गुणकर्म कडसणि केली सहजें = सहजच मग गुणकर्म निर्मळ झालें असें केलें. (कडसणी = निर्मळ करणारी करणी) (७९). वर्णभेद संस्था = गुणकर्माप्रमाणें वर्णभेद व्यवस्था–संख्या मर्यादा धारणा स्थितिः. मी कर्ता नव्हे = तेथचा कर्ता मी नाहीं (८०).

चार वर्ण मीं उत्पन्न केलेले–गुणविभागाप्रमाणें व कर्मविभागाप्रमाणें ( = वाटा, हिस्सा, तुकडा, अंश, विभाग)–त्याचा कर्ताहि मीच आहें; जरी मी अकर्ता व अव्यय असलों तरी–कर्तारम्–मला जाण. याचप्रमाणें आतां असें जाण कीं, चारी हे वर्ण मियां सृजिले, उत्पन्न केले; कसे तर गुण व चारी वर्णांचें कर्म यांच्या विभागावर भेदानें...... (७७)

हें कसें होतें म्हणावें तर–कर्में प्रकृतीच्या आधारावर–(मानिलीं, ठरविलीं होतात). तीं गुणांच्या–सत्त्व, रज, तम–जे गुण प्रकृतीपासून झालेले–त्यांच्या (व्यभिचारावर–हिंसा-कर्म, जारण, मारण, अभिचार); तसेंच शम, दम, शौर्य, तेज, कृषी, वाणिज्य व सेवा इत्यादि कर्में; तेथें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असा गुणकर्मविभाग झाला; व तेथें आतां ह्या गुणकर्मविभागाच्या उलटापालटीनें व मिश्रणानें–म्हणजे तदनुसारें कर्में मानिलीं होतात. गुणांच्या मिश्रणानें प्रकृतीच्या आधारावर त्यात्याप्रमाणें कर्में ठरविलीं होतात. (७८)

येथें हे धनुष्यपाणि–धनुर्धरा–एकच जरी तरी चार वर्णांचें झालें गेलें अशी गुणांच्या कर्मांचें निवडणें का शुद्ध करणें तें झालें असें सहजींसहजच कीं सारासार विचारास म्हणजे विवेकास आलेलें– (७९)

या कारणास्तव, हे पार्था, ऐक; अशी ही वर्ण व भेद–म्हणजे फरक व भिन्नभाव, संस्था (रचना, स्वरूप, व्यवस्था)–पण तेथचा मी कांहीं–तेथचा कर्ता नव्हें. (८०)

**न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।**
**इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १४ ॥**

[ लिम्प = विषदिग्ध, विटाळलेला, अपवित्र, ( लिप् = माखणें; लेप देणें; व्यापणें; दूषित करणें; चेतवणें). स्पृहा = इच्छा. अभिजानाति = ( ज्ञा + अभि ) स्मरणें, जाणणें, समजणें, माहित होणें; अनुभवणें; ओळखणें; मानणें; क्रिया करणें; तोषविणें; वाखाणणें; कळवणें. न स बध्यते = ( बध् = वीट येणें; बांधणें ) तो बांधला जात नाहीं. ]

**अन्वय :** माम् कर्माणि न लिम्पन्ति । मे कर्मफले स्पृहा न । यः माम् इति अभिजानाति । सः कर्मभिः न बध्यते ।

**अर्थ :** मजला कर्में दूषित करीत नाहींत; माझे ठायीं कर्मफलाची इच्छाहि नाहीं; त्याप्रमाणें जो मला स्मरतो, जाणतो, तो कर्मानें बांधला जात नाहीं (१४).

**हे मजचिस्तव जन्हि जाले । परि म्यां नाहिं केले ।**
**ऐसें जेणें जाणितलें । तो सुटला गा ॥ ८१ ॥**

मजचिस्तव = माझ्यापासून. सुटला = तो कर्मापासून मुक्त म्हणावा कीं (८१).

हें माझ्यापासून–मजचिस्तव–झालें; पण मी केलें नाहीं, असें ज्यानें जाणलें तो कर्मबंधापासून सुटलाच म्हणावा.... (८१)

**एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।**
**कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥**

[एवं ज्ञात्वा = असें जाणून. पूर्वैः अपि मुमुक्षुभिः कर्म कृतम् = पूर्वींच्यासुद्धां मुमुक्षूंनीं कर्म केलें. तस्मात् त्वम् एवं कर्म कुरु = म्हणून तूं फक्त कर्म करच. पूर्वींच्याहि पूर्वींचे जे; त्यांनीं जसें केलें तसेंच तूं कर्म कर. ]

**अन्वय :** ज्ञात्वा एवम् । पूर्वैः मुमुक्षुभिः अपि कर्म कृतम् । तस्मात् पूर्वैः पूर्वतरम् कृतम् कर्म एव त्वं कुरु ।

**अर्थ :** याप्रमाणें जाणून पूर्वींच्या मुमुक्षूंनीं–मोक्ष इच्छिणाऱ्यांनीं, निसटून जाणाऱ्यांनीं, मुक्त होणाऱ्यांनीं –सुद्धां कर्म केलें आहे, आणि म्हणूनच तूंहि पण पूर्वींच्याहि पूर्वींचे पूर्वज–प्राचीन-वडील जे, त्यांनीं जसें प्राचीन काळापासून चालत आलेलें कर्म केलें, तसें तूंही पण कर (१५).

**मागील मुमुक्षु जे होते । तेंहि ऐसेचि जाणोनि मातें ।**
**कर्में केलीं समस्तें । धनुर्धरा ॥ ८२ ॥**
**परि तें बीजें जैसिं दग्धलिं । नुगवतीचि पेरिलिं ।**
**तैसि कर्में तया जालिं । मोक्षहेतु ॥ ८३ ॥**
**येथ आणिक येकहि अर्जुना । हें कर्माकर्मविवंचना ।**
**आपलिये चाडे सज्ञाना । योग्य नोहे ॥ ८४ ॥**

मुमुक्षु = मोक्षाची इच्छा करणारे.–[ ( विवेकचूडामणि ) अहंकारादि देहान्तान्बंधानज्ञानकल्पितान् । स्वस्वरूपावबोधेन मोक्तुमिच्छामुमुक्षुता ॥ ] तेंहि–तिहिं. ऐसेचि–ऐसिया. समस्तें कर्में केलीं = सर्व निखिल अखिल, समग्र कर्में केलेलीं (८२). परि तें–पेरिता = पेरिलीं असतां. दग्धलिं ( प्लुष्टः प्लुष्टः, उषितः, दग्धः

इति।)=भाजलेलीं. पेरिलीं नुगवतीचि=पेरिलीं तरी उगवतच-जमिनींत रुजतच मुळीं नाहींत. कर्में तया जालिं-कर्मेंचि परि तयां जाहालीं हेतु=त्याप्रमाणें कर्मेंच जरी तरी पण ती त्यांना मुक्तीला, मोक्षाला, अमृतत्वाला कारण झालीं (८३). आणिक येकहि येथ = आणीक एक गोष्ट इथें आहे. कर्माकर्मविवंचना = कर्म कोणतें व अकर्म कोणतें याचा विचार. प्रवृत्ति निवृत्ति तसेंच शास्त्रोक्त कर्म व नैष्कर्म्य. सज्ञाना=विद्वानांना. चाडे= इच्छेप्रमाणें ठरविणें. योग्य नोहे=उचित नाहीं (८४).

त्यांनीं मजला याप्रकारचा (निष्काम कर्मयोगी) जाणून, हे धनुर्धरा, सर्व समस्त कर्में केलीं. (८२)

(दग्धलिं) भाजलेलीं बीजें पेरिलीं असतां तीं पेरलेलीं बीजें उगवतच नाहींत, तशीं कर्में जरी तरी पण तींच कर्में, बंधाची न होतां मोक्षहेतूची झालीं. (८३)

येथें अर्जुना आणीकही एक गोष्ट आहे. ती म्हणजे ही कर्म व अकर्मासंबंधींची विवंचना ती आपल्याच मर्जीप्रमाणें करणें हें सज्ञानास योग्य नाहीं-कर्म कोणतें, अकर्म कोणतें याचा विचार विद्वानांनीं आपल्याच इच्छेप्रमाणें (चाड) ठरविणें योग्य नाहीं. (८४)

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥**

[कर्म किम् = कर्म म्हणजे काय. अकर्म किम् = कर्मशून्य (अभाव) म्हणजे काय. इति = असे विचारांचें करशील तर. कवयः अपि = विद्वान, सर्वज्ञ, विचारी, ज्ञानीसुद्धां. अत्र मोहिताः = ह्यासंबंधीं मति गुंग होऊन आहे; भुरळ पडून आहे. तत् = यासाठीं. ते = तुजला. कर्म = कर्म व अकर्म यांचीं लक्षणें. प्रवक्ष्यामि = सविस्तरपणें सांगतों. यत् ज्ञात्वा अशुभात् मोक्ष्यसे=विवेचन कळल्यावर तूं (अशुभ)-त्रिविध तापांसून मुक्त होशील. यत् ज्ञात्वा = शुभाशुभादि सुंदर, मंगलकारक, कल्याण, सुख इत्यादी. अशुभात् = अमंगळपणा, पाप, संकट, पीडा इत्यादी.]

**अन्वय :** कर्म किम्। अकर्म किम्। इति। अत्र। कवयः अपि। मोहिताः। ते। तत् कर्म। प्रवक्ष्यामि। यत् ज्ञात्वा। अशुभात् मोक्ष्यसे।

**अर्थ :** कर्म म्हणजे काय, अकर्माचें लक्षण काय, असें जें कांहीं इथें आहे तेथें कविसुद्धां मोहून गेले आहेत. तुजला तें कर्म सांगतों-त्याची संथा देतों-जें जाणल्यानें तुजला अशुभापासून त्रास होणार नाहीं (तूं कर्मबंधापासून सुटशील) (१६).

**कर्म म्हणिपें तें कवण। अथवा अकर्मा काय लक्षण।**
**ऐसें विचारतां विचक्षण। गुंपोनि ठेले ॥ ८५ ॥**
**जैसें कां कुडें नाणें। खरेंयाचेनि सारखेपणें।**
**डोळयांचेंहि देखणें। संशयीं घाली ॥ ८६ ॥**
**तैसें निष्कर्म्यतेचेनि भ्रमें। गिंवसित आहाति कर्में।**
**जे दुजी सृष्टी मनोधर्में। करूं शकति ॥ ८७ ॥**
**वांचूनि मूर्खाचि गोष्टि कायसि। तेथें मोहले गा क्रांतदर्शि।**
**म्हणोनि आतां तेंचि परियसि। सांगेन तुज ॥ ८८ ॥**

अकर्मा-अकर्मि. (अकर्मा=कर्म न करणें, कर्मशून्यता. अकर्मन्=मोक्ष, पाप, निषिद्ध कर्म. अकर्मक= कर्मास अयोग्य). म्हणिपें = म्हणावें, म्हटलें जातें. विचक्षण = (युक्तायुक्त विचारानें पाहिलें) निपुण, कुशल, विद्वान, निरीक्षक, बुद्धिमान. गुंपोनि-गुंफोनि ठेले=घोटाळ्यांत गुंतून पडले, गोंधळले आहेत. कर्मन्=

करणें, कृत्य. कर्मिन् = कर्मनिष्ठ, उद्योगी (८५). कुडें नाणें = खोटें नाणें. खरेंयाचेनि–खऱ्याचेनि = खऱ्या-साखेंच (सारखेपणें). डोळ्यांचेंहि देखणें–डोळ्यांचेंचि देखणें = प्रत्यक्ष दृष्टीलासुद्धां; उत्तम निरीक्षण असलेले परिक्षक. संशय = शंका, भय, अनिश्चय (संशित = धार लावलेलें, ठरविलेलें) (८६).

निष्कार्यतेचेनि भ्रमें–निष्कर्म्यतेचेनि भ्रमें = कर्म करीत असून न करणेपणा अशा भ्रमानें कर्मांत गुंतून पडतात. मनांत आणलें तर प्रतिसृष्टि निर्माण करूं शकतात, असें ज्यांचें सामर्थ्य असे (थोर लोक) सुद्धां नैष्कर्म्य भ्रमांत गुंतून पडतात. गिंवसित–गिंवसिजत. जे मनोधर्में दुजी सृष्टी–सृष्टि करूं शकति = जे संकल्पमात्रें-करून–(मनोधर्मानें–मनांत आणलें तर) दुजी एक सृष्टीच उत्पन्न करूं शकतात (८७). वांचूनि मूर्खांचि गोष्टि कायसि = यापुढें मूर्खांची ती कथा काय? मूर्खांची कथाच एक ती! तेथें मोहले गा (दूरदर्शन) क्रांतदर्शि–दीर्घदर्शी = इथें तर दूरदृष्टी–दूरचे पाहणारे–दूरदर्शी असे. (दर्शन = आरसा, चेहरा, स्वप्न, प्रश्न, डोळा, दृष्टि, पाहणें, दृष्टीचा टप्पा, अध्यात्मज्ञान, विचार, मत). परियसि–परियेसीं (८८).

कर्म म्हणजे तें कोणतें अथवा अकर्माचें लक्षण तें काय–कसलें, असा विचार केल्यास–केल्यामुळें–विचक्षण ते घोटाळ्यांत पडले आहेत. (८५)

जसें खोटें नाणें खऱ्याच्याच सारखेंपणामुळें–डोळ्यांचेंच पाहणें तें–प्रत्यक्ष दृष्टीलासुद्धां–खरें किंवा खोटें अशा संशयांत घालतें.... (८६)

त्याप्रमाणें नैष्कर्म्यतेच्या भ्रमावरच कीं कर्में गिंवसिलीं गेलीं होतात; जेथें का मनोधर्मामुळें दुसरी एक निराळी सृष्टि तीं कर्में करूं शकतील. (८७)

वांचूनि म्हणजे मग मूर्खांची कथा ती काय? येथें तर दूरदर्शी–दूरचे पाहणारे त्रिकालज्ञ ते मोहिले आहेत–होतात–याकरितां तेच आतां सांगेन ऐक! (८८)

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

[बोद्धव्यं = (बोध = जागृति, उमलणें, उपदेश, ज्ञान, बुद्धि, विचार) तत्त्वज्ञान, अवश्य जागृति, इत्यादी. कर्मन् = विहित धार्मिक कार्य. गुणधर्म, दैव, कर्मेंद्रिय. विकर्मन् = निंदित आचार, निषिद्ध कर्म. अकर्मन् = (१) पाप, गुन्हा. (२) निषिद्ध कर्म. (३) क्रियाराहित्य. (४) मोक्ष = कर्मशून्यतेचें (यथार्थज्ञान.) लक्षण. गहना गति कर्मणा = (गहन = दुर्बोध, कठीण, गुंतागुंतीचें, खोल स्थान, दुर्गम स्थान, लपावयाची जागा, दुःख, तीव्र, अरण्य) कर्मांची गति, परिणाम, प्राप्ति, कर्मफल, पुनर्जन्म, स्वरूप, गुंतागुंतीची अशी (फल) होय.]

**अन्वय :** कर्मणः हि अपि बोद्धव्यम् । च । विकर्मणः बोद्धव्यम् । च । अकर्मणः अपि बोद्धव्यम् । कर्मणः गतिः गहना ।

**अर्थ :** विहितकर्मसंबंधींचें तत्त्वज्ञान समजलें पाहिजे आणि निषिद्ध कर्मासंबंधीं यथार्थ ज्ञानहि समजलें पाहिजे; तसेंच कर्मशून्यतेचेंहि म्हणिजे क्रियाराहित्यतेचेंहि लक्षण समजलें पाहिजे; कारण कर्माचें यथार्थ स्वरूप समजणें अत्यंत कठीण आहे (१७).

[(वृत्ति = अकर्म, निष्कर्म, कर्मअभाव, कर्मासंबंधीं उदासीनतेचा भाव–ही वृत्ति समजावी).]

**कर्म :**—मी अमुक एक कर्म करतों किंवा करीत नाहीं, असा अभिमान तें कर्म! हेंच कर्म बंधनांत घालतें. कसलेंहि कर्म म्हटलें कीं तें देहेंद्रियधर्म होय. तेथें आत्मा संबंधित मुळींच नाहीं; असें समजणें जें

यालाच आत्मस्वरूपज्ञान-संन्यास म्हटलें आहे. कर्माची निवृत्ति साहंकार तर तें नैष्कर्म्य प्रवृत्तीचें होऊन पुनर्जन्माला बीजभूत होतें. कर्म म्हणजे शास्त्रविहित अहंकार व वासनारहित निष्काम कर्म असें सत्कर्म. विकर्म म्हणजे दुष्कर्म–शास्त्रविरुद्ध कर्म. अकर्म म्हणजे निष्कर्म; कर्माचा अभाव–कर्माविषयीं उदासीन भाव-वृत्ति.]

**तरी कर्म म्हणजे स्वभावें । जेणें विश्वाकार संभवे ।**
**तें समवेत आधि जाणावें । लागे येथें ॥ ८९ ॥**

**मग वर्णाश्रमासि उचित । जें विशेष कर्म विहित ।**
**तेंहि वोळखावें निश्चित । उपयोगेंसिं ॥ ९० ॥**

**पाठिं जें निषिद्ध म्हणिपे । तेंहि बुझावें स्वरूपें ।**
**येतुलेंनि कांहिं न गुंपे । अपैसेंचि ॥ ९१ ॥**

**येऱ्हविं जग हें कर्माधीन । ऐसी व्याप्ति याची गहन ।**
**परि तें असो आयिक चिन्ह । प्राप्ताचें गा ॥ ९२ ॥**

स्वभावें=आपोआप, सहज. (कर्म जेणें) विश्वाकार संभवे = जग आकाराला येतें; जग व्यक्त होतें–विश्वरचनेचा संकल्प हें आदिकर्म–हें मूळ कर्माचें स्वरूप आहे. ज्या कर्मापासून विश्वरचना होते–बनते–तें कर्म. (कर्मचित्–चितः = लोकः). समवेत–सम्यक् (समवेत=बरोबर, सहित. सम्यच्=बरोबर असणारे, योग्य, प्रिय, चांगलें, विचार करून, बिनचूक) = "सत्यम्, तथ्यम्, ऋतम्, सम्यक् इति ४ सत्यस्य।" सम=सहित, शांत, ऐक्य, सारखा, सर्वांस सारख्या दृष्टीनें पाहणारा (समवेत सहितता). संवित्=अंगिकार–१) [संवित्, आगूः, प्रतिज्ञानम्, नियमः, आश्रयः, संश्रवः, अङ्गीकारः, अभ्युपगमः, प्रतिश्रवः, समाधि इत्यादि १० आङ्गीकारस्य।]. २) उपलब्धिः, चित्, संवित्, धीः, मनीषा, इत्यादि बुद्धेः। ३) संभाषा, संभाषणम्। क्रियाकारः, कर्मनियमः, आजिर्युद्धम्, नामसंज्ञा, एतेषु संकेते च स्त्रीलिङ्गं संविदिति नाम। (८९).

वर्णाश्रमासि उचित=चार वर्ण व ब्रह्मचर्यादि चार आश्रमांस योग्य. विशेष कर्म विहित=मुख्य विहित असें हितकारी. उपयोगेंसिं–उपेगेंसिं=उपयोगासह, निश्चित असें जें तें ओळखावें=ठरलेलें–नेमलेलें–धर्मशास्त्रानें निश्चित केलेलें असें जें कांहीं वर्णास व आश्रमांस–तें ओळखावें–जाणावें (९०). यावर (पाठिं) निषिद्ध म्हणिपे जें=वेदांनीं ज्याचा निषेध केला–न करणेची आज्ञा केली आहे. तेंहि बुझावें स्वरूपें=त्याचें स्वरूप तें कसें तेंही जाणावें, समजावें. येतुलेंनि कांहिं न गुंपे अपैसेंचि=मग आपोआपच कीं कर्मासंबंधीं गुंतागुंती ही मुळींसुद्धां नच होणारी ती–(९१). येऱ्हविं जग हें कर्माधीन=जगत्–जग–देह–(वायु) हे एरव्हीं कर्माच्याच आधीन असें. ऐसी व्याप्ति याची गहन = नित्य साहचर्य–व्यापणें, सर्वसामान्य विषय याची अशी दुर्बोध, तीव्र, खोल, (जाण). प्राप्ताचे=योग्याचे, मिळविलेले जे त्याचे, उपस्थित जे त्याचे– (९२).

येथें कर्म म्हणजे सहजस्वभावेंकरूनच ज्यायोगें विश्वाचा आकार संभवतो तें होय; (विश्वाकार हेंच मूळचें कर्माचें रूप–स्वरूप आहे; विश्वरचनेचा संकल्प हें आदिकर्म) व तेंच कीं सम्यगतेनें येथें अगोदर जाणावें लागतें. (८९)

यावर मग वर्ण व आश्रम–ब्रह्मचर्यादि चारी आश्रमांस योग्य जें विशेष असें वर्णाश्रमधर्मविहित कर्म तेंही निश्चितपणें त्याच्या उपयोगासहित ओळखावें. (९०)

यावर नंतर जें कांहीं–वेदांनीं ज्याचा निषेध केला आहे असें–तें निषिद्ध म्हणतात; त्याच्याहि स्वरूपास समजावें व एवढ्यावरच मग कांहींहि आपोआपच कीं कर्मांत अडकणें कां गुंतागुंती होणारी होत नाहीं. (९१)

येऱ्हवीं पाहिलें असतां जग हें कर्माच्या सर्वैथैव आधीनच असणारें! अशी ही ह्या कर्माची व्याप्ति गहनतेची आहे; पण असें हें असो. आतां यावर प्राप्तांचें म्हणजे कर्माकर्माचें पुरें ज्ञान ज्यांना आहे अशा सिद्धांचें जें चिन्ह–लक्षण, त्यासंबंधीं ऐक. (९२)

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥**

[ कर्मणि अकर्म यः पश्येत् = कर्मांत असतांही कर्मांचा न करणेंपणा–कर्म करणारा फलेच्छारहित–असा डोळस जो (पाहतो). अकर्मणि च कर्म यः = कर्मांचा न करणेंपणा हाच मुळीं (कर्म) पाहणारा–कर्मामध्यें असतांना–कर्मडोळसपणा. स मनुष्येषु बुद्धिमान् = मनुष्यांमध्यें तो शहाणा (विद्वान), बुद्धिमंत, युक्तिवान्, विवेकवान्, ज्ञानी. स युक्तः = तोच सिद्ध, व्रतस्थ, निपुण, न्याय्य होय. स कृत्स्नकर्मकृत् = तो सर्व कर्म करणारा. (कृत्स्न = पाणी).]

**अन्वय :** यः कर्मणि अकर्म पश्येत् । सः बुद्धिमान् । सः युक्तः । सः कृत्स्नकर्मकृत् । यः अकर्मणिच कर्म पश्येत् । सः बुद्धिमान् । सः युक्तः । सः कृत्स्नकर्मकृत् ।

**अर्थ :** जो पुरुष देहेंद्रिय कर्मामध्यें इंद्रियांचा संबंध आहे, (आत्म्याचा) आपला संबंध नाहीं, अशी कर्मशून्यतेची दृष्टि ठेवतो; तसेंच जो कांहीं कर्म न करतां स्वतःचें कर्तृत्व सद्भावनेनें पाहतो, तो सर्व मनुष्यांमध्यें समंजस, युक्त, आत्मज्ञानी, सर्व कर्मे यथार्थ करणारा समजावा (१८).

[ १) अकर्मणि कर्म पश्येत् = निरभिमानानें, ईश्वरप्रीत्यर्थ, वासनारहित, निरहंकार भावना, उदासीन वृत्ति–सन्मार्गप्रीत्यर्थ कर्म तें डोळसपणें. २ ) श्लोकाचा दुसरा चरण = ओंवी ९३, अध्याय ५. (करित्या) कर्त्याशिवाय–करितेनविण कर्मे तेंचि ते निष्कर्म × नैष्कर्म्य.]

**जो सकळ कर्मिं वर्ततां । देखे आपलि नैष्कर्म्यता ।**
**कर्मसंगें निराशता । फळाचिया ॥ ९३ ॥**

**आणि कर्तव्यतेलागीं । जया दुसरें नाहीं जगीं ।**
**ऐसिया नैष्कर्म्यता तरि चांगी । बोधला असे ॥ ९४ ॥**

**तरि क्रियाकलाप आघवा । आचरत दिसे बरवा ।**
**तोचि तो इयें चिन्हिं जाणावा । ज्ञानिया गा ॥ ९५ ॥**

**जैसा जळापासिं उभा ठाके । तो आपणपें जरि जळामाजिं देखे ।**
**तरि तो निभ्रांत वोळखे । म्हणे मी वेगळा आहें ॥ ९६ ॥**

**अथवा नावें आरोहन रिगे । तो थडियेचे रुख जात देखे वेगें ।**
**तेचि साचोकारें पाहों लागे । तंव रुख म्हणे अचळ ॥ ९७ ॥**

**तैसें सर्व कर्मिं असणें । तें फुडें मानूनि वायाणें ।**
**मग आपणपां जो जाणें । नैष्कर्म्य ऐसा ॥ ९८ ॥**

कर्मि–कर्मीं. आपलि–अपुली. कर्मिं वर्ततां कर्मसंगें फळाचिया निराशता देखे = कर्मामध्यें वर्तत–वागत–असतां (निरिच्छपणा) कर्मदेहसंगानें आपली कर्मफळ निराशता देखे = (फळ देहभोग इच्छित नाहीं, मिंधेपण) (९३). कर्तव्यतेलागीं = "कर्तव्य"च एक, त्यास जगांत आपल्यावांचून अन्य नाहीं; दुसरें नाहीं जगीं = आत्मस्वरूपाशिवाय विश्वांत–जगांत–दुसरें कांहीं नाहीं हें जाणतो. नैष्कर्म्यता चांगी बोधला = अशी (कर्म करून अकर्ता) नैष्कर्म्यता म्हणजे काय तें समजलें–अशा चांगल्या बोधानें, ज्ञानानें नैष्कर्म्यता बाणली आहे (९४).

बरवा क्रियाकलाप आघवा आचरत दिसे = सर्व कर्मे–कर्मसमुदाय (योगः कर्मसु कौशलम् २–५०); (समत्वं योग उच्यते २–४८). कलाप = मोराचा पिसारा, समूह, कळप, झुबका, अलंकार, बाण, बाणाचा

भाता, एकाच वृत्तांतलें काव्य. क्रिया = ( क्रि = विकत घेणें, अदलाबदल करणें; अपक्रि = लांच देणें; परिक्रि = भाड्यानें घेणें ) करणें, अमलांत आणणें; श्रम, शिक्षण, विद्या, विचार, ग्रंथ, मृताची क्रिया, उपचार, साधन, सिद्धि, धात्वर्थ, (क्रियान्वितः = आचारसंपन्न; क्रियारंभः = स्वयंपाक; क्रियायोग = योगाचीं साधनें; क्रियाकलाप = हिंदुधर्मामध्यें सांगितलेले सर्व उपचार-पूजा, समृद्धि, अनुष्ठानादि सेवाप्रकार. [योगसूत्र–पतंजलि–क्रियायोगः –"तपः स्वाध्याय ईश्वरप्रणिधान क्रियायोगः।" (शौचमिज्यातपोदानं स्वाध्यायोपस्थ-निग्रहः। व्रतमौनोपवासं च स्नानं च नियमा दश ॥)] ज्याप्रमाणें यमनियमासंबंधीं अष्टांगयोगामध्यें व्याख्या आहेत, त्याचप्रमाणें ह्या क्रियांसंबंधीं योगसूत्र तें जाण. इयें चिन्हि = (क्रियाकलाप, नैष्कर्म्यता, इत्यादि) ह्या लक्षणांनीं (चिन्ह = लक्ष्म, लक्षणं, कलंकः, चिन्हम्, लांच्छनम्, अङ्क इति ६ चिन्हस्य) (९५). तो आपणपें जरि–तो जरि आपणपें = तो आपण स्वतः जरी–जरी स्वतः तो. तो निभ्रांत वोळखे। म्हणे मी वेगळा आहें = निःशंकपणें ओळखतो कीं स्वतः तो अगदींच वेगळा आहे (९६).

नावें आरोहन रिगे–हन जो रिगे (थडियेचे) रुख जात–रुख जाता देखे वेगें = नावेमधून जातांना नदीच्या तीरावरचे वृक्ष उलट दिशेनें जात आहेत, धांवत आहेत असें नावेमधून पाहणाऱ्यास–जाणाऱ्यास दिसतें. साचोकारें पाहों लागे–पाहों जो लागे = जेव्हां खरोखर पाहूं लागतो, तेव्हां. तंव रुख म्हणे अचळ = वृक्ष–रुख तेव्हां तर अचळ स्थिर आहेत असें दिसतें–असें पाहतो. [अचळ–१) (अंचळ) ओंचा, २) स्थिर, निश्चळ, ३) पर्वत, ४) पृथ्वी, ५) ब्रह्म. (अचलाधिप = हिमालय)] (९७). तैसें सर्व कर्मिं असणें = तसें सर्व कर्मामध्यें असणें तें. तें फुडें मानूनि वायाणें = (फुडें = केवळ. वायाणें = खोटें) तें केवळ खोटें असें मानून. आपणपां मग जो जाणें–मग आपण जो जाणें = (आपणया = आपल्याचसारखा आपण–आपणालाच मग जो जाणतो. आपण = स्वतः मी). आपल्याचसारखा आपण, आपणालाच मग जो जाणतो–आपण मी जो जाणतो. [आपण (सं.) = बाजार, दुकान. आपणिक = व्यापारी, निरख]. नैष्कर्म्य ऐसा = मी कांहींहि करीत नाहीं असें मानणारा, असा. कर्म करीत नाहीं, कर्म करीत असूनही न करणेंपणा जो. . . . (९८).

जो आपल्या सर्वच्या सर्व कर्मामध्यें वर्तत–वागत–असतां आपली नैष्कर्म्यता पाहतो; म्हणजे कर्माच्या संगानें जरी तरी तेथें फळासंबंधीं नैराश्यच एक...... (९३)

वर कर्तव्यतेसाठीं ज्यास ह्या जगीं दुजेंपण असें दुसरेंपण म्हणून नाहीं; व अशा नैष्कर्म्यतेमध्येंच तो चांगलाच कीं बोधलेला आहे-असतो–बोधांतच सर्वथैव समरसलेला आहे...... (९४)

तेथें सर्व कर्में–क्रियायोगकलाप–वृद्ध–तरुणांचा एक आघवा–बरवा–चांगला असाच आचरण आचरतांना, आचरत असतां दिसत आहे असा जो–तोच कीं ह्या चिन्हांनीं एक ज्ञानियाच असा जाणावा. (९५)

कसें तर, जसें का पाण्याजवळ उभें राहिलें असतां जळापाशीं उभा आहे त्यास, तो जरी का स्वतःस पाण्यामध्यें–जळामाजीं–पाहतो तरी निश्चितपणें भ्रांत न होतां तो ओळखतो कीं मी (पाण्यांत नसून) वेगळा आहें (पाण्याबाहेर आहें) हें निःसंशय. . . . (९६)

अथवा असें म्हणूं कीं [जो नावे (मध्यें बसून) मधून जात आहे तो] तीरावरील वृक्ष नौकेंतून जातांना उलट दिशेनें धांवतातसे दिसतें, तेथें खरेपणानें जेव्हां का पाहूं देखूं लागतो, तेव्हां म्हणतो कीं रुख तर अचळच आहेत कीं. . . . (९७)

त्याप्रमाणें स्वकर्मामध्यें असणें जें तें तर केवळ खोटें मानून असल्यानें आपण जो (कोणी एक) नैष्कर्म्य (आहे) असाच कीं स्वतःस जाणतो. (९८)

**आणि उदयास्तेचि प्रमाणें। जैसें न चालतां सूर्याचें चालणें।**
**तैं नैष्कर्म्य तत्त्व जाणें। कर्मीचि असतां ॥ ९९ ॥**

**तो मनुष्यासारिखा तरि आवडे। परि मनुष्यत्व तया न घडे।**
**जैसें जळामाजीं न बुडे। भानुबिंब ॥ १०० ॥**

**तेणें न पाहातां विश्व देखिलें। न करितां सर्व केलें।**
**न भोगितां भोगिलें। भोग्यजात ॥ १०१ ॥**

**येकेचि ठायिं बैसला। परि सर्वत्र तोचि गेला।**
**हें असो विश्व जाला। आंगेंचि तो ॥ १०२ ॥**

उदयास्तेचि प्रमाणें–उदोअस्ताचेनि प्रमाणें = सूर्याचा उदय-अस्त पाहून. तें–तैसें. कर्मीचि असतां नैष्कर्म्य तत्त्व जाणें = कर्म करीत आहे असा दिसूनही, तो नैष्कर्म्यतेनेंच असतो–आहे असा दिसतो. न चालतां–चलतां–सूर्याचें चालणें = सूर्य चलत का चालत नसूनही चालल्यासारखा दिसतो. (वास्तविक पाहतां सूर्य चालत नाहीं; तसें–कर्ममध्यें असतांहि–कर्म करीत असूनही न करणेपणाच तेथें असतो–सूर्याचा उदय व अस्त हें प्रमाण मानून जसें सूर्याचें न चालणें तेंच चालणें मानलें होतें तसें–). चल् = १. हलणें, २. खेळणें, ३. अ थिर (प्रविचल = ढळणें). चलन = १. भ्रमण, हलणें; २. पाय; ३. हालणारे. चळण = १. हालचाल, २. मनाचा चंचलपणा. चालन = हलविणें, चाळणें, (चालनी = चाळणी) (९९).

मनुष्यासारिखा तरि आवडे = पाहिला असतां मनुष्यासारखा वाटतो–दिसतो. (मनुष्य–मानव, माणूस; मनुज–मननशील). परि मनुष्यत्व तया न घडे = मनुष्यधर्म–मनुष्यपणा–माणूसपणा त्यास घडत नाहीं, वागवीत नाहीं, गुण त्यास जन्मवीत नाहीं. मनुष्यत्व = मनुष्यधर्म, मनुष्यपणा, माणूसपणा. भानुबिंब जळामाजीं न बुडे = सूर्यबिंब कांहीं पाण्यांत बुडालेलें नसतें (१००). न पाहातां विश्व देखिलें = देखणेपणानें विश्व देखिलें, तेथें त्याचें तें स्थूलदृष्टीचें पाहणें कसचें! कांहींहि न करतां सर्व कांहीं केलें = क्रियायोग–कर्मसु कौशलं योगः – फलेच्छारहित कर्म करणारा सर्व प्रकारें कर्मबंधरहित. न भोगितां भोगिलें भोग्यजात = सर्व भोग्य विषय–भोगण्यास योग्य वस्तु–नच भोगितां भोगिले (१०१). जाला–जाहला. आंगेंचि विश्व जाला = शरीर अवयवांनीं जागृतदशेंतील अभिमानीच विश्व सर्व जग होऊन आहे. आंगेंचि = स्वतःच. येकेचि ठायिं बैसला। परि (विश्वीं) सर्वत्र तोचि गेला = परमात्मा तो व्यापकपणाचा तसा तो सर्वांठायींचा झाला–होऊन आहे. [(भावानें जसा परमात्मा लहानच झाला) परि तो गा जो मी येथें तें विश्वचि हें। ६३-१०] (१०२).

तो येथें तर कर्मांमध्यें असतां असतांच नैष्कर्म्य तत्त्वास जाणतो; कसें तर, सूर्याच्या उदय व अस्ताच्या प्रमाणावरून सूर्य चालत नसून चालल्यासारखा दिसतो तसा; सूर्य उदय अस्त प्रमाणच कीं कर्मीं असतां, तसें नैष्कर्म्यतत्त्व जाण–समज–उमज. (९९)

देहधाऱ्यासारखा– "मनुते इति मानवः"–तो मनुष्यासारखाच जरी तरी आवडणारा; (तेथें लाजणें नच होणारें तो पाहतांना); पण मनुष्यत्व–देहधारी असा सर्वथैव देहबुद्धीचा तो घडलेला नच; कसें तर, सूर्य आकाशींचा तेथें त्याचें बिंब कांहीं पाण्यांत बुडालेलें नसतें, तें तर आकाशींच असतें. (१००)

सूर्यबिंब जसें "सर्व जगतः चक्षुः"–तसें त्यानें कांहींहि नच पाहतां, सर्व विश्व पाहिलें, देखिलें. कांहींहि नच करितां सर्व कांहीं केलें; कांहींहि नच भोगतां सर्व भोग्यजात–सर्व भोग्य विषय–भोगिले. (१०१)

तो एकाच ठायीं बसलेला, तरी पण सर्वांठायीं सर्वत्र तोच गेला म्हणावा; असें हें असो; अहो, विश्व हें त्याच्या अंगचेंच झालेलें जसें कीं–तो तर आपल्या अंगानेंच कीं विश्व होऊन आहे...... (१०२)

**यस्य सर्वे समारंभाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥ १९ ॥**

[यस्य = ज्याचे. सर्वे = प्रत्येक, सगळे उद्योग. समारंभः = आरंभः = उद्योग, प्रारंभ. आरंभसम् प्रारंभः (सम् = निःपक्षपाती, पूर्ण, तुल्य, सारखा, निःपक्षपाती जमाव, सुंदरपणा इत्यर्थी). कामः = [कामः, संकल्पो, विचिकित्सा, चिकित्सा, श्रीः, धीः, भीरित्येतत्सर्वं मन एव (श्रुति)] कामवासना, उपभोग, तृप्ति, उद्देश-कर्मफलभोग अनुभव हेतु (रहित) मनांत न धरितां केलेलीं कर्में, कामें, उद्योग असतात. (सर्वकर्मिणः = सगळीं कामें करणारा). तम् = त्याला. ज्ञानाग्नि दग्ध कर्माणम् = ज्ञानरूप अग्नीनें भस्म झालीं आहेत कर्में ज्याचीं त्याला. बुधाः पण्डितं आहुः = शहाणे लोक, विद्वान्, प्रबुद्ध म्हणतात; (मन् = विचार करणें, आदर करणें; मनम् = बुद्धि, अंतःकरण. मनसिज, संकल्पज = मदन).]

**अन्वय :** यस्य कामसंकल्पवर्जिताः सर्वे समारंभाः तम् ज्ञानाग्निदग्धकर्माणं बुधाः पण्डितम् आहुः ।

**अर्थ :** ज्याचे प्रत्येक-सगळे-उद्योग, प्रारंभ, कामवासना, उपभोग, तृप्ति, उद्देश-कर्मफलभोग अनुभव हेतु (रहित), मनांत न धरितां केलेलीं कर्में, कामें-उद्योग असतात-त्याला म्हणजे ज्ञानरूप अग्नीनें भस्म झालीं आहेत कर्में ज्याचीं-त्याला शहाणे लोक प्रबुद्ध, विद्वान् म्हणतात (१९).

[अ. ३, श्लोक २०, २१; अ. ४, श्लोक १८; अ. १३, श्लोक २७ व २९ —लोकसंग्रह.

अभिमानशून्यत्वें केलेलीं-परोपकार-कीं कर्में बंधनकारक होत नाहींत, हें तत्त्व लक्षांत ठेवून तुला आपलें कर्तव्यकर्म करणें उचित आहे; जनकादिक विद्वान क्षत्रियांनीं केवळ कर्मानुष्ठानें करून-कार्यारंभः सिद्धता : होमजप इत्यादि कर्में-मोक्षरूप पुरुषार्थाची सिद्धि मिळविण्याचा प्रयत्न केला; त्या अनुरोधानें तरी निदान कर्तव्यकर्म करण्याकडेच लोकांची प्रवृत्ति वाढावी-व्हावी-हें कारण, का हा उद्देश, हा निश्चय पुढें घेऊन, तुला आपलें कर्तव्यकर्म करणें उचित आहे-कारण विद्वान् श्रेष्ठ पुरुष जें जें कांहीं आचरतो, तेंच इतर सामान्य लोक-समुदाय-करीत असतो. जें तत्त्व श्रेष्ठ पुरुष पुढें ठेवून, प्रमाणभूत मानून कर्म करतो, तेंच उदाहरण पुढें घेऊन सामान्य अज्ञानी लोक त्याला अनुसरतात (अ. ३ श्लोक २०-२१).

कर्मामध्यें नैष्कर्म्य दृष्टि ठेवतो-इंद्रियांकडून कर्म घडत आहे त्यांत आपला-आत्म्याचा-कांहीं संबंध नाहीं, अशी कर्मशून्यतेची दृष्टि ज्याची याचेंच नांव कर्मामध्यें अकर्म पाहणें; तसेंच नैष्कर्म्य स्थितीमध्येंही (अकर्मणि) कांहीं कर्म न करतां, स्वतःचें कर्तृत्व सद्भावनेनें पाहतो (कर्म पश्येत्), तो मनुष्यांमध्यें फार समंजस, बुद्धिमान, व तोच मुक्त (युक्तः)-आत्मज्ञाननिष्ठ योगी (कृत्स्नकर्मकृत्) सर्व कर्में यथार्थ करणारा जाण (अ. ४. श्लोक १८).

नाश पावणाऱ्या सर्व सृष्ट पदार्थांमध्यें-क्षेत्रांमध्यें-नाश न पावणाऱ्या परमेश्वराला सर्वत्र सारखा असलेला पाहतो-परमेश्वर सर्वव्यापी आहे असें ओळखतो, पाहतो, तोच पाहतो-परमेश्वर सर्वव्यापक आहे असें ज्ञान ज्यालें बाणलें त्याला ईश्वरी स्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें; तो सायुज्यतेचा अधिकारी झाला (अ. १३ श्लोक २७).

केलीं जाणारीं कर्में प्रकृतीकडून सर्व प्रकारें केलीं जातात हें पूर्णपणें जाणतो-आत्मा अकर्ता आहे-कर्में प्रकृतीमुळें होतात, त्यांत आत्म्याचा कांहीं संबंध नाहीं, असें जो समजतो, तोच खरें तत्त्व ओळखतो; त्यालाच साक्षात्कार होतो (अ. १३ श्लो. २९).]

**जया पुरुषांचा ठाईं । कर्माचा तरि देख नाहिं ।**
**परि फळापेक्षा पाहिं । संचरेना ॥ १०३ ॥**

**आणि कर्म हें मी करीन । अथवा आदरिलें सिद्धि नेईन ।**
**येणें संकल्पें ज्याचें मन । विटाळेना ॥ १०४ ॥[४]**

**ज्ञानाग्निचेनि सुखें । जेणें जाळिलिं कर्मै अशेषें ।**
**तो परब्रह्मचि मनुष्यवेशें । वोळख तुं ॥ १०५ ॥**

ठाईं–ठायीं = मनांमध्यें. देख–खेद = (देख = मार्ग, वळण. खेद = कंटाळा. परि–तरि. संचरेना = (फळअपेक्षा, इच्छा, संबंध, जरुरी कांहीं) फळाची इच्छा मनांत उद्भवत नाहीं (१०३). कर्म हें = हें कर्म. आदरिलें = प्रारंभिलेलें, आरंभ केलेलें. येणें संकल्पें ज्याचें मन विटाळेना = अशा उद्देशानें–हेतूनेंहि–ज्याचें मन–संकल्पें म्हणजे कर्मफळ–उपभोग, निश्चय का उद्देशानेंहि मन कांहीं बिघडविलें नाहीं; अपवित्र केलें नाहीं; अशुद्धतेचें झालें नाहीं (१०४). सुखें–मुखें. जाळिलिं कर्मै अशेषें–अशेखें = संपूर्ण कर्मे (जाळिलीं) ज्ञानमय झालीं. मनुष्यवेशें–मनुष्यवेखें = मनुष्यरूपानें; मनुष्यासारखीच कीं त्याची आकृति, शरीर, सौंदर्य, स्वभाव, वर्ण, प्रकार (कीं); मनुष्यवेशानें (= शोभेनें). परब्रह्मचि = (परम + ब्रह्म = परमेश्वर) परमेश्वरचि कीं–(१०५).

तरी असें जाणावें–ज्या पुरुषांच्या ठिकाणीं कर्म केल्याचा खेद नाहीं–[कर्म कर्म जें तेथें बंध (होईल) असणारच असा खेद मुळींच नाहीं]–तरी कर्मफळाची अपेक्षा तेथें मुळींच नांवासहि संचरत नाहीं, संचाराची होत नाहीं–फळाची अपेक्षा, इच्छा त्याच्या मनांत मुळींच उद्भवत नाहीं. . . . (१०३)

तसेंच, आणि वर हें कर्म, कर्म हें मी करीन किंवा आरंभ केलेलें, आदरिलेलें तें सिद्धीस–शेवटास नेईन, अशा संकल्पानें तर ज्याचें मन मुळींच विटाळत नाहीं (अमुक एक कर्म करीन, का आरंभ केलेलें तें सिद्धीस नेईन, अशा संकल्पाचा विटाळ त्याचे मनास होत नाहीं). . . . (१०४)

क्रियायोग, कलाप, वृद्धचि होती तरणे रे (८५) तेथें ज्ञान अग्नीच्या मुखीं (–सूर्याचें मुख जसें, जेथून ज्वाला निघते तें) तेथेंच ज्यानें कर्मै अर्पण करून अशेष सर्व नाहींशीं केलीं (दग्धलीं, जाळिलीं, भाजलीं)–अहो, तो तर मनुष्यवेशानें एक परब्रह्मच कीं असें तूं ओळख, हो! (१०५)

**त्यक्त्वा कर्मफलासंगं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित्करोति सः ॥ २० ॥**

[त्यक्त्वा कर्मफल आसंगं (= सर्व संग) कर्माभिमान व फलासक्ति सोडून देऊन. नित्य निराश्रयः, नित्य तृप्तः = (निराश्रयः = नेहमीं कसल्याहि आश्रयाची इच्छा नच बाळगणारा) व नित्य तृप्त असा–सदैव संतुष्ट. अभिप्रवृत्तः कर्मणि अपि = कर्मामध्यें सर्व तऱ्हेनें प्रवृत्त, रूढ, निमग्न झाला तरी. सः न किंचित् करोति एव = कांहींच करीत नाहीं असें जाण (आनंदाच्या नैष्कर्म्यतेचा तो).]

---

[४] याच नंबरची ओंवी 'ज्ञानदेवींत' आहे, ती येथें दिली आहे :—

म्हणौनि सर्वापरि मुक्तु । तो सकर्मचि कर्मरहितु ।
सगुण परि गुणातीतु । एथ भ्रांति नाहिं ॥ १०४ ॥

तो सर्वप्रकारें कर्मबंधरहित असा मुक्तच एक. तो कर्म करणारा, फलेच्छारहित (कर्मरहितु) सगुण परि–त्रिगुणात असूनहि–गुणातीतु–त्रिगुणांनीं अलिप्त–त्रिगुणांच्या पलीकडचा असा जाण; येथें कसलाहि संशय नाहीं–येथें भ्रांति नाहीं (१०४).

**अन्वय :** सः । न किंचित् एव करोति । अपि । कर्मणि अभिप्रवृत्तः । कर्मफल आसंगं त्यक्त्वा । सः । नित्यतृप्तः । निर् आश्रयः ।

**अर्थ :** (१) तो कांहींच कर्म करीत नाहीं, जरी कर्मामध्यें रूढ आहे, सर्व तऱ्हेनें प्रवृत्त आहे; कर्माविषयीं निरभिमान, फलाविषयीं निरासक्त असा तो, नित्य संतुष्ट, नित्य तृप्त कोणत्याहि तऱ्हेचा आश्रय नच अपेक्षणारा असा–

(२) (कर्म म्हटलें कीं तेथें देहाभिमान वर येणारा, व कर्मफलाविषयीं आसक्ति ही नेहमींच उपभोगण्यास मिळावी अशी वासना अनावर अशी होऊन असणारी). जो पुरुष १) कर्माचे ठायीं अभिमानशून्य व कर्मफला-विषयीं निरासक्त, २) नेहमीं तृप्त असा सदैव संतुष्ट चित्तानें असणारा, ३) कोणत्याहि वस्तूच्या आश्रयाची अपेक्षा –इच्छा नच करणारा, ४) तो पुरुष कर्मामध्यें सर्व तऱ्हेनें प्रवृत्त तरी, तो कांहींहि करीतच मुळीं नाहीं (२०).

**जो शरीरी उदासु । फळभोगी निरासु ।**
**नित्यता उल्हासु । होउनि असे ॥ १०६ ॥**

**तो संतोषाचा गाभारा । आत्मबोधाचिया वोगरा ।**
**पुरे न म्हणे धनुर्धरा । आरोगिता ॥ १०७ ॥**

शरीरी उदासु = (उदास = खिन्न, उदासीन, विरक्त) शारीरिक शक्तीचे संबंधीं तटस्थ, औदासीन्य अवलंबणारा. फळभोगी निरासु–निरास = (निरास = निरसन = नाकारणारा, आवरणारा, शांत करणारा, घालविणारा. निरासु = निरिच्छ) कर्मफळ उपभोगी उद्देशी निरिच्छ. नित्यता उल्हासु–(उल्हास)–स्वभाव-सिद्धता–सुखदायक आनंदतेजाची अशी. होउनि असे = तो होऊन असतो–(१०६). तो संतोषाचा–संतोषाच्या –गाभारा = संतोषाचें माजघर जें–मध्यगृह तेथें. आत्मबोधाचिया वोगरा आरोगिता पुरे न म्हणे = आत्मज्ञानाचें भोजन करतांना, वाढतांना 'पुरें' म्हणत नाहीं; (आरोगणें = जेवण. वोगरणें = वाढणें); जेवण जेवीत असतां, वाढतांना केव्हांहि 'पुरें' म्हणत नाहीं–ओगराळें जें, (वाढतांना) योजलें जातें तेथें भाताची मूदच कीं वाढली गेली त्या ओगराळ्यानें–तसेंच दुसरेंही पण द्रवपेय पदार्थ वाढले गेले (१०७).

जो देहाच्या ठायीं, शरीरासंबंधीं उदास, कर्मफळभोगासंबंधीं निराश, नेहमींच्या नेहमीं उल्हसित, भक्ति उल्हासाच्या दृष्टीचा होऊन आहे.... (१०६)

[हो कां तरंग लहान । परि सिंधूसि नाही भिन्न । तैसा ईश्वरू मी आन । नोहेचिया ॥ ३८७–१४ ॥ ऐसेनि बा समरसें । दृष्टि जें उल्हासें । ते पैं भक्ति ऐसे । आम्ही म्हणो ॥ ३८८–१४ ॥]

....तो संतोषाचें माजघर–गाभारा, आत्मज्ञानाचें (आरोगणें) भोजन करीत असतांना (वोगरा)–वाढतांना 'पुरें' म्हणत नाहीं. (१०७)

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥**

[निराशीः = निःस्पृह, निरिच्छ. (निराशिस् = शांत्यादि सद्गुणरहित). यत् चित्त यत् आत्मा = चित्त व आत्मा जिंकलेला असा. सर्वपरिग्रहः त्यक्तः = जिंदगी, परिवार, सेवक, (स्वागत, शरीर, आश्रय, स्वीकार, पत्नी, विवाह) सर्व कांहीं सोडून दिलेलें. केवलं शारीरं कर्म कुर्वन् = केवळ शरीरानेंच फक्त कर्म करीत असतां (शरीरशक्तिसंबंधींचा विचार मुळींसुद्धां नच पुढें घेतलेला; पण देह केवळ जगण्यापुरताच कीं ज्याचे शरीरानें कर्म करणें तें). किल्बिषम् न आप्नोति = त्यास पाप लागत नाहीं; पाप त्याला माहीत नाहीं; त्यास पाप पावत नाहीं–त्याला व्यापीत नाहीं; त्याजपर्यंत पाप पोंहोंचत नाहीं. किल्बिषम् = पापकारक, अपराध, दोष, कपट, वैर, रोग.]

**अन्वय :** निराशीः । यत् चित्त । यत् आत्मा । सर्वपरिग्रहः त्यक्तः । केवलं शारीरं कर्म कुर्वन् । किल्बिषम् न आप्नोति ।

**अर्थ :** निःस्पृह, निरिच्छ, विरक्त, आशाशून्य (-निराशीः = शांत्यादि सद्गुणरहित), चित्त व आत्मा जिंकलेला, नियमिलेला, सर्व परिवार (देहधारण) त्रास अडथळा-उपाधि-सोडून दिलेला, फक्त शरीरानें म्हणजे शरीरसंरक्षणापुरतें कर्म करीत असतां, त्याला कर्मबंधरूप पाप लागत नाहीं (२१).

**कैसि अधिकाधिक आवडि । घेतां महासुखाची गोडी ।**
**सांडोनिया आशा कुरोंडि । अहंभावेसि ॥ १०८ ॥**
**म्हणौनि अवसरें जें जें पावें । किं तेणेंचि तो सुखावें ।**
**जया आपलें आणि परावें । दोन्हि नाहिं ॥ १०९ ॥**
**तो दृष्टि जें पाहें । तें आपणचि होउनि जायें ।**
**आईकतें आहें । तोचि जाला ॥ ११० ॥**
**चरणिं हन चाले । मुखें जें जें बोलें ।**
**ऐसें चेष्टाजात तेतुलें । आपणचि जो ॥ १११ ॥**
**हें असो विश्व पाहि । जयासि आपणावांचुनि नाहि ।**
**आतां कवण ते कर्म पाहि । बाधि तयातें ॥ ११२ ॥**

घेतां-घेत. महासुखाची गोडी घेतां = महत्सुख जें, आनंद जो, त्याची गोडी घेतां घेतां. आवडि अधिकाधिक कैसि = आवडी-प्रेमा तो अधिकाहूनहि अधिक कसा तो. अहंभावेसि आशा कुरोंडी[५] सांडोनिया = अहंभावासहित-अहंभावासकट-मीपणासह आशा ओंवाळून सांडतो. [आयता दीर्घा या तृष्णा स्पृहा सा, चकाराद्दिगपि आशा। दिशः, ककुभः, काष्ठाः, आशाः; हरितः, इति ५ दिशाम् । ताः पूर्वदक्षिणपश्चिमाः क्रमेण प्राची-अवाची-प्रतीच्यः स्युः ।] (१०८). म्हणौनि-म्हणोनि. अवसरें = अवसरु = प्रसंग, वेळ, समयानुसार, पाऊस, पर्जन्य, गुप्त खलबत, संधि, योग्य काळ, जागा, प्रवेश, फुरसत, वर्ष, (प्रस्ताव अवसर इति ।) जें जें पावें = जें जें कांहीं पावतें, मिळतें. किं तेणें‌च-तेणेंचि = अहो, त्याजमुळें कीं तो. सुखावें = सुखाचा होतो; आनंदित होतो; पुण्यवान होतो. जया आपलें-आपुलें आणि परावें[६] ( = दुसऱ्याचें) = परकें. दोन्हि नाहिं = आपलें असो अथवा परक्याचें असो, त्याचे ठिकाणीं असें तें दोन्हीं आपलें कीं दुसऱ्याचें असें पाहणें नाहीं (१०९).

तो दृष्टि-दिठी जें पाहे = तो डोळ्यांनीं (दृष्टि = अवलोकनशक्ति, नेत्र, बुद्धि, मन)-दृष्टीनें जें जें कांहीं पाहतो. आपणचि होउनि जायें = तें तें तो आपणच स्वतः कीं होऊन असतो-होतो. (आपण = बाजार). (जो आपण स्वतः आहे, तो विषयांची मधुकरी मागीत नाहीं.-अ. ५; ओं. १०५-१०९) (आपण = स्वतः मी, तूं आणि तुम्हीं). आइकतें आहें-आईकें तें आहे तोचि जाला-जाहला = ऐकतें तें तोच झाला आहे- जें जें कांहीं तो ऐके तें तें तोच स्वतः आपण होऊन आहे, झाला आहे (११०). चरणिं हन चाले = पायांनीं

[५]कुरोंडी-कुरवंडी : कुरवंडी करीन काया । वरोनि पायां गोजिरिया ॥ १ ॥ बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥ २ ॥ पुरते न सख दुरी । आवडी पुरी बैसली ॥ ३ ॥ तुका म्हणे विसावलों । येथें धालों भणीवरी ॥ ४ ॥

[६]त्यामाजि हरि जाणिजे त्या भावें । आपुलें परावें- ॥ ६ ॥
(अभंग—"नारायण भूर्ती न कळे जयासी"—तुकाराम).

जें जें कांहीं चालण्याचें करतो (समुच्चयत्वें). मुखें जें जें बोलें = मुखानें जें कांहीं बोलण्याचें करतो तें सर्व. ऐसें चेष्टाजात तेतुलें = जेवढ्या-जितक्या, तेवढ्या सर्व क्रिया-व्यापार-शरीरव्यापार, वर्तणूक, इंद्रियांची चळवळ-सर्व कार्य, यत्न इत्यादि. आपणचि जो-स्वतः आपणच जो होऊन आहे (१११). हें असो विश्व पाहि = असें हें असो; पण विश्व म्हणजे जग हें तेथें जाण कीं. जयासि आपणावांचुनि नाहि-आपणपें वांचुनि नाहीं = सर्व जग-विश्व हें आपण स्वतःच कीं.-स्वतःवांचून तेथें दुसरें कांहींहि नाहीं. आतां कवण ते कर्म पाहि = आतां कोणतें तें-का कसचें तें कर्म. बाधि तया तें = त्यास बाधा करणारें केव्हांहि नच- (११२).

(नच लाजणारी) आवडी ती अधिक अधिक कशी ती-महासुखाची गोडी घेत आहे, तेथें अहंभावासकट आशा ओंवाळून (साडतो), टाकून कीं...... (१०८).

म्हणून वेळींच-प्रसंगीं जें जें कांहीं पावतें, त्यानेंच कीं तो सुखावतो; ज्यास आपलें परावें असें दोन्हींहि नाहीं. (१०९)

तो आपल्या दृष्टीनें जेव्हां का पाहतो, पाहणारा होतो, तेव्हां तर तो आपणच होऊन जातो-असतो-तोच कीं झाला होतो; जे का आइकते आहे जे आहे-ऐके-असा तोच जाहला कीं-(११०)

चरणीं चालतो, मुखानें जें कांहीं बोलतो, असें जें सर्व जेवढें चेष्टाजात तें आपणचि कीं.... (१११)

असें हें विश्व असो-तेथें जाण कीं, ज्यास आपणच सर्वस्वी-स्वतःच एक आतां कोणतें तें कर्म काय त्यास बाधतें?.... (११२)

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वंद्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबद्ध्यते ॥ २२ ॥**

[यदृच्छा = स्वेच्छा, अनायास, दैव. लाभः = प्राप्ति. संतुष्ट = तृप्त, खूष. यदृच्छालाभसंतुष्टः = याचना न करितां सहज मिळालेल्या वस्तूंनीं संतुष्ट. द्वंद्व = स्पर्धा, कलह, रहस्य, दोन, जोडपें. अतीतः = पार गेलेला; मुक्त; अमर्याद. द्वंद्वातीतः = सुखदुःखाच्या भावनेनें अस्थिर का चळलेला नच. विमत्सरः = मत्सरबुद्धि नसलेला. सिद्धौ असिद्धौ च समः = यशापयशाविषयीं सारखी वृत्ति ठेवणारा-संन्यासीच जसा (अ. ५. ओ. १९, २०.). न निबद्ध्यते = कर्माच्या बंधनांत पडत नाहीं; भांबावला जात नाहीं; बांधून ठेवला जात नाहीं; बांधला जात नाहीं. कृत्वा अपि = कर्म करूनहि-कर्म करूनदेखील (कर्म कुर्वन् कर्म कृत्वा अपि). (वि = उलटपणा = वियुज, विस्मृ; अभाव = विनिद्र, विक्र, भेद, विविधता, व्याप्ति, निश्चय, औत्सुक्य, इत्यादि. १) आधिक्य-विध्वंस, विनिश्चय; २) अधिकपक्षी-विराज. विमत = अमान्य, प्रतिकूल, तिरस्कृत, संदिग्ध, वादविषयभूत शत्रु. विमति = मतभेद, नापसंति; मूर्खपणा.)]

**अन्वय :** यदृच्छालाभसंतुष्टः । द्वंद्व अतीतः । विमत्सरः । सिद्धौ असिद्धौ च समः । न निबद्ध्यते । अपि । कर्म कुर्वन् । कर्म कृत्वा ।

**अर्थ :** सहज मिळालेल्या वस्तूंनीं संतुष्ट, सुखदुःखाच्या भावनेनें नच चळणारा (चळलेला) का अस्थिर होणारा, मत्सर (मत्सरी, लोभी, दुष्ट, कृपण, हेवा, वैर, गर्व, क्रोध, लोभ) (अन्यशुभद्वेषे परसंपत्त्यसहने मत्सरः) बुद्धि नसलेला, (संन्यासीच जसा का, यशापयशासंबंधीं सारखी वृत्ति ठेवणारा-बुद्धि ठेवणारा असा जो, (तो) (सर्व कर्म-सत्कर्म) करूनहि कर्माच्या बंधनानें भांबावला जात नाहीं (-बांधून ठेवला जात नाहीं-बांधला जात नाहीं)-कर्माच्या बंधनांत पडत नाहीं (२२).

**हा मत्सर जेथ उपजे । तेतुलें नुरेचि तया दुजें ।**
**तो निर्मत्सर काय म्हणिजे । बोल वीर (वरि) ॥ ११३ ॥**

**म्हणोनि सर्वाहिपरि मुक्तु । तो सर्व कर्मचि कर्मरहितु ।**
**सगुण परि गुणातीतु । येथें भ्रांति नाहीं ॥ ११४ ॥**

मत्सर हा जेथ उपजे = ज्या ठिकाणीं हा मत्सर–हेवा-निपजतो, उपजतो, जन्मतो. मत्सर = हेवा, वैर–(डांस, मच्छर, माशी). तेतुलें तया दुजें नुरेचि = तसा तो दुसरेपणानें पाहणारा नसल्यानें, त्यास सर्वांठायीं आपलेपणाच असतो. बोल वरि तो निर्मत्सर–काय (काई) म्हणिजे = (बोल वरि = शब्दांनीं–बोलण्याजोगें–बोलण्यानें) शब्दांनीं बोलण्यानें सांगणें तेथें तो निर्मत्सर तो कसा काय म्हणावा बरें!–तेथें हेकेखोरपणा, दुष्टपणा, तसेंच द्वेष म्हणजे दुसऱ्याचें बरें न पाहणें जें, तें कसें बरें वर्तत–वागत असेल तें!–(११३). सर्वाहिपरि मुक्तु = सर्व तऱ्हांनीं मोक्ष पावलेला; कर्मबंधापासून सुटलेला. सर्व कर्मचि कर्मरहितु = सगळें, प्रत्येक, कर्मच पण कर्मरहित असा (सकर्मक = १. कर्म असलेला (व्य.); २. कर्मयुक्त). (सर्वकर्मीण = सगळीं कामें करणारा). सगुण परि गुणातीतु = (सगुण = सगुण ब्रह्म, गुणयुक्त) = ब्रह्मरूपी, गुणांच्या पलीकडचा ईश्वर. भ्रांति = मिथ्या ज्ञान; गोंधळ, घोटाळा, संशय. येथें भ्रांति नाहीं = येथें मुळींच कसलाहि संशय नाहीं (११४).

जेथें मत्सर उपजतो, तेथीलचे ते–तेवढे सर्व त्यास दुसरेंपण–दुजेंपण का दुजें असें उरतच नाहीं; व मग शब्दांनीं बोलण्यानें काय "निर्मत्सर" म्हणावा? . . . . (११३).

म्हणून सर्वप्रकारें कर्मबंधरहित, कर्म करणारा फलेच्छारहित, त्रिगुणांत असूनहि त्रिगुणांनीं अलिप्त, त्रिगुणांच्या पलीकडचा निःसंशय–येथें संशय नाहीं ! (११४).

**गतसंगस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥**

[ गतसंगस्य = देहबुद्धीचा नाहीं; निरभिमानी; कर्मफल-आसक्ति नाहीं असा. मुक्तस्य = कर्ममुक्त; मोक्ष पावलेला. ज्ञान अवस्थित चेतसः = अंतःकरण (चेतस्) आत्मज्ञानांत स्थिर झालेला असा. यज्ञाय आचरतः कर्म समग्रं प्रविलीयते = (यज्ञाय आचरतः = यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबंधनः । तदर्थं कर्म कौंतेय मुक्तसङ्गः समाचर ॥ अ. ९–३ ॥) (प्रविली = नाश पावतें, बसतें, नाहींसें होतें, कर्म पळूं लागतें; लय पावतें). यज्ञ उपासनेसाठीं कर्म करतो, अनुष्ठान करतो, त्याचें सर्व कर्म–फल, परिणामासहित–ब्रह्मामध्यें लीन होतें–ब्रह्ममय होतें ].

**अन्वय :** गतसंगस्य कर्म । मुक्तस्य कर्म । ज्ञान अवस्थित चेतसः कर्म । कर्म यज्ञाय आचरतः । (तस्य) समग्रं (कर्म) प्रविलीयते ।

**अर्थ :** निरभिमानी (गतसंगस्य) जो, त्याचें सर्व कर्म; मोक्ष पावलेला जो त्याचें सर्व कर्म–चेतस् म्हणजे अंतःकरण ज्याचें आत्मज्ञानांत स्थिर झालेलें, तसेंच जो यज्ञाकरितांच (यज्ञो वै विष्णुः) कर्म आचरतो, त्याचें समग्र कर्म नाहींसें होतें–ब्रह्ममय होतें; प्रविलीयते–लय पावतें (२३).

**तो देहसंगे तऱ्हि दिसे । परि चैतन्यासारिखा असे ।**
**पाहता परब्रह्माचेनि कसे । चोखाळ भला ॥ ११५ ॥**

**ऐसाहि परि कवतुकें । जरि कर्मे करि यज्ञादिकें ।**
**तरि ते लया जाति अशेषें । तयाचाचि ठायीं ॥ ११६ ॥**

अवकाळिचि अभ्रें जैसिं । उर्मिविण आकाशिं ।
हारपोनि आपैसिं । उदयलि सांति ॥ ११७ ॥
तैसि विधिविधान विहितें । जन्हि आचरे तो समस्तें ।
तन्हि ऐक्यभावें ऐक्यातें । पावतीचि गा ॥ ११८ ॥

देहसंगे तन्हि दिसे–असे = देहधारी असा दिसत आहे. चैतन्यासारिखा (दिसे) असे = चित्तज्ञान, चित्तचैतन्य परब्रह्मासारखा आहे. परब्रह्माचेनि कसे । चोखाळ मला = ब्रह्माच्या कसोटीस-कसाला लावला तर ब्रह्मस्वरूपासारखा निर्गुण, चोखाळ, निर्मळ, शुद्ध दिसतो (११५). कवतुकें = कौतुकें = नवलाची अशी गोष्ट. कर्मे–कर्म. अशेषें–निःशेष तयान्चि ठाईं लया जाति. तयाचान्चि–तयाच्याचि. निःशेष = संपूर्ण (११६). अवकाळिचि अभ्रें उर्मिविण आकाशिं हारपोनि आपैसि उदयलि सांति = अकाळीचे मेघ जसे, उर्मी म्हणजे वृष्टिशिवायच जसें आपोआपच कीं–प्रगट होतांहोतांच, आल्याबरोबर–उत्पन्न होतांहोतांच, येतांयेतांच कीं–आपोआप हरपतात–वितळतात. ऊर्मि = लाट; प्रवाह; प्रकाश; वेग; जीवाचे सहा धर्म (क्षुधा, तृषा, जरा, मृत्यु, शोक व मोह); पीडा; व्यथा; वस्त्राची निरी किंवा चुणी. लहरी = भंग, तरंग, ऊर्मि, वीचि इति ४ । उल्लोलः, कल्लोलः इति २ महत्सूउर्मिषु । भावक्रिया–ऊर्मि, यष्टि, शाटी, कटी इत्यादि. ऊर्मिका–ऊर्मिका इव रामनामाद्यक्षरयुता चेत् अंगुलि मुद्रा इति–(अंगुलीयकम्, ऊर्मिका). ऊर्मि = मेघाचा जो वर्षण्याचा धर्म, त्या तेथीलच्या वर्षणाच्या क्रियेशिवायच मेघ–ढग आकाशांत हारपतात. वृत्ति = क्रिया; व्यवहार; वर्तन; विवरण; अर्थबोधक शक्ति; सेवा; चक्राकार फिरणें; मनःस्थिति; साधित शब्द. (वृत्ति = जीवनम्, वर्तनम्, वार्ता, जीविका, आजीवः वृत्तिः इति ६ वृत्तयः । जीविकामात्रस्य । सेवा श्ववृत्तिरिति । वृष्टि = पाऊस, वर्षाव. वृष्टिः वर्षम् इति २ मेघ वर्षणस्य । वृष्टिजीवन = पावसानेंच पिकणारा देश (११७). विधिविधान–विधानें–विहितें = शास्त्रांनीं सांगितलेलीं यज्ञादि कर्मे. समस्तें तो आचरे = सर्वच्या सर्व तो आचरतो तरी. ऐक्यभावें ऐक्यातें पावती = ऐक्यपणाच्या भावास येऊन ऐक्यातें पावतात (११८).

तो देहधारी तरी चैतन्यासारखाच–परब्रह्मासारखाच दिसतो: व आतां ब्रह्माच्या–परब्रह्माच्या कसास तो लावला असतां चोखाळ, शुद्ध, निर्मळ दिसतो. (११५)

असा असून सुद्धां–असा ब्रह्मासारखा निर्मळ तरी पण सहज कौतुकानें जरी यज्ञादिक कर्मे करतो, तरी तें कर्म संपूर्णपणें–निःशेषपणें–त्याच्याच ठायीं, त्याच्याच ठिकाणीं लय पावून असतें–लय पावतें. (११६)

आभाळांत ढग आले ते–प्रगट होतांहोतांच–उगवले कीं लगेच, अकाळींचे ते, वृष्टि (ऊर्मि–पाऊस, वर्षाव) शिवायच आपोआपच आकाशामध्यें हारपतात, वितळतात. (११७)

ज्याप्रमाणें "विधिविधान विहित"–शास्त्रांनीं सांगितलेलीं सर्व समस्त यज्ञकर्मे–जरी तो आचरत आहे, तरी तीं कर्मे ऐक्यभावानें ऐक्यास पावतातच कीं, अहो ! — (११८)

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

[ब्रह्म अर्पणं = अर्पण तें ब्रह्म (मंत्ररूपसाधन). ब्रह्म हविः = हवि तें ब्रह्म (हवनद्रव्य). ब्रह्म अग्नौ = अग्नौ तें ब्रह्म (देवता–अग्नि). ब्रह्मणा हुतम् = हुतम् तें ब्रह्म (ज्याच्याकडून हुतम् तो यजमानहि ब्रह्मच). ब्रह्म एव तेन गंतव्यं = ब्रह्मच एक तेथें जाणणें का ब्रह्माप्रतच जाणें होतें. ब्रह्मकर्मसमाधिना = ब्रह्मकर्म हीच समाधि–चित्ताची भावना.]

**अन्वय :** अर्पणं ब्रह्म । ब्रह्म हविः । ब्रह्माग्नौ । ब्रह्मणा हुतम् । ब्रह्मकर्मसमाधिना । तेन । ब्रह्म एव गंतव्यम् ।

**अर्थ :** ब्रह्मकर्मरूप समाधीमध्यें चित्ताची भावना दृढ असलेल्यानें यजमानरूपी ब्रह्मानें ब्रह्मच एक ब्रह्मीं अर्पण केलें; तेथें ब्रह्म हीच हवि, हवनद्रव्य, ब्रह्म हेंच अग्निरूप देवता, ब्रह्म हेंच हुत, हवनक्रिया घडते जी, ब्रह्मणा–हवनक्रिया करणाऱ्या यजमानाकडून, तेथें ब्रह्म एक जाणलें जाणें जें–तेथें ब्रह्मपदालाच जाणें होणारें जें...... (२४).

[(१) आहुति अर्पण करण्याचा मंत्र का जुहु इत्यादि साधन हें ब्रह्मरूपच. (२) दधि चरू आज्य समिधा अग्नीमध्यें अर्पण करावयाचीं तीं हवनद्रव्यें, तींहि ब्रह्मरूपच. (३) अग्निदेवतेप्रीत्यर्थ यज्ञ चालू आहे म्हणून येथें अग्नीमध्यें हवन करावयाचें तो अग्नीहि ब्रह्मरूपच. (४) ब्रह्मणा हुतम्–ज्याच्याकडून हवनक्रिया घडते तो यजमानहि ब्रह्मरूप. याप्रमाणें (५) ब्रह्म हेंच कर्म अशी ज्याच्या चित्ताची भावना स्थिर–दृढ–झाली आहे, त्यानें ब्रह्मपदालाच जावें म्हणजे–ब्रह्मरूप झालेल्या आत्मज्ञानी यजमानानें अनुष्ठिलेल्या क्रिया–कर्ता, कर्म, करण व क्रिया अशी सर्वच ब्रह्मदृष्टि–अशा भेदशून्य यज्ञाचें फलहि ब्रह्मपदच मिळावें हें निश्चित व योग्य]

**हें हवन मी होता । किं यया यज्ञातें हा भोक्ता ।**
**ऐसिये बुद्धिसि नाहिं भिन्नता । म्हणोनिया ॥ ११९ ॥**
**ये इष्ट यजन यजावे । आणि ते हवि मंत्रादि आघवें ।**
**तो देखत असे अविनाशभावें । आत्मबुद्धि ॥ १२० ॥**
**म्हणोनि ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें बोधा आले जया सम ।**
**तया कर्तव्यता निष्कर्म । धनुर्धरा ॥ १२१ ॥**
**आतां अविवेक कुमारत्वा मुकलें । जयां विरक्तिचें पाणिग्रहण जालें ।**
**मग उपासना जिहि आणिले । योगाग्नितें ॥ १२२ ॥**

होता = यज्ञकर्ता, आचार्य. *किं यया यज्ञातें*–का इये यज्ञीं = ह्या यज्ञाचा. ऐसिये–ऐसिया. म्हणोनिया–म्हणऊनियां–(११९). इष्ट यजन यजावे = इच्छित सन्मानित प्रिय यज्ञ–पूजन करणें जें–याग. यज्ञः = यज्ञः, सवः, अध्वरः, यागः, सप्ततंतुः, मखः, क्रतुः इति ७ यज्ञस्य । अग्नौ हुतं याज्यादि वषट्कृतं स्यात् (हविः)। घृतम्, आज्यम्, हविः, सर्पिः इति ४ घृतस्य । हवि मंत्रादि आघवें = हवनद्रव्य–होमाचे मंत्र. तो अविनाशभावें आत्मबुद्धि देखत असे = स्वभावसिद्धतेनें–ज्ञानबुद्धीनेंच पाहत आहे (१२०). म्हणोनि–म्हणउनि. ब्रह्म तेंच कर्म असेंच ज्यास बोधा आलें = जाणीवेच्या समत्वाचें झालें, त्यास कर्तव्य तें नैष्कर्म्यच–म्हणजे कांहींहि करणें नच असेंच होय (१२१). आतां अविवेक कुमारत्वा मुकलें = अज्ञानरूप बालपण संपलें. मुकलें = अंतरलें. जयां विरक्तिचें पाणिग्रहण जालें–ज्याचें विरक्तीशीं लग्न लागलें; (विरक्तीचें पाणिग्रहण झालें); वैराग्याचें लग्न लागलें. मग उपासना जिहि आणिले । योगाग्नितें = ते योगाग्नीच्या उपासनेस, भक्तीस–सेवेस आणिले–कारण अग्निसेवा करणाऱ्याला बायको ही पाहिजे केव्हांहि– (१२२).

आणि म्हणून हें हवन, मी होता, यज्ञ करणारा आचार्य ह्या यज्ञामध्यें हा भोक्ता अशा बुद्धीला भिन्नता नाहींच–अशा बुद्धीनें भिन्नपणें पाहणेंच, बुद्धीस दुजें असें भेटणेंच नाहीं– (११९)

तो अग्निहोत्रादि कर्में, योग्य यज्ञ यजणें जें, तेथीलचे ते होमाचे मंत्र, हवनद्रव्य इत्यादि अवघें सर्व ज्ञानयोगानें, अविनाश अव्ययत्वभावेंकरून आत्मबुद्धीनेंच पाहणें करतो–अव्ययभाव ज्ञानयोगच तो– (१२०)

असें आहे म्हणून, जें ब्रह्म तेंच कर्म होय, असें ओघाओघानेंच ज्यास सम–अभेदभावाची साम्य दृष्टि–त्यास नैष्कर्म्य हेंच कर्तव्य, हे धनुर्धरा–(करितेनविण कर्म तेचि ते निष्कर्म = फलेच्छा, अहंभाव सोडून जें कर्म घडतें तेंच निष्काम कर्म, त्याचा गुण नैष्कर्म्य–६३।५. समद्रष्टा = ब्रह्मभावसंपन्न; सर्वत्र सदा सम = तें सर्व

ठिकाणीं सर्वकाळीं सारखें एकच एक ब्रह्म–आपणच कीं तें अशी ही संपूर्णता समद्रष्टयाचें–ब्रह्मभावसंपन्नाचें वर्म जाण, खूण समज. समता दृष्टि–व्यापक ज्ञान = सर्वात्मभावाचें–भलें ज्ञान–स्वतःसिद्ध तेंच ज्ञान–ज्याच्या हृदयीं स्फुरण पावलें–शोधीत आलें–त्याची साम्यदृष्टि–(समता दृष्टि) अभेदभावाची–बोले बोलणारी शब्दांनीं विशेष काय सांगूं! ८८ । ५.)– (१२१)

देवताकांड–आतां अज्ञानरूप बालपण संपून ज्याचें विरक्तीशीं लग्न लागलें; कारण अग्निसेवा करणाऱ्याला बायको पाहिजेच व मगच योगाग्नीची ती उपासना, तें उपासन, ज्यांनीं उपासनेचें केलें–उपासन उपासनेस आणिलें– (१२२)

**—कर्मब्रह्म असें येथपर्यंत निश्चित झालें, आतां दुसरे प्रकार पूजेचे. योगाग्नीनें उपासन करण्याच्या तऱ्हा—**

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥**

[दैवम् = देवाचे, स्वर्गीय, पूज्य, सत्त्वगुणांनीं युक्त, प्रारब्ध, दैवत. अपरे = (१) दुसरे, निराळे. (२) पश्चिम दिशा. यज्ञम्=होम, पूजा, याग, ब्रह्मा, विष्णु. योगिनः = योगी. पर्युपासते = सेवा, पूजन, अभ्यास, चिंतन, आसन. (परि=सभोंवार, सर्वत्र, पूजा इत्यादि अशी). ब्रह्माग्नौ=ज्ञानतत्त्व, अग्नि. यज्ञम्= उपाधियुक्त जीवाला. यज्ञेन=होमानें, पूजेनें, यागानें, (ब्रह्मा, विष्णु), आत्मस्वरूपानेंच. अपरे योगिनः = कांहीं कर्मठ[*], दुसरे, निराळे. १) दैवम् एव=केवळ इष्ट देवतेच्या उद्देशानें–(देवाचे, स्वर्गीय, पूज्य, सत्त्वगुणांनीं युक्त, प्रारब्ध), दैवताच्या फक्त उद्देशानें. यज्ञं पर्युपासते = यज्ञानें अग्निरूपी स्वधर्माची–यज्ञाची उपासना करतात–[अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः । स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १–६ ॥ (न निरग्निर्न चाक्रियः) तेथें अग्नि नाहीं का क्रिया नाहीं.] तेथें उपासना ती अग्निरूप यज्ञाची. २) अपरे आणीक दुसरे ज्ञाननिष्ठ ते ब्रह्मरूप अग्नीमध्यें यज्ञं, यज्ञाला उपाधियुक्त जीवाला–जीवाचें जें स्वरूप त्या यज्ञेन एवं, निरुपाधिक आत्मस्वरूपानेंच उपजुह्वति–हवन करतात.]

**अन्वय :** दैवम् एव । अपरे योगिनः । यज्ञं पर्युपासते । अपरे । ब्रह्माग्नौ । यज्ञं । यज्ञेन एव उपजुह्वति ।

**अर्थ :** प्रारब्ध दैवत इष्टदेवता उद्देशानें कांहीं दुसरे (लोक) यज्ञाची–अग्निरूप (संसारिक) यज्ञाची उपासना करतात–तसेंच आणीक कांहीं दुसरे ज्ञाननिष्ठ ब्रह्मरूप अग्नीमध्यें (ब्रह्माग्नौ) (यज्ञं) यज्ञाला, उपाधियुक्त जीवाला, जीवाचें (यज्ञेन एक) निरुपाधिक अशा आत्मस्वरूपानेंच हवन करतात (उपजुह्वति) **(२५).**

**जे यजनशीळ अहर्निशि । तिहीं अविद्या हविलि मनेंसि ।**
**गुरुवाक्यहुताशि । हवन केलें ॥ १२३ ॥**

**तिहीं योगाग्निकिं यजिजे । तो दैवयज्ञ म्हणिजे ।**
**जेणें आत्मसुख कामिजें । पंडुकुमरा ॥ १२४ ॥**

**दैवास्तव देहाचें पाळण । ऐसा निश्चय परिपूर्ण ।**
**जो चिंतिना देहभरण । तो महायोगी जाण दैवयोगें ॥ १२५ ॥**

**आतां अवधारि सांगेन आणिक । जे ब्रह्माग्नि साग्निक ।**
**तयातें यज्ञेंचि यज्ञ देख । उपासिजे ॥ १२६ ॥**

[*] [कर्मठ सुख व्हावें म्हणून देवतेप्रीत्यर्थ अनुष्ठानें करतात. ज्ञाननिष्ठ यज्ञस्वरूपी–जीवाचे उपाधियुक्त आत्मस्वरूपानेंच–आत्म्यानें आत्म्याचाच ब्रह्माग्नीमध्यें लय करतात (आत्मना आत्मानम् उद्धरेत्।).]

जे अहर्निशि यजनशीळ = रात्रंदिवस जे यजन–यज्ञशीळ आहेत. मनेसि अविद्या हविलि = त्यांनीं यज्ञ करून मनासह–मनापासूनच कीं अविद्येचें हवन केलें. गुरुवाक्यहुताशि–हवन केलें = गुरुवाक्यरूप अग्नींत मनासह अविद्येचें हवन केलें (१२३). योगाग्निकि तिही यजिजे = योगरूप अग्नि (अभ्यास, वैराग्य) घेणाऱ्यांनीं यज्ञ–यजन करावें, जें कांहीं त्यांना–योगाग्नि घेणाऱ्यांना दैवयज्ञ म्हणतात–ज्यायोगें ते–हे पंडुकुमरा–आत्मसुख कामिजें–होते–जीवदशेचें जें निरुपाधिक स्वरूप त्या आत्मरूपेंकरून सुखच एक कमविलें–कामविलें–आपल्या इच्छेनें इच्छिलें (१२४). दैवास्तव देहाचें पाळण = दैव देवता याच्याच कीं प्रीत्यर्थ ह्या देहाचें पाळण होणारें होतें. चिंतिना देहभरण = पण जो ह्या देहभरणासंबंधीं कसलीही चिंता वाहत नाहीं, तो देवता, प्रारब्ध का दैवानेंच कीं महायोगीच एक म्हणावा की–(१२५). आतां दुसरे आणीक जे साग्निक असे ब्रह्माग्नीमुळें जे त्यांनीं तर यज्ञानेंच–जीवाच्या आत्मस्वरूपानेंच–यज्ञ स्वधर्मरूपी पूजा यजन उपासिजे असें आहे–ब्रह्मरूप अग्नीमध्यें यज्ञाला–उपाधियुक्त जीवाला यज्ञेन एव निरुपाधिक आत्मस्वरूपानेंच मी हवन करतों : परब्रह्मस्वरूपांतच बुद्धि, ज्ञान, दया इत्यादि जीवाच्या उपाधि भस्म करतात–(१२६).

जे अहर्निशी यजनशील, ज्यांनीं गुरुवाक्यरूप अग्नींत मनासह अविद्येचें हवन केलें. . . . (१२३)

त्या योगाग्नि घेणाऱ्यांनीं, जें यजावें होतें तो दैवयज्ञ म्हणावा, ज्यानें का आत्मसुखच एक–ब्रह्मानंदानुभवच एक कमवावा–कामवावा, हे पांडुपुत्रा. . . . (१२४)

दैवास्तव, दैवाकरितांच कीं, ह्या देहाचें पालनपोषण–जो देहभरण चिंताग्रस्ततेचें करीत नाहीं (म्हणूनि केवळ देहभरण । ते जाणे उघडी नागवण । यालागी एथ अंतःकरण । देयावेना ॥ २०९-३ ॥—) तो दैवयोगें-करून महायोगी होय. (१२५)

आतां आणीक कांहीं सांगतों ऐक–जे ब्रह्माग्नीचे अग्निहोत्री, त्यांना तर यज्ञानेंच यज्ञाची उपासना करणारे असें म्हटलें. . . . (१२६)

**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन्विषयानन्ये इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥**

[(१) अन्ये = दुसरे कांहीं योगी–(यज्ञकर्ते । यज्ञवेत्ते). श्रोत्रादीनि इन्द्रियाणि = श्रोत्रचक्षु इत्यादि इंद्रियें त्यांच्या त्यांच्या विषयासह. संयमाग्निषु जुह्वति = आत्मसंयमरूप अग्नींत जुह्वति = होमितात–जाळतात; म्हणजे सर्व ज्ञानेंद्रियांचा निग्रह करतात. (२) अन्ये = तसे आणीक दुसरे कांहीं योगी यज्ञवेत्ते–शब्दादीन् विषयान्–पंच इंद्रियांचे पंच विषय–शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, त्यांचा इंद्रियाग्निषु–इंद्रियरूप अग्नीमध्यें जुह्वति–होम करतात. (इंद्रियांच्या शक्ति त्यांच्या संयमानें–निरोधानें एकवटून इंद्रियद्वारें घडणारें विषय-सेवन बंद करतात–असे श्रोत्र इत्यादि–संयमन–इंद्रियनिग्रह हाच यज्ञरूप आहे असें मानतात. कारण ह्याच आत्मसंयमानें–संयमनानें समाधि स्थिर होणारा–इंद्रियें बाह्य विषयांपासून निवृत्त होणारीं कीं).]

**अन्वय :** श्रोतादीनि इन्द्रियाणि । अन्ये । संयमाग्निषु । जुह्वति । शब्द आदीन् विषयान् अन्ये । इन्द्रियाग्निषु । जुह्वति ।

**अर्थ :** इंद्रियें (श्रोत्र, चक्षु, इत्यादि) त्यांच्या त्यांच्या विषयासह, कांहीं दुसरे योगी, यज्ञवेत्ते, यज्ञकर्ते, आत्मसंयमरूप–अग्नींत होमितात–सर्व ज्ञानेंद्रियांचा–श्रवण, नयन, त्वचा घ्राण, रसन, इत्यादि–पंच विषय–शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध–त्यांचा इंद्रियासह अग्निमध्यें होम करतात (२६).

**एक संयमाग्निहोत्री । ते युक्तित्रयाचा मंत्री ।**
**यजन करिती पवित्री । इंद्रिय द्रव्यीं ॥ १२७ ॥**
**एक वैराग्य रवि विवळले । तंव संयति विहार केले ।**
**तेथ आपवृत्त जाले । इंद्रियानळ ॥ १२८ ॥**
**तिहि विरक्तिचि ज्वाळ घेतलि । जंव विकारांची इंधने खपलि ।**
**तेथें आशाधुमें सांडिली । पांचै कुंडें ॥ १२९ ॥**
**मग वाक्यविधिचियां निरवडी । विषय आहुति उदंडि ।**
**हवन केलें कुंडि । इन्द्रियाग्निचा ॥ १३० ॥**

एक संयम अग्नि होत्री = आत्मसंयमरूपी अग्नींत हवन करणारे: ते युक्तित्रयाचा मंत्री = कायिक, वाचिक व मानसिक अशा–योग्यतेनें, मिलाफानें, उपयोगानीं बोलावणें जें (मंत्र)–(स्तुतिपर वाक्यांनीं–मंत्र) (यज्ञोपवीतं परमं पवित्रं) पवित्र शुद्ध अशा इंद्रियद्रव्यांनीं यजन–यज्ञ करतात (१२७). एकास वैराग्य प्राप्त झालें–तेथें वैराग्यरूपी रवि प्रकाशला तो, तो (संयति) इंद्रियनिग्रहामध्यें विहार–अग्निकुंडें निग्रहरूप तीं घडलीं–तयार केलीं, तेथें इंद्रियापासून निघालेला अनळ (अग्नि) तो प्रगटला, प्रज्वलित झाला (१२८). तिहि विरक्तिचि ज्वाळ घेतलि = त्यांनीं वैराग्यरूपी विरक्तीची ज्वाला आपलीशी केली, तेव्हां तर. विकारांची इंधने खपलि = विकार, रूपांतर, फेरफार, (परिणामः विकारः इति प्रकृतेरन्यथाभावे ।)–रूप–सर्पण (इध्म)–इंधनें तीं पेटलीं. तेथें अशा–भविष्याविषयींची इच्छा, दिशा–धुमें–रूप धुरानें–सांडिलीं पांचही कुंडें = व आतां आशा–दीर्घा तृष्णा स्पृहा–रूपी धुरानें ती पांचही अग्निपात्र, अग्निक्षेत्र कुंडें त्यजिलीं–सोडून दिलीं. (१२९). मग वाक्यविधिचियां निरवडि = वेदवाक्यांत सांगितलेल्या विधीच्या युक्तीनें–कौशल्यानें. विषय आहुति उदंडि = उदंड विषय (इंद्रियग्राह्य पदार्थ) रूप आहुतीनें (अग्नीला अर्पण केलेल्या द्रव्यांनीं). इंन्द्रियाग्निच्या कुंडि हवन केलें = इंद्रियांच्या कुंडामध्यें हवन केलें; अग्निपात्रामधील अग्नीमध्यें घातलीं (१३०).

एक आत्मसंयम अग्नींत हवन करणारे–अग्निहोत्री–ते कायिक, वाचिक, मानसिक मंत्रांनीं पवित्र अशा इंद्रियद्रव्यांनीं यजन (करणारे) करतात. (१२७)

एकामध्यें तर वैराग्यरूपी रवि प्रकाशतो, त्यांनीं इंद्रियनिग्रहरूपी अग्निकुंडें विहाराचीं केलीं, तेव्हां तेथें तर इंद्रियरूपी अनळ प्रज्वलित झाले–प्रगटले. (१२८)

त्यांनीं विरक्तिरूपी अग्निज्वाळा आपलीशी केली, तेव्हां तर विकाररूपी इंधनेंच कीं पेटलीं; तेव्हां तर आशारूपी धुरानें पांचही कुंडांना सोडलें. (१२९)

मग वेदवाक्यांत सांगितलेल्या विधीच्या युक्तीनें (निरवडी = युक्ति, कौशल्य) उदंड विषय आहुतींनीं इंद्रियताप अग्नीच्या कुंडांत हवन केले. (१३०)

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

[अपरे = कांहीं दुसरे योगी–यज्ञकर्ते. इन्द्रियकर्माणि सर्वाणि = इंद्रियांचे सर्व व्यापार आणि; प्राणकर्माणि = श्वासोच्छ्वासादि जीं प्राणापानादि वायूचीं कर्में. ज्ञानदीपिते = प्रज्वलित झालेल्या आत्मज्ञानानें. आत्मसंयमयोगाग्नौ = योगः चित्तवृत्तिनिरोधः – निरोधानें मनाच्या एकाग्रतारूपी योगाग्नीमध्यें. जुह्वति = होम करतात.]

**अन्वय :** अपरे । इन्द्रियकर्माणि सर्वाणि । च । प्राणकर्माणि । ज्ञानदीपिते आत्मसंयमयोगाग्नौ । जुह्वति ।

**अर्थ :** दुसरे कोणी यज्ञकर्ते–योगी–सर्वेच्या सर्व इंद्रियांचे जे सर्व व्यापार (कर्माणि), तसेंच प्राणअपानादि वायूचीं जीं श्वासोच्छ्वासादि कर्मे, त्यांचा आत्मज्ञानानें प्रदीप्त झालेल्या आत्मसंयम योग अग्नीमध्यें–चित्तवृत्तिनिरोधः योगः–मनाच्या एकाग्रतारूपी योगाग्नीमध्यें होम करतात.–[आत्मस्वरूपांत "तन्मय"; त्यामुळें इंद्रियांचे व प्राणशक्तीचे व्यापार ध्यानधारणादि योगाग्नीमध्येंच लयाचे केले] (२७).

**येकि या परि पार्था । दोष क्षाळिले सर्वथा ।**
**किं हृदयारणि मंथा । विवेक केला ॥ १३१ ॥**

**तो उपशमे निहटिला । धैर्य भारें दाटिला ।**
**गुरुवाक्यें काढिला । बळकटपणें ॥ १३२ ॥**

**ऐसें समरसें मंथन केलें । तेथ झडकरि काजा आलें ।**
**जें उज्जीवन जालें । ज्ञानाग्नीचें ॥ १३३ ॥**

**पहिला रिद्धिसिद्धिचा संभ्रम । तो निवर्तून गेला धूम ।**
**मग प्रगटला सुक्षम । विस्फुलिंग ॥ १३४ ॥**

**तया मनाचें मोकळें । तेंचि पेटवण घातलें ।**
**जें यमनियमि हळुवारलें । आईतें होतें ॥ १३५ ॥**

**तेणें सादुकपणें ज्वाळा समृद्धा । मग वासनांतराचिया समिधा ।**
**स्नेहेंसि नानाविधां । जाळिलिया ॥ १३६ ॥**

**तेथ सोऽहम् मंत्र दिक्षिति । इंद्रियकर्माचिया आहुति ।**
**तिये ज्ञानानळि प्रदिप्तिं । दिधलिया ॥ १३७ ॥**

**पाठि प्राणक्रियेचियें सेवेनसि । पूर्णाहुति पडलि हुतांशि ।**
**तेथ अवभृत समरसि । सहजें जालें ॥ १३८ ॥**

**मग आत्मबोधिचें सुख । जें संयमाग्निचें हुतशेष ।**
**तोचि पुरोडाश देख । घेतला तिहि ॥ १३९ ॥**

**एक ऐसें इहिं यजनिं । मुक्त जाले ते त्रिभुवनि ।**
**या यज्ञक्रिया तरि आनानि । परि प्राप्य तें एक ॥ १४० ॥**

येकि या परि–एकी ययापरी=कोणी दुसऱ्या एकानीं याप्रमाणें. दोष क्षाळिले सर्वथा=दोष, उद्देश, हेतु, अपराध, चूक; अनियम सर्वथैव धुऊन टाकले. किं हृदयारणि–एकी हृदय अरणि = कोणी हृदयरूप अरणीवर (अग्नि उत्पन्न करण्याचें काष्ठ = अरणि) मंथा विवेक केला = विवेकाचा मंथन-दंड–मंथन-काष्ठ–रवि–केला (१३१). तो उपशमे निहटिला = शांतिरूप रज्जूनें करकचून बांधला. धैर्य भारें दाटिला = धैर्याच्या भारानें दाबला. गुरुवाक्यें काढिला = गुरुवाक्यानें–शब्दप्रकाशानें–घुसळला. बळकटपणें = सामर्थ्यानें, शक्तीनें, जबरीनें, दृढपणें, बळानें (१३२). ऐसें समरसें मंथन केलें = असें सर्व वृत्तींच्या ऐक्यानें मंथन केलें. तेथ झडकरि काजा आलें=अधिक चांगलें झालें, लवकरच तें उपयोगास आलें. जें उज्जीवन जालें ज्ञानाग्नीचें = ज्ञानाग्नीचें प्रज्वलन झालें (१३३). पहिला रिद्धिसिद्धिचा संभ्रम ( = मोह) = गौरव, धांदल, भ्रांति–(संभ्रम), त्वरा, भीति. (जन्मौषधि मंत्र तपः समाधिजाः सिद्धयः।–सिद्धि प्राप्त होतात त्या औषधि, मंत्र, तप आणि समाधि यांनीं अथवा जन्मतः). तो निवर्तून गेला धूम = भ्रांतिरूप धूर निघून गेला. मग प्रगटला सुक्षम विस्फुलिंग ( = अग्नीची ठिणगी) = ठिणगी सूक्ष्म व्यक्त–स्पष्ट झाली (१३४).

तया मनाचें मोकळें (=आश्रय अभाव, वाळलेलें जळण) = मनाचें स्वैर, अफाट, निर्बंध नसलेलें असें-तेंचि पेटवण घातलें = तेंच सर्पण घातलें. जें यमनियमि हळुवारलें । आईतें होतें = यमनियमांनीं हळुवारलें-प्रेमळतेस आणिलें,-तें सहज स्वयम् तयार झालेलें (-अहिंसासत्यास्तेय ब्रह्मचर्यपरिग्रहः यमः । शौच संतोषतपः स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः ।) (१३५). तेणें सादुकपणें ज्वाळा समृद्धा = अग्नि प्रदीप्तपणानें ज्वाला विपुलतेच्या झाल्या-ऐश्वर्याच्या झाल्या. मग वासनांतराचिया समिधा = होमांत घालण्याच्या समिधा-विशिष्ट वृक्षाच्या विशिष्ट मापाच्या काड्या-इच्छेचे निरनिराळे प्रकार. स्नेहेंसि नानाविधां । जाळिलिया = ममत्व प्रीति अहंकाररूप तुपासह-वासनांतर समिधा जाळिल्या, हवन केल्या (१३६).

तेथ सोऽहम् मंत्र-मंत्रे दिक्षिति = यज्ञकर्मानीं [तो मी (मी तो)] सोऽहमूरूपी मंत्रानें. इंद्रियकर्मांचिया आहुति = इंद्रियाचे-शरीराचा अवयव-ज्ञानसंपादनसाधन- कर्म, काम करण्याचें साधन-कर्म जें त्याच्या आहुति-द्रव्य यज्ञअग्नींत टाकावयाचें तें. तिये ज्ञाननळिं प्रदिप्तिं। दिधलिया = प्रज्वलित झालेल्या ज्ञानाग्नीमध्यें (आहुति) दिल्या (१३७).

पाठि प्राणक्रियेचियें-कर्माचिये सेवेनसि-स्रुवेनिसि ( = घृताहुति घालण्याचें यज्ञपात्र) तें-प्राणक्रिया-प्राणकर्मरूप-त्यासह. पूर्णाहुति पडलि-पडलिया हुतांशी = पूर्ण आहुति अग्नींत पडली तेव्हां. तेथ अवभृत ( = यज्ञांतील शेवटचें स्नान) समरसि सहजें जालें = सहजच तेथें यज्ञाच्या समाप्तीचें शेवटचें स्नान सर्व वृत्तींच्या ऐक्यानें झालें (१३८).

मग आत्मबोधिचें सुख = आत्मबोधरूपी म्हणजे स्वरूपज्ञानबोधाचें सुख मग. जें संयमाग्निचें हुतशेष = ध्यान-धारणा-समाधिरूपी संयम, तेथीलच्या अग्नीमध्यें हवनानंतर उरलेलें जें द्रव्य : अवशेष, शेष, हविर्द्रव्य, सोमरस, हवनद्रव्यविशेष, होमामध्यें उरलेलें-प्रसाद-अन्नशेष. तोचि पुरोडाश ( = यज्ञांत टाकण्याचें द्रव्य, यज्ञांतील हुतशेष) देख । घेतला तिहि = ज्यांनीं होमामध्यें उरलेला प्रसाद-अन्नशेष-घेतला तोच सोमरस पुरोडांश (१३९). एक ऐसें इहिं यजनिं-एक ऐशिया इहीं यजनीं = एक अशा ह्या यजन-यज्ञानें. मुक्त जाले ते-मुक्त ते जाहले-त्रिभुवनि-त्रिभुवनी = ते तिन्हीं भुवनांमध्यें मोक्ष पावलेले-मुक्त असे झाले. या यज्ञक्रिया ( = क्रियायोगः = तपः स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि क्रियायोगः।) तरि आनानि-आनानी = ह्या यज्ञक्रिया-अध्यात्म पूजाधर्मकृत्य इत्यादि-निरनिराळ्या अशा. यज्ञक्रिया = ईश्वरासाठीं केलेले होमादिक स्वधर्मधर्मविधि; (ध्येयप्राप्तीसाठीं केलेलें सतत आराधन). परि प्राप्य तें एक = पण मिळवावयाचें जें कांहीं तें तर एकच तें ब्रह्म होय (१४०).

कोणी एकानीं याप्रमाणें हे पार्था, सर्वथैव दोष क्षाळिले : एकानीं हृदयरूपी अरणीवर-अग्नि उत्पन्न करण्याच्या काष्ठानें विवेकाचा, कीं अहो, मंथन-दंड केला; विवेक हाच अग्नि उत्पन्न करण्याचा दंड केला. (१३१)

तो उपशमे म्हणजे शांतिरूप रज्जूनें नेटानें करकचून बांधला, धैर्यरूपी भार घालून दाबला (दाटिला); गुरुवाक्यरूपी बळकटपणानें घुसळला (कासिला). (१३२)

याप्रमाणें समरसें-सर्व वृत्तींच्या ऐक्यानें मंथन केलें; तेथें लवकरच-झडकर तेथें कामच झालें, काम काजास आलें; जें का ज्ञान-अग्नीचें प्रज्वलन (उज्जीवन) झालें. (१३३)

पहिला ऋद्धिसिद्धींचा मोह (संभ्रम)रूपी तो धूरच निघून गेला; व मगच अग्नीची सूक्ष्म ठिणगी प्रगटली. (१३४)

तेथें आतां तें मनाचें मोकळें असें वाळलेलें जळणच कीं, तेंच पेटवण घातलें-जें का यमनियमांनीं मवाळपण मृदुत्वास आलेलें, हळुवारलें असें आइतेच कीं होतें. (१३५).

त्या प्रदीप्तपणानें समृद्ध अशा ज्वाळा, तेथें मग वासनांतराच्यिया–अनेक वासनांच्या समिधा, ममत्वरूप तुपासह अनेकविध त्या जाळिलिया. (१३६)

तेथें सोऽहम् मंत्रानें इंद्रियकर्मांच्या आहुति त्या मंत्र-दीक्षितांनीं, त्या प्रदीप्त ज्ञान अनलाचे ठायीं दिधल्या. (१३७)

नंतर प्राणकर्मांच्या यज्ञपात्रानें घृताहुती हुताशी घातली; पूर्णाहुती पडिल्या हुताग्नींत तेथें तर सहजच कीं अवभृत–यज्ञांतील शेवटलें स्नान ब्रह्मरसींच कीं झालें! (१३८)

आत्मबोधीं होणारें सुख जें का संयम-अग्नीचे हुतशेष तोच यज्ञपुरोडाश (यज्ञांतील हुतशेष) ज्यांनीं घेतला .... (१३९)

एक कोणी अशा त्या यजन-यज्ञानें, यजनानें, तर त्रिभुवनामध्यें मुक्त झाले–त्या यज्ञक्रिया–आनआन–भिन्नभिन्न पण प्राप्य तें एकच! (१४०)

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥**

[अपरे = दुसरे कोणी–यज्ञकर्ते. द्रव्ययज्ञाः ( = दानयज्ञाः ) = यज्ञाच्या भावनेनें द्रव्याचा विनियोग करणें जें (सत्पात्रीं दान करणें–शुद्ध मार्गानें संपादन केलेल्या द्रव्याचा विनियोग) ते करतात : : तपोयज्ञाः = अनुष्ठान करतात–तपश्चर्या करतात तो तपोयज्ञ. योगयज्ञाः तथा = तसेंच दुसरे कोणी "योगश्चित्तवृत्तिनिरोधः" करून ध्यानयोग करतात : तो योगयज्ञ होय. स्वाध्याय यज्ञाः = कोणी वेदअध्ययनरूप यज्ञ करतात. ज्ञानयज्ञाः = शास्त्रज्ञान संपादन करणें, तो ज्ञानयज्ञ होय. च = आणि. संशितव्रताः यतयः = अत्यंत तीक्ष्ण कडकडीत व्रतें करणारे संन्यासी जो यज्ञ करतात, तो व्रतयज्ञ होय.]

**अन्वय :** अपरे। द्रव्ययज्ञाः। तपोयज्ञाः। तथा। स्वाध्याय (यज्ञाः)। ज्ञानयज्ञाः। च। संशितव्रताः। यतयः।

**अर्थ :** दुसरे यज्ञाच्या भावनेनं द्रव्यविनियोग करतात–तो द्रव्ययज्ञ (दानयज्ञ) होय; अनुष्ठान करतात, तपश्चर्या करतात तो तपोयज्ञ होय. चित्तवृत्तीनिरोध करून ध्यानयोग करतात, तो योगयज्ञ होय. वेदाध्ययन-रूप यज्ञ करतात, तो स्वाध्याय यज्ञ होय. शास्त्रज्ञान संपादन करतात तो ज्ञानयज्ञ होय; आणि तीक्ष्ण व्रत करणारे असे संन्यासी, ते व्रतयज्ञ होत (२८).

**एक द्रव्ययज्ञ म्हणिपति । एक तपसामग्रिया निपजति ।**
**एक योगयागही आहाति । जे सांगितले ॥ १४१ ॥**

**एकि शब्दिं शब्द योजिजे । तो वाग्यज्ञ म्हणिजे ।**
**ज्ञानें ज्ञेय गमिजें । ज्ञानयज्ञ ॥ १४२ ॥**

**हें अर्जुना सकळ कुहाडें । जें अनुष्ठितां अति सांकडें ।**
**परि जितेंद्रियासि विघडें । योग्यतावर्सें ॥ १४३ ॥**

**ते प्रवीण तेथ भले । आणि योगसमृद्धि आथिले ।**
**म्हणोनि आपणपां तिहिं केलें । आत्महवन ॥ १४४ ॥**

द्रव्ययज्ञ = द्रव्यादिकांनीं दान देणें (धन, वस्तु, तत्त्व, मद्य = द्रव्य). यज्ञ = याग, यज्ञ, होम, हवन, देवयज्ञ. तपसामग्रिया निपजति–निपजविती = त्यास तपाचरण करणें जें, तपोयज्ञ म्हणतात (तप = सामर्थ्य

असणें. सामग्री = साधनें, उपकरण, माल, द्रव्य. तपसामग्री = तपाचरणाचीं साधनें. योगयागही आहाति एक = अष्टांगयोग–यमनियमादि आठ प्रकारचा योग–हठयोग हे सर्व यज्ञच (१४१). वाग्यज्ञ = शब्दानें शब्दाचा यज्ञ केला जातो ज्यांत, तो वाग्यज्ञ. ज्ञानयज्ञ = ज्यांत ज्ञानानें ज्ञेय म्हणिजे ब्रह्मवस्तु मिळते तो ज्ञानयज्ञ. गमिजें = समजणें, मिळणें (१४२). कुहाडें-कुवाडें = कोडें, गूढ, आश्चर्य. सांकडें = भीड, संकोच, कठीण प्रसंग. अनुष्ठिता = कार्यारंभ सिद्धता, होम जप इत्यादि कर्म केल्यानें. जितेंद्रियासि विघडें–जितेंद्रियासीच्चि घडें = आत्मसंयमी जो, त्यासच घडते–सांपडते. (घट = घडा, गंडस्थळ, मस्तक इत्यादि. विघटित = दूर केलेलें. विघटन = विध्वंस). योग्यतावशें = लायकीचे, आधीनतेचे (योग्यत्व मोहित) (१४३). प्रवीण = निपुण, चतुर. योगसमृद्धि आथिले = योगरूपी संपत्ति, उन्नति, विपुलता, उन्नत, संपन्न. आपणपां आत्महवन केले तिहि = स्वतःचा जीव, आपण आपला, आत्म–होम-हवः–यज्ञ–स्वधर्मरूपी अग्नीमध्यें स्वकर्मरूपी यज्ञानें आत्म–स्व–कर्तव्य होम करणें जें— (१४४).

**द्रव्ययज्ञ**—एक द्रव्ययज्ञ-द्रव्यादिकांनीं दान देणें–म्हटले आहेत. **तपोयज्ञ**—एक तप-आचरणाचीं साधनें–सामग्री निपजवितात. **अष्टांगयोग**—एक योगयागही हठयोगादि करणारे आहेत, सांगितले ते हे सर्व यज्ञच. (१४१)

**वाग्यज्ञ**—एकानीं शब्दाचे ठायीं शब्द यजिलेला तो वाग्यज्ञ. **ज्ञानयज्ञ**—ज्यांत ज्ञानानें ज्ञेय म्हणजे ब्रह्मवस्तु मिळते, तो ज्ञानयज्ञ. (१४२)

**योग्यतावशें जितेंद्रियासीच साधतें.** अर्जुना, हें सकळ, हें कठीण जें का अनुष्ठिता अति सांकडे असें, पण योग्यतावशेंकरून जितेंद्रियासीच घडतें. (१४३)

**प्रवीण**—भले असे ते प्रवीण, तसेंच योगसमृद्धीनें जे महत्त्वाचे मानलेले आणि म्हणूनच कीं स्वतःसच कीं त्यांनीं आत्महवनाचें केलें. (१४४)

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथाऽपरे ।**
**प्राणापानगती रुध्द्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥**

[अपाने = अपानामध्यें. प्राणं जुह्वति = प्राणाचा (हु = होम करणें, आहुति देणें, संतोषविणें) होम करतात. प्राणे अपानं = प्राणाच्या ठायीं अपान. अपरे तथा = त्याचप्रमाणें दुसरे कोणी. प्राणापानगती रुध्द्वा = प्राणवायु व अपानवायूची गती (रस्ता, अवस्था, गमन) अटकावून ठेवून. प्राणायामपरायणाः = प्राणाच्या आयामाच्या, विस्ताराच्या, नियमनाच्या (अष्टांगयोगाच्या ठायीं) ठायीं अत्यंत आसक्त.]

**अन्वय :** अपाने प्राणं जुह्वति । अपरे प्राणे अपानं जुह्वति । तथा । प्राणायामपरायणाः । रुध्द्वा प्राण अपान गति ।

**अर्थ :** अपानामध्यें प्राणाचें हवन करतात. कोणी दुसरे त्याचप्रमाणें प्राणामध्यें अपान हवन करतात. प्राण व अपान यांची गती रोधून जें यज्ञ करणें, त्यास प्राणायाम-परायण म्हणतात (२९).

**मग अपानाग्निचें मुखि । प्राणद्रव्यें देखि ।**
**हवन केलें येकि । अभ्यासयोगें ॥ १४५ ॥**

**एक अपान प्राणिं अर्पिति । येक दोहींतें निरोधिति ।**
**ते प्राणायामि म्हणिपति । पंडुकुमरा ॥ १४६ ॥**

द्रव्य = अधिभूत वस्तु, पदार्थ, मूलतत्त्व, विनय, संपत्ति. (प्राणमय = पंचप्राणयुक्त, सजीव). प्राण = श्वास, जीव, देहस्थ पंचप्राण, हृदयस्थ वायु, वारा, बळ, जीवात्मा, परमात्मा, इंद्रिय, प्राणेंद्रिय, अन्न, विष्णु

इत्यादि. देखि प्राणद्रव्यें अपानाग्निचें मुखि अभ्यासयोगें हवन केलें = अग्न, मूलतत्त्व, अपानश्वास बाहेर टाकणें जें–तेथच्या मुखामध्येंच अभ्यास–योगबळानें हवन केलें. (अपान = श्वास बाहेर टाकणें जें; गुदद्वारस्थ वायु; (वै.) मलमूत्र खालीं नेणें) (१४५). एक अपान प्राणिं अर्पिति । येक दोहितें निरोधिति । ते प्राणायामि म्हणिपति । = कोणी दोन्ही प्राण व अपान ह्यांचा निरोध करतात, ते प्राणायामी–प्राणायाम-परायण –होत. प्राणायाम = नाकाच्या द्वारें श्वास घेणें, कोंडणें वगैरे क्रिया. परायण = अत्यंत आसक्त (१४६).

प्राणायामपरायणाः —आत्महवन केलेले जे, ते मग अपान वायूचे मुखीं प्राणद्रव्यें–देखीनें, एकानें, अभ्यासानेंच कीं हवन केलें .... (१४५)

एका प्राणाचे ठायीं अपान अर्पण करतात, कोणी एक दोन्हीही वायूंचा निरोध–विरोध करतात; ते प्राणायामी म्हटले होत, हे पंडुकुमरा .... (१४६)

**अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥**

[अपरे = दुसरे आणीक कोणी. आहाराः नियताः = आहार सर्व आवरून धरिला. प्राणान् प्राणेषु जुह्वति = प्राणाचा प्राणांत होम करतात; (हु = होम करणें, आहुति देणें, संतोषविणें). अपि एते सर्वे = तरी हे सर्व. यज्ञविदः = यज्ञ जाणणारे होत. यज्ञक्षपितकल्मषाः = यज्ञानें पाप, डाग, घाण, घाणेरडे धुतलेले असे होत. (क्षप् = उपास करणें, पाठविणें, (काळ) घालविणें, फेंकणें).]

**अन्वय :** नियत आहाराः। अपरे। प्राणान् जुह्वति प्राणेषु। अपि। एते सर्वे यज्ञविदः। यज्ञक्षपितकल्मषाः।

**अर्थ :** दुसरे कोणी आहाराचें नियमन करून प्राणाचा प्राणांत लय, हवन करतात. असे हे सर्व असले तरी सुद्धा त्यांना यज्ञविद् म्हणतात; कारण त्यांनीं यज्ञानें आपलें पाप धुऊन टाकलेलें असतें म्हणून (३०).

**एवं वज्रयोगक्रमें । सर्वाहार संयमें ।**
**प्राणिं प्राण संभ्रमें । हवन करिति ॥ १४७ ॥**

**एक मोक्ष काम सकळ । समस्त हे यजनशीळ ।**
**जिहिं यज्ञद्वारें मनोमळ । क्षाळण केले ॥ १४८ ॥**

**जयां अविद्याजात जाळितां । जें उरलें स्वभावतां ।**
**जेथें अग्नि आणि होता । उरेचिना ॥ १४९ ॥**

**तेथें यजितियांचा काम पुरे । यज्ञिचें विधान सरें ।**
**मागुते तेथून वोसरें । क्रियाजात ॥ १५० ॥**

**विचार जेथें न रिघे । हेतु जयातें नेघे ।**
**जे द्वैत दोष संगे । लिंपेचिना ॥ १५१ ॥**

एवं–एक. वज्रयोगक्रमे = [वज्र = १) इंद्राचें आयुध. २) हिरा. ३) × अशा आकाराचा काळा अभ्रक.] (योग = चित्तानुरोध) क्रम = पर्याय, पद्धति, पाऊल, अनुक्रम. वज्र + अग्नि = विद्युदग्निः -मूळबंधापासून उत्पन्न झालेली उष्णता. सर्वाहार संयमे = सर्व आहाराचा निग्रह–आवरून धरणें. प्राण–प्राणु. संभ्रमें हवन करिति = भ्रांती, गौरव त्वरेनें हवन (अग्नींत आहुती टाकणें, होम) करतात (१४७). एक मोक्ष काम सकळ = असे मोक्ष इच्छिणारे ते सर्व. हे समस्त यजनशीळ = पूजा करणारे, सद्वर्तनाचे, स्वभावानें यज्ञशील असे सर्व समस्त. यज्ञद्वारें–यज्ञद्वारा = यज्ञरूपी उपायानें, साधनानें; वेळेस यज्ञ उपाय करणारे. मनोमळ क्षाळण केले = मनाचा कलंक–मन पाप समजणारे जे, ते धुतले–स्वच्छ केले–(१४८).

अविद्याजाता–अविद्याजात = अज्ञान, माया, प्रकार. जाळितां जें उरलें स्वभावतां–निजस्वभावता = प्रकाशित होण्यानें का जाळण्यानें, जें स्वभावेंकरून उरलेलें सहजकर्म आपलें स्वाभाविक. जेथें–जेथ. अग्नि आणि होता उरेचिना = होमकर्ता पुरोहित व अग्नि असे मुळीं नच उरणारे ऐक्याते मुळें (१४९). तेथें–जेथ यजितियांचा–यजितयाचा काम पुरे = यजन करणाऱ्यांचा काम पुरेसा होतो. विधान यज्ञिंचे सरें = यज्ञ स्वधर्म, प्रकार, नियम, सेवा, विधि, वाक्य, अनुष्ठान हें संपतें. तेथून–जेथोनि–क्रियाजात वोसरें = क्रियाप्रकार, अभ्यास, प्रायश्चित्त हें ओसरतें. मागुते = तथापि, परत, शिवाय (१५०). जेथें–जेथ विचार न रिघे–रिगे = जेथें मनन, समजूत, शंका, विचाराचा शिरकाव होत नाहीं–जयातें नेघे हेतु = उद्देश, दोष, कारण, साधन तिथें. जे द्वैत दोष संगे = भिन्नपणा, भेदबुद्धिरूपी दोषाच्या सोबतीनें, स्पर्शानें. लिंपेचिना = दूषित केलें जात नाहीं, चेतवलें होत नाहीं– (१५१)

वज्रयोग, हठयोग—कोणी वज्रयोग क्रमानें–हठयोगाच्या क्रमानें सर्व आहार जिंकून, नियमित करून, प्राणाच्या ठायीं प्राणच निःशंकपणें हवन करतात. (१४७)

मोक्षकाम—असे सकळ मोक्षकाम, मोक्षाची इच्छा करणारे मुमुक्षु, हे सकळ यजनशीळ असून, ज्यांनीं का यज्ञाच्या योगेंकरून मनोमळ धुऊन टाकिले, क्षाळिले. (१४८)

निजनित्य—ज्या यजनानें अविद्याजात जाळिली, नाहींशी केली, हविली, तेथें आतां जें स्वभावतः उरलें–तें निज (तेथें का) जेथें तर अग्नि आणि होता, असें कांहींच उरत नाहीं. (१४९)

ज्ञानयज्ञविद्—ज्या यज्ञानें यजन करणाऱ्याचा काम पुरेसा होतो–पडतो–यज्ञी यजनाचें तें विधान सरतें, संपतें व मग जेथूनच कीं हें सर्व क्रियाजात वोसरतें–नाहींसें होतें– (१५०)

विचार जेथें रिघूं शकत नाहीं, हेतु ज्यास घेत नाहीं, जें द्वैतदोषाच्या संगानें लिंपनच मुळीं नाहीं– (१५१)

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम्।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥**

[ यज्ञशिष्ट अमृत भुजः = यज्ञामध्यें उरलेला, शिल्लकरूपी भाग तेच अमृतसेवन करणारे. सनातनं ब्रह्म यान्ति = चिरस्थायी, शाश्वत ब्रह्माप्रत जातात, ब्रह्म होतात. अयज्ञस्य अयं लोकः न अस्ति = कसलाहि यज्ञ आपण–धन, सजातीय, आत्मा, कर्म, धर्म, याग, होम–न करणारे जे त्यांना हा लोक मिळत नाहीं. अन्यः कुतः (लोकः अस्ति) = दुसरा तो कसचा का कुठला मिळणारा बरें ! ]

**अन्वय :** यज्ञशिष्ट अमृत भुजः । कुरुसत्तम । सनातनं ब्रह्म यान्ति । अयज्ञस्य अयं लोकः न अस्ति । कुतः अन्यः ।

**अर्थ :** यज्ञ-अवशेषरूपी अमृत सेवन करणारे सनातन ब्रह्माप्रत जातात; जे यज्ञ करीत नाहींत, त्यांना हा लोक मिळत नाहीं–त्यांना दुसरा कसचा लोक मिळणारा तो !! (३१).

**ऐसें अनादिसिद्ध चोखट । जे ज्ञानयज्ञावशिष्ट ।**
**ते सेविति ब्रह्मनिष्ठ । ब्रह्माहंमंत्रें ॥ १५२ ॥**

**ऐसें शेषामृतें धाले । किं अमर्त्यभावा आले ।**
**म्हणोनि ब्रह्म तेचि जाले । अनायासें ॥ १५३ ॥**

**येरां विरक्ति माळ न घालीचि । जयां संयमाग्नि सेवा न घडेचि ।**
**जे योगयाग न करितीचि । जन्मले सांते ॥ १५४ ॥**

**जयांचें ऐहिक धड नाहिं । तयांचें परत्र पुससि कायि ।**
**म्हणोनि असो हे गोष्टि पाहि । पंडुकुमरा ॥ १५५ ॥**

अनादिसिद्ध = आदीसी जे आदि; मूळ आरंभ. चोखट = सुंदर, परब्रह्म, सत्त्व, वाक्य, ज्ञान, रत्न, सामर्थ्य. ज्ञानयज्ञावशिष्ट = ज्ञानयज्ञाचे शेष उरलेलें. ब्रह्मनिष्ठ = मूळतत्त्व ब्रह्म जें; तत्पर. ब्रह्म अहं मंत्रें = अहं ब्रह्मास्मि मंत्रें यज्ञ-अवशिष्ट ब्रह्माचें सेवन करितात (१५२). शेषामृतें धाले = उरलेलें शेष अन्न–अमृत–(पिऊन) तृप्त झाले. किं अमर्त्यभावा आले = अमरपदाला पावले, अमरपणाला आले. म्हणोनि ब्रह्म तेचि जाले अनायासें = सहजच कीं ते ब्रह्म, परब्रह्म झाले (१५३). विरक्ति माळ न घालीचि = विरक्तता कृपाप्रसादाची होत नाहीं; वैराग्य त्यास वरीत नाहीं–त्याशीं विवाह करीत नाहीं–त्याचे जवळ येत नाहीं. जया संयमाग्नि सेवा न घडेचि = ध्यान-धारणा-समाधि हीं जीं योगाचीं अंगें त्यांची सेवा घडेना. योगयाग न करितीचि जन्मले सांते = जन्मले असून–नरदेहाला येऊन–जे कोणताच संयमयज्ञ करीत नाहींत (१५४). जयांचें ऐहिक धड नाहीं = ज्यांचा प्रपंच धड नाहीं; ज्यांची इहलोकीं धडगत नाहीं. तयांचें परत्र पुससि कायि = त्यांचा परलोकचा अहवाल काय पुसतोस. म्हणोनि हे गोष्टि असो पाहि = करितां ह्या असल्या गोष्टी असोत (१५५).

असे यज्ञ-अवशिष्ट, अनादिसिद्ध चोखट ब्रह्मज्ञान जें, तें तर ब्रह्मनिष्ठ अहं ब्रह्मास्मि ह्या मंत्रेंकरून सेवितात. (१५२)

असे यज्ञ-अवशेष अमृतानें धालेले ते जसें का अमरपदाला पावले (अमर्त्यभावा आले): आणि म्हणूनच कीं ते अनायासेंकरूनच कीं "ब्रह्म" झाले. (१५३)

इतरांना–दुसऱ्यांना विरक्ति माळ घालीचना–ज्यांना संयम-अग्नीची सेवा घडेचि ना-जे जन्मले असून–नरदेहाला येऊन–जे कोणताच संयमयज्ञ करीत नाहींत. (१५४)

ज्यांचा धड प्रपंच नाहीं, ज्यांची इहलोकीं धडगत नाहीं, त्यांची परलोकची गोष्ट, अहवाल, हालत काय विचारावी ! म्हणून हे पंडुकुमरा, देख कीं अशी ही गोष्ट असो. (१५५)

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥**

[ एवं = याप्रमाणें. बहुविधाः यज्ञाः = अनेक तऱ्हेचे यज्ञ. ब्रह्मणो मुखे वितता = ब्रह्मदेवाच्या मुखांतून निघालेले–विस्तार पावलेले. तान् सर्वान् कर्मजान् विद्धि = ते सर्व कर्मफळ होय–ते सर्व कर्मापासून उत्पन्न झालेले जाण. एवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे = याप्रमाणें असें हें आहे; हें जाणल्यानें तूं कर्मापासून मुक्त होशील. ]

**अन्वय :** ब्रह्मणो मुखे एवं बहुविधा यज्ञा वितता। तान् सर्वान् कर्मजान् विद्धि । एवं (तान् सर्वान् ज्ञात्वा) ज्ञात्वा विमोक्ष्यसे ।

**अर्थ :** याप्रमाणें अनेक प्रकारचे यज्ञ ब्रह्मदेवाच्या मुखांतून विस्तार पावले आहेत–ते सर्व कर्मफळ होय–कर्मापासून जन्मलेले होत; हें जाणल्यानें तूं कर्मापासून मुक्त होशील (३२).

**ऐसें बहुतेपरि अनेग । जें सांगितलें तुज याग ।**
**तें विस्तारूनि वेदें चांग । म्हणितलें आहाति ॥ १५६ ॥**
**परि तेणें विस्तारें काय करावें । हेंचि कर्मसिद्धि जाणावें ।**
**येतुलेनि कर्मबंध स्वभावें । पावैल ना ॥ १५७ ॥**

बहुतेपरि–बहुती परी = अनेकप्रकारचे. अनेग (अनंग ×) = अनेक. तुज याग–तुज का याग = यज्ञ (याग = यज्ञ, होम). वेदें चांग म्हणितलें आहाति = ते सर्व चांगलेच आहेत, असें वेदांनीं म्हटलें आहे; वेदांनीं ते सविस्तर सांगितले व चांगले म्हटले (१५६). हेंचि–हें. कर्मसिद्धि–कर्मसिद्ध = हे सर्व यज्ञ कर्मापासून सिद्ध झाले आहेत हें जो जाणतो, त्याला कर्माची बाधा होणार नाहीं. कर्मबंध स्वभावें पावैल ना–पावेल ना = कर्ममूलक होत असें जाणावें. परि तेणें विस्तारें काय करावें = पण त्या विस्ताराशीं काय करावयाचें आहे? एवढ्यानें–हें जाणल्यानें–कर्मफळाचा दोष लागणार नाहीं (१५७).

असे अनेक याग, बहुत प्रकारांनीं होणारे तुला सांगितले कीं, ते सर्व याग चांगलेच आहेत असे वेदांनीं विस्तार करून म्हटलें आहे– (१५६)

पण त्या विस्तारास काय करायचें आहे? कारण काय तर, हे सर्व कर्मसिद्ध–कर्ममूलक–असेच जाणावेत: हे सर्व यज्ञ कर्मापासून सिद्ध झाले आहेत हें जो जाणतो, त्याला कर्मफळाचा दोष लागणार नाहीं, कर्माची बाधा त्याला–पावेल ना–होणार नाहीं. (१५७)

**श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

[परंतप = हे शत्रुतापना. द्रव्यमयात् यज्ञात् = द्रव्य म्हणजे पदार्थ, मूलतत्त्व, योग्य वस्तु, अधिभूत, धन, वस्तु–तत्त्वमय यज्ञापेक्षां–ज्ञानयज्ञ श्रेयान् = ज्ञानयज्ञ उत्तम असा कल्याणकारक (मोक्ष देणारा). पार्थ, अखिलं कर्म सर्वं = न खिळिला गेला मोक्षप्राप्तीला–म्हणजे मोक्षाचे ठायींच प्रतिबद्ध होतो–कर्म सर्वच्या सर्व–हे पार्था. परिसमाप्यते ज्ञाने = मोक्षरूप ज्ञानामध्यें अंतर्भूत होतें.]

**अन्वय :** परंतप। ज्ञानयज्ञः श्रेयान्। द्रव्यमयात् यज्ञात्। पार्थ। अखिलं सर्वं कर्म ज्ञाने परिसमाप्यते।

**अर्थ :** हे शत्रुतापना, ज्ञानयज्ञ श्रेष्ठ होय. बाकीच्या दुसऱ्या द्रव्यमय यज्ञापेक्षां–हे पार्थ, सर्व अखिल (मोक्षरूपी बद्धतेचे न होतां) कर्म तें ज्ञानामध्यें अंतर्भूत होतें, शेवटास येतें–परिसमाप्तीचें होतें (३३).

**अर्जुना वेद जयाचें मूळ । जें क्रियाविशेष स्थूळ ।**
**जया नव्हाळियेचें फळ । स्वर्गसुख ॥ १५८ ॥**

**ते द्रव्यादि याग कीर होति । परि ज्ञानयज्ञाचि सरि न पवति ।**
**जैसि तारा तेजे संपत्ति । दिनकरापासि ॥ १५९ ॥**

**देखें परमात्मसुखनिधान । साधावया योगिजन ।**
**जें न विसंबति अंजन । उन्मेष नेत्रिचें ॥ १६० ॥**

*वेद जयाचें मूळ* = ज्या यज्ञाचें मूळ वेद आहेत. *जें क्रियाविशेष स्थूळ* = ज्यांत बाह्य क्रियांचाच खटाटोप फार आहे. जया नव्हाळियेचें फळ स्वर्गसुख = ज्याचें अपूर्व फळ स्वर्ग आहे (१५८). ते द्रव्यादि याग कीर होती = ते द्रव्ययज्ञादिसुद्धां याग–यज्ञ खरे आहेत. परि ज्ञानयज्ञाचि सरि न पवति = पण त्यांना ज्ञानयज्ञाची योग्यता का बरोबरी नाहीं. जैसि तारा तेजे–तेज–संपत्ति दिनकरापासि (शी) = कसें म्हणावें तर, चांदण्याच्या प्रकाशाचा जसें का नक्षत्र तारकांचा प्रकाश–अतिशयपणा–सूर्यापुढें काय होय? सूर्याजवळच त्या नक्षत्र ताऱ्यांचा प्रकाश ना! तारकांनीं कांहीं निराळेपणें केव्हांहि प्रकाशणें नाहींच! (१५९). परम आत्मसुख निधान = आत्मसुखनिधिप्राप्तीसाठीं. साधावया योगिजन = निधान साधण्या–पावण्यासाठीं योगीजन जे. जें न विसंबति–विसंबिति–उन्मेष नेत्रिचें–उन्मेषनेत्री अंजन = ज्ञानांजन डोळ्यांत घालतात; तें अंजन ते केव्हांहि विसरत नाहींत-त्याचा वियोग होऊं देत नाहींत (१६०).

हे अर्जुना, ज्या यज्ञाचें मूळ वेद आहेत, त्यांत बाह्य क्रियांचाच खटाटोप फार आहे व ज्याच्या अपूर्वतेची नवाई फळ स्वर्ग आहे- (१५८)

ते द्रव्ययज्ञादि यज्ञ खरे, पण त्यांना ज्ञानयज्ञाची योग्यता-बरोबरी येणार नाहीं-नक्षत्रतारांचा प्रकाश सूर्यापुढें काय होय? चांदण्याच्या प्रकाशाचा अतिशयपणा सूर्यापुढें जशी का- (१५९)

योगी उन्मेषनेत्री अंजन न विसंबिती-आत्मसुखप्राप्ती साधावयास विसरत नाहींत- (१६०)

**जें धांवतया कर्माचि लाणि । नैष्कर्म बोधाचि खाणि ।**
**जें भुकेलियाची धणि । साधनांची ॥ १६१ ॥**

**जेथ प्रवृत्ति पांगुळ झाली । तर्काचि दिठि गेली ।**
**जेणें इंद्रियें विसरलि । विषयसंग ॥ १६२ ॥**

**मनाचें मनपण गेलें । जेथ बोलाचें बोलकेपण ठेलें ।**
**जयामाजि सांपडलें । ज्ञेय दिसे ॥ १६३ ॥**

**जेथ वैराग्याचा पांग फिटे । विवेकाचाहि सोस तुटे ।**
**जेथ न पाहतां सहज भेटे । आपणपें ॥ १६४ ॥**

जे धांवतया कर्माची लाणि = तें अंजन कर्माचें विश्रांतिस्थान, कर्माचा शेवट जो (कर्माची जी धांव तिचा शेवट). नैष्कर्म-नैष्कर्म्य बोधाची खाणि = कर्म करूनही नैष्कर्म्य साधणें जें, त्याची खाणच एक. जें भुकेलियाची साधनांची धणि = सुखासाठीं धडपडणाऱ्यांच्या-भुकेलियांच्या-साधनांची जी तृप्ति (धणि) (१६१). प्रवृत्ति पांगुळ झाली = प्रवृत्ति-संसारिक वृत्ति-प्रेरणा-हेतु यांचें कारण-प्रेरणा कुंठित झाली, लंगडी पडली. तर्काचि दिठि गेली = तर्काचें पाहणें, विचारदृष्टीचें होणें नाहींसें झालें. तर्क = न्यायशास्त्र, तर्कशास्त्र, प्रत्यक्ष प्रमाण, अनुमान, प्रमाण, धाबरून निर्णय घेणें जें. विषयसंग इंद्रियें विसरलि = [ विषय = १) मन व इंद्रियें यांना गोचर होणाऱ्या वस्तु-व त्यांचें ज्ञान किंवा अनुभव. २) शब्दादि विषय (वृत्ति, ऊर्मि). (इंद्रियदमनानं त्यांची ताटातूट करावी, असें म्हटलें आहे जें)] इंद्रियांनीं आपापले विषय विसरून जाण्याचें केलें (१६२).

मनाचें मनपण गेलें = [ मन = १) चित्त, बुद्धि, विचार, तर्क, स्मृति इत्यादींचें उगमस्थान. २) हृदयांतील भाव व विकार. ३) जाणीव, इच्छा, भान, अंतःकरणाची आवड व ओढ).] बोलाचें बोलकेपण ठेलें = टपका, शब्द, वचन, विधान, प्रश्नोत्तर, प्रभाव, दोष बोलणें ठेलें-बंद पडलें. जयामाजि सांपडलें ज्ञेय दिसे = (ज्ञेय = ब्रह्मवस्तु) जेथें ब्रह्मच दिसूं लागतें-(१६३). जेथें वैराग्याचा पांग फिटे = वैराग्याची गरज पुरली होते-आणखी अपेक्षा राहत नाहीं-वैराग्याचे जेथें श्रम परिहार होतात. विवेकाचाहि सोस तुटे = विवेकाचा सोस, हांव, नाहींशी होते. जेथ न पाहतां सहज भेटे आपणपें = जेथ पाहिलें, पाहणें झालें नाहीं तरी सुद्धां सहज कीं आपण स्वतः आपल्या स्वतःस भेटणें होतें-(१६४).

धांवत्या कर्माची लाणि म्हणजे शेवट-म्हणजे विश्रांतिस्थान-जी नैष्कर्म्य बोधाची खाणीच एक-जे सुखासाठीं धडपडणाऱ्या भुकेलिया साधनांची तृप्ती धणीच कीं- (१६१)

जेथें प्रवृत्ति पांगुळली; तर्काची दृष्टि नाहींशी झाल्यामुळें, इंद्रियें विषयांचा संगच विसरून गेलीं- (१६२)

मनाचें मनपण नाहींसें झालें, बोलकेंपण जें बोलाचें-बोल बोलण्याचें तें थांबलें; व आतां तर ब्रह्मवस्तुच दिसत आहे, देखत आहे, सांपडली आहे- (१६३).

ब्रह्मवस्तु दिसूं लागल्यामुळें वैराग्याचे श्रम परिहार होत आहेत; विवेकाचा सोस नाहींसा झाला, तुटून गेला-होत आहे; तेथें सहजासहजींच कीं, न पाहतांही, आपण स्वतःच आपणा स्वतःस भेटला असें होत आहे- (१६४)

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

[तत् विद्धि प्रणिपातेन = प्रणिपात, नमस्कार, नमन, विज्ञप्तीनें, नम्रतेनें जाणून घे. परिप्रश्नेन सेवया = तसेंच प्रश्न उत्तर, साधक बुद्धि व शुद्ध भाव; तसेंच कीं सेवेनें. तत्त्वदर्शिनः उपदेक्ष्यन्ति ज्ञानं = तत्त्वदृष्टीचे जे, ते, तें ज्ञान उपदेशितील–त्या ज्ञानाचा उपदेश करितील. ज्ञानिनः = ज्ञानी, तत्त्वदर्शी, तत्त्वज्ञानी, निःस्पृह, विद्वान्, पंडित (वेदवेदांत–गुरुमुखाशिवाय साध्य होत नाहीं).]

**अन्वय :** तत् ज्ञानं । ज्ञेयं ब्रह्मवस्तु । प्रणिपातेन । परिप्रश्नेन । सेवया । तत्त्वदर्शिनः । ज्ञानिनः । ते । उपदेक्ष्यन्ति ।

**अर्थ :** तें ज्ञान (ज्ञेय ब्रह्मवस्तु) तत्त्वदर्शी ज्ञानी जे, त्यांना प्रणिपात करण्यानें, त्यांच्याशीं संवाद (प्रश्न-उत्तररूपी) करण्यानें, तसेंच त्यांची सेवा करण्यानें–तें ज्ञान तुजला उपदेशितील (३४).

**तें ज्ञान पैं गा बरवें । जन्हि मनिं आथि जाणावें ।**
**तन्हि संतातें भजावें । सर्वस्वेंसि ॥ १६५ ॥**

**जो ज्ञानाचा कुरठा । तेथ सेवा हा दारिवटा ।**
**तो स्वाधीन करि सुभटा । वोळगोनि ॥ १६६ ॥**

**तरि तनु मन जिवें । चरणासि लागावें ।**
**आणि अगर्वता करावें । दास्य सकळ ॥ १६७ ॥**

**मग अपेक्षित जें आपलें । तेंहि सांगति पुशिलें ।**
**जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा नये ॥ १६८ ॥**

**जयाचें वाक्यउजियेडें । जाहलें चित्त निधडें ।**
**ब्रह्माचेंनि पाडें । निःशंक होयें ॥ १६९ ॥**

तें ज्ञान पैं बरवें = तें ज्ञान चांगलें असें. मनिं आथि जाणावें = तें ज्ञान जाणावें असें मनांत आहे तर. संतातें–संता या–भजावें सर्वस्वेंसि = आपल्या सर्वस्वासहित सज्जनांना, ज्ञानांना, संतांना भजावें, तनमनधनें-करून संतांची सेवा करावी (१६५). जो–जे ज्ञानाचा कुरठा–कुरूठा ( = घर) = संत हेच ज्ञानाचें घर होत. सेवा हा दारिवटा–दारिवंटा ( = उंबरा) = दार, देवाचें द्वार म्हणजे सत्संग तो क्षणभर कर म्हणजे चारी मुक्ति मिळतील. [महत्सेवा द्वारमाहुर्विमुक्तेः ।–भागवत]. सुभटा = योध्या. वोळगोनि स्वाधीन करि = आश्चर्य करून–विस्मयतेनें–सेवा करून स्वाधीन करून घे (१६६). तनु मन जीवें ( = कायावाचामनें) = कायेनें, मनानें, जीवित्वानें. चरणासि लागावें = चरणांचा आश्रय करावा. अगर्वता दास्य सकळ करावें = एकंदर, सर्व, संपूर्ण–निरभिमान होऊन सर्व दास्य करावें. दास्य = चाकरी, सेवा, भक्ति. (अखंड अगर्वता होऊनि असति । तयातें विनय हेचि संपत्ति । ९–२२६ ।) [गर्व, अभिमान, अहंकार–(अभावे–नहि, अ, नो, न, इति ४।)] (१६७). आपले (इच्छित) अपेक्षित जें = आपलें गरजेचें जें कांहीं इच्छित. तेंहि सांगति–सांगतिल–पुशिलें = तें पुसिलें–विचारिलें असतां समजून देतील–सांगतील. जेणें बोधलें अंतःकरण संकल्पा नये = बोधरूप झालेलें मन संकल्प-विकल्परहित होईल. ज्यायोगें बोललेलें–उपदेशिलेलें तें (मन अंन्तःकरण-शक्ति बुद्धि) अंतःकरण संसारासंबंधीं कल्पना–करणार–करीत नाहीं–(१६८). जयाचें वाक्यउजियेडें = ज्याच्या शब्दप्रकाशानें. चित्त संकल्पा नये = चित्त निर्भय होईल (१६९).

तें ज्ञान चांगलें–बरवें–असें जरी का मनीं पूर्णपणें जाणावें असें वाटलें तरी संतांना आपल्या सर्वस्वानें भजावें. (१६५)

जे संत ज्ञानाचें घर होत–तेथें सेवा हाच दरवाजा [(महत्सेवा) "द्वारमाहुर्विमुक्तये" असें भागवतातहि म्हटलें आहे, तसेंच हरिपाठामध्यें "देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी"–येथें देवाचें घर म्हणजे सत्संग, तो क्षणभर कर म्हणजे चारी मुक्ति मिळतील असा अर्थ] तो हे सुभटा–संतांना (–वोळगे वोळगे कृपण द्वारावतियें रावो–) वोळगोन, आळवून आपल्या स्वाधीन कर. (१६६)

करितां (तनमनधनेंकरून, कायावाचामनेंकरून) तनुमनजीवप्राणेंकरून संतांच्या चरणास लागावें; व अगर्वता, निरभिमान होऊन सकळ दास्य करावें; ज्ञान जाणणें तर संतांना भजावें; निरहंकारतेनें सकळ सेवा (श्वश्रुति) करावी. (१६७)

मग आपलें जें कांहीं इच्छित–अपेक्षित, तें त्यांना पुसिलें, विचारिलें असतां ते सांगतील, ज्यायोगेंकरून, ज्या त्यांच्या सांगण्यावरच मुळीं मन–अंतःकरण हें बोधलेलें होऊन, संकल्पास येत नाहीं–संसारासंबंधीं कल्पना करीत नाहीं. (१६८)

ज्यांच्या वाक्यप्रकाशानें चित्त निर्भय–निधर्डें–झालें, तें ब्रह्माच्या बरोबरीच्या योग्यतेचें असे निःशंक होते–जाहले. (१६९).

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥**

[न पुनर् एवं मोहं यास्यसि = मोह पावणार नाहीं पुन्हा अशा तऱ्हेचा. भूतानि अशेषेण = सर्व अशेष भूतें. द्रक्ष्यसि आत्मनि = आपल्यामध्यें, आत्म्यामध्यें पाहशील. यथा मयि = जसें का मजमध्यें तें पाहणें केलेंस.]

**अन्वय :** पाण्डव, एवम् यत् (ज्ञानं ज्ञेयं) ज्ञात्वा न पुनर् मोहम् यास्यसि । येन (ज्ञानेन) अशेषेण भूतानि आत्मनि द्रक्ष्यसि । मयि यथा ।

**अर्थ :** हे पांडव, तें ज्ञान जाणलें असतां पुन्हा असला मोह तुजला प्राप्त होणार नाहीं, ज्या ज्ञानानें सर्वभूतमात्र (पाहविलीं जातील) पाहशील तूं आपल्या स्वतःच्या मध्येंच जसें का तें पाहणें मजमध्येंच झालें का !–(३५).

**तें वेळिं आपणपेंनि सहितें । इयें अशेषेंहि भुतें ।**
**माझ्या स्वरूपिं अखंडितें । देखसि तुं ॥ १७० ॥**

**ऐसें ज्ञान प्रकाशें पाहिल । तैं मोहांधकार जाईल ।**
**जैं श्रीगुरुकृपा होईल । पार्था गा ॥ १७१ ॥**

आपणपेंनि–आपणपेया सहितें = स्वतःसकट. तें वेळिं = त्यावेळेस. इयें अशेषेंहि भुतें = सर्व विश्व. माझा–माझ्या स्वरूपिं अखंडितें देखसि तुं = मद्रूपीं पाहशील (१७०). पाहिल–पाहेल = पाहशील. मोहांधकार जाईल = मोह, अंधार, अज्ञान नाहींसें होईल. जैं श्रीगुरुकृपा होईल = जेव्हां का मग श्रीगुरूची कृपाच कीं झाली–होईल (१७१).

त्यावेळेस आपणा स्वतःसकट अखंडित सर्व विश्व, हीं अशेष भूतें माझ्या स्वरूपीं–मद्रूप पाहशील. (१७०)

असें ज्ञान प्रकाशानें (उजेडाचें) प्रकाशाचें होईल, दिवस उगवेल, त्याच वेळीं मोहरूपी अंधःकार नाहींसा होईल, आणि तेव्हांच कीं, हे पार्था, बाप्पा, श्रीगुरुकृपा होईल. (१७१)

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

[अपि चेत् असि (त्वम्) = कदाचित् तूं असशील. पापकृत्तमः सर्वेभ्यः पापेभ्यः = सर्व पाप्यांपेक्षाहि जास्त पापी. सर्वं अशेषम् वृजिनम् = पङ्कम्, पाप्मा, पापम्, किल्बिषम्, कल्मषम्, कलुषम्, वृजिनम्, एनः, अघम्, अहः, दुरितम्, दुष्कृतम् इति १२ पापस्य। ज्ञानप्लवेनैव = तत्त्वज्ञानरूपी नौकेच्या साहाय्यानें. (प्लव = उडुपम्, प्लवः, कोलः इति ३ अल्पनौकायाः।) संतरिष्यसि = सहजासहजीं तरून जाशील.]

**अन्वय :** अपि चेत्। सर्वेभ्यः पापेभ्यः। पापकृत्तमः। असि त्वम्। तत् सर्वं। ज्ञानप्लवेन एव। वृजिनम्। संतरिष्यसि।

**अर्थ :** कदाचित् सर्व पाप्यांमध्येंहि तूं अतिशय पापी असलास, तरीसुद्धां तत्त्वज्ञान-नौकेंत-नौकेच्या साहाय्यानें-तें सर्व पाप सहजच तरून जाशील (३६).

**जरि कल्मषाचा आगरु । तुं भ्रांतिचा सागरु ।**
**व्यामोहाचा डोंगरु । होउनि असलि ॥ १७२ ॥**

**तन्हि ज्ञानशक्तिचेनि पाडें । हें अवघेंचि गा थोकडें ।**
**ऐसें सामर्थ्य असें चोखडें । ज्ञानिं ईयें ॥ १७३ ॥**

**देखे विश्वभ्रमा ऐसा । जो अमूर्तिचा कडसा ।**
**ते जयाचिया प्रकाशा । पुरेचिना ॥ १७४ ॥**

**तयां कायसे हे मनोमळ । जे बोलताचि अति किडाळ ।**
**नाहीं येणें पाडें ढिसाळ । दुजें जगिं ॥ १७५ ॥**

कल्मषाचा आगरु = (तूं) जरी कल्मषाचा-पापाची खाण, घर, शेत-साठा असलास (तरीसुद्धां). भ्रांतीचा सागरु = भ्रम, भास, संशय, खोटें इत्यादींचा समुद्रसाठा. व्यामोहाचा डोंगरु = विशेष मोह, विपुलता, भ्रमाची रास. होउनि असलि = आहेस-आहासी (१७२). तन्हि ज्ञानशक्तिचेनि पाडें = ज्ञानशक्ति प्रचंड आहे-तिच्यापुढें. हें अवघेंचि गा थोकडें = हें सर्व तुच्छ आहे. ऐसें सामर्थ्य असें चोखडें। ज्ञानिं ईयें = तिच्यापुढें (ज्ञानशक्तीपुढें) पाप वगैरे सर्व तुच्छ आहे; असें चांगलें सामर्थ्य त्या शक्तींत आहे (१७३). विश्वभ्रमा ऐसा-विश्वसंभ्रमा ऐसा = विश्व सत्य आहे अशा थोर भ्रमासारखा-अंधारासारखा. जो अमूर्तिचा कडसा (= प्रतिबिंब)-जो अमूर्ताचा कडवसा (= अमूर्ताचा = निराकाराचा. कडवसा = झरोक्यांतून पडणारे किरण) = परमात्मज्ञानाच्या उदयाबरोबर. ते-तो जयाचिया प्रकाशा। पुरेचिना = नाहींसा होतो, टिकत नाहीं (१७४). तयां-यया. कायसे हे मनोमळ = मनोमळ हे (त्याजपुढे नाहींतच). जे बोलताचि अति किडाळ = जे बोलण्यांतच फक्त-अति हिणकस, अति क्षुद्र असे. नाहीं येणें पाडें ढिसाळ। दुजें जगीं = ते या ज्ञानशक्तीपुढें कांहींच नाहीं. या ज्ञानशक्तीसारखें मोठें सामर्थ्यवंत या जगीं दुसरें नाहीं (१७५).

जरी तूं पापाची खाण, कल्मषाचा आगर असलास तरी-जरी तूं सर्व भ्रांतीचा सागर असलास तरी-जरी तूं व्यामोहाचा डोंगर असलास तरी, होऊन असती जरी ...... (१७२)

(तरी) ज्ञानशक्ति प्रचंड आहे, तिच्यापुढें पाप वगैरे सर्व तुच्छ आहे, असें चोखडें-चांगलें-सामर्थ्य या ज्ञानामध्यें आहे. (१७३)

उमज कीं विश्वाभासाएवढा-विश्वसंभ्रमा ऐसा-"विश्व सत्य आहे" अशा या थोरल्या भ्रमासारखा भ्रम, अंधार, अव्यक्तता ज्या परमात्मज्ञानाच्या उदयाबरोबर नाहींसा होतो-अव्यक्ताचा कवडसा परमात्म प्रकाशास पुरेसा होत नाहीं-ज्ञानप्रकाशानें तो कवडसा नाहींसा होतो. (१७४)

ह्या प्रकाशापुढें कायसे हे मनोमळ—मनोमळ असे हे बोलतांच कीं अति हिणकस असे, लगेंच नाहींसे होणारे—नसणारेच. ह्या मनोमळाबरोबरीचें अति क्षुद्र ह्या जगीं दुसरें कांहींहि नाहीं! (१७५)

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥**

[यथा = ज्याप्रमाणें. इधांसि = इंधन, पेटवण, लांकडें, समिधा म्हणजे प्रदीप्त झालेला अग्नि. भस्मसात् कुरुते = अग्नि इंधन जाळून त्याचें भस्म करतो. सर्वकर्माणि तथा ज्ञानाग्निः भस्मसात् कुरुते = त्याप्रमाणें ज्ञान-अग्नि सर्व कर्में नाहींशीं करतो—जाळून भस्म करतो.]

**अन्वय :** अर्जुन इधांसि समिद्धः यथा अग्निः भस्मसात् कुरुते। तथा सर्व कर्माणि ज्ञानाग्नि भस्मसात् कुरुते।

**अर्थ :** ज्याप्रमाणें इंधन—जळणाचे भारे—प्रदीप्त अग्नि जाळून टाकतो, भस्मसात् करतो—त्याप्रमाणें सर्व कर्में ज्ञानस्वरूप अग्नि भस्म करून टाकतो. [अहंपणा, अहंकार, वासनारहित कर्में निष्पाप असतात, निर्बीज अशीं तीं होतात] (३७).

**सांगे भुवनत्रयाची काजळी। जे गगनामाजि उधळली।**
**तिये प्रळयिये वाहुटुळी। काई अभ्र पुरे ॥ १७६ ॥**
**किं पवनाचेंनि कोपें। पाणियेचि जो तळपे।**
**तो प्रळयानळ दडपे। तृण काष्टें कायी ॥ १७७ ॥**

भुवनत्रयाचि काजळी। जे गगनामाजि उधळली = त्रैलोक्य पेटल्यावर गगनांत पसरणारा धूर. उधळली = पसरली. तिये प्रळयिये—प्रळयिचे वाहुटुळी—वावटुळी = जी प्रळयकाळची वावटळ. काई अभ्र पुरे = तिच्यापुढें क्षुद्र ढग काय होत! (१७६). पाणियेचि जो तळपे—पळिपे = पाणीहि जो जाळून टाकतो. पवनाचेंनि कोपें = पवन कोपला असतां. असा तो प्रळय अनळ कायी तृण काष्टें दडपे = असा तो प्रळयींचा अनळ काय गवताच्या काड्यांनीं दडपला ( = विझला) जाईल? (१७७).

हे सांग कीं, त्रैलोक्य पेटल्यावर गगनांत पसरणाऱ्या धुराला पार उडविणारी जी प्रळयकाळची वावटळ, तिच्यापुढें क्षुद्र ढग काय—तुच्छ—होत! (१७६)

पवनाचा कोप झाला असतां, पाणीच मुळीं जो जाळून टाकतो, तो प्रळयानळ—प्रळयकाळचा अग्नि—काय गवताच्या काड्यांनीं दडपला जाईल—विझेल? (१७७)

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।**
**तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥ ३८ ॥**

[ज्ञानेन सदृशं पवित्रं इह न विद्यते = ज्ञानासारखें पवित्र ह्या जगीं (स्वतःस जागें करणारें) अनुभवण्याजोगें दुसरें कांहींहि नाहीं. तत् स्वयम् = तें आपण स्वतः—(जीव ब्रह्म—मूळ स्वभाव—मन बुद्धि—). योगसंसिद्धः = योगपरिपक्वता. इष्ट ज्ञानप्राप्ति. आत्मनि = आपणा स्वतःमध्यें. कालेन विन्दति = कालांतरानें—प्राप्त काल आला असतां—योग्य काळींच तें स्वतःमध्यें जाणलें जातें.]

**अन्वय :** इह। ज्ञानेन सदृशं पवित्रं। न विद्यते। हि। तत् स्वयंयोग। संसिद्धः। आत्मनि। कालेन विन्दति।

**अर्थ :** ह्या लोकीं आत्मज्ञानासारखी पवित्र दुसरी कोणतीहि वस्तु नाहीं–दुसरें कांहींहि नाहीं–तें ज्ञान तो स्वयंयोग–आपणच स्वतः तो योग योगाभ्यासानें संसिद्धः–कृतार्थ झालेला–आपणा स्वतःमध्यें कांहीं कालांतरानें (अनुभवण्याजोगें) (स्वतःस जागें करणें जें) जाणला जातो; स्वतःच आत्मस्वरूपामध्यें मिळविला होतो, अनुभविला होतो– (३८).

**म्हणोनि असो हें न घडे। तें विचारिताचि असंगडें।**
**पुढति ज्ञानाचेंनि पाडें। पवित्र न दिसे॥ १७८॥**
**येथें ज्ञान हें उत्तम होयें। आणिकहि तैसेंचि येक आहे।**
**सांगे चैतन्य कां नोहें। दुसरें गा॥ १७९॥**
**यया महातेजाचेनि कसें। जरि चोखाळ प्रतिबिंब दिसें।**
**कां गिवसिलें गवसें। आकाश हें॥ १८०॥**
**नातरि पृथ्वीचेनि पाडें। कांटाळें जरि जोडे।**
**तरि उपमा ज्ञानीं घडे। पांडुकुमरा॥ १८१॥**
**म्हणोनि बहुति परि पाहाता। पुढति पुढति निर्धारिता।**
**ज्ञानाचि पवित्रता। ज्ञानीचि आथी॥ १८२॥**

असंगडें = अस्तंगत, असंगत, विसंगत, असंघडणें (अयोग्य असणें). पाडें = बरोबरीनें, योग्यतेनें (१७८). आणिकहि येक तैसें के आहे। जैसें चैतन्य दुसरें गा कां नोहें। = एखादें कुठचें कुठें तसलें तें पण चैतन्यच एक कां न म्हणावें तें! (१७९). यया–या महातेजाचेनि कसें = सूर्यतेजाच्या कसास : प्रतिबिंब तेज जर लागेल. आकाश गिवसिलें गवसें = आकाश कवळतां येईल–कवळिलें असतां सांपडेल. गिवसिलें = कवळिलें, कवटाळिलें. गवसें = सांपडतें (१८०). पृथ्वीचेनि पाडें कांटाळें जरि जोडे = पृथ्वी (तोलण्यास) बरोबरीची वस्तु–कांटाळें (=वजन, कांटा) जोडले, मिळाले तरच ज्ञानीं उपमा घडे (१८१). बहुति परि पाहातां = अनेक बाजूंनीं, तऱ्हांनीं; पुष्कळ प्रकारें, प्रकारांनीं विचार केला असतां. पुढति पुढति निर्धारिता = पुन्हा पुन्हा–वारंवार–पाहिलें असतां, विचारांत, निश्चयांत, भेदनिर्णयांत घेतलें असतां. ज्ञानाची पवित्रता। ज्ञानीचि आथी = ज्ञानाची पवित्रता ज्ञानासीच : : ज्ञानामध्यें असते (१८२).

'प्रळयकाळच्या वावटळीपुढें क्षुद्र अभ्र तुच्छ होय. प्रळयाग्नि काय गवताच्या काड्यांनीं दडपला जाईल?'– असें हें विचार करणें असो, तसें तें केव्हांहि नच होणारें! ज्ञानाग्नि सर्व कर्में भस्मसात करून टाकतो–असें हें विचार केला असतां असंगत दिसतें–ज्ञानाच्या बरोबरीनें तोललें तर पवित्र असें (तें दिसत, पाहणें नाहीं) (ह्या जगीं दुसरें कांहींहि नाहीं)– (१७८)

येथें ज्ञान हें उत्तम असें आहे (होय); आणीक दुसरें तसें उत्तम एक काय आहे जसें का चैतन्यच दुसरें का तें नव्हें अगा! (१७९)

ह्या महातेजाच्या म्हणजे सूर्यतेजाच्या कसाला जर चोख उत्तम प्रतिबिंब तेज लागेल, तर आकाश हें कवळिलें असतां कवळितां येईल ना .... (१८०)

पृथ्वीच्या बरोबरीनें वजनाचें असें जोडलें जाईल जर तरीच ज्ञानाची उपमा, हे पांडुकुमरा, घडणारी होईल .... (१८१)

म्हणून बहुत परोपरीनीं पाहिलें तर, तसेंच पुढती पुढती निर्धारानें पाहिलें असतां, ज्ञानाची पवित्रता ज्ञानाचे ठायींचीच सर्वथैव अशी किंमतीची, योग्यतेची! (१८२)

**जैसी अमृताचि चवि न निवडिजे । तरि अमृताचि सारिखि म्हणिजे ।**
**तैसें ज्ञान हे उपमिजे । ज्ञानेसींचि ॥ १८३ ॥**

**आतां यावरि जे बोलणें । ते वायांचि वेळु फेडणें ।**
**तंव सांचचि हें पार्थ म्हणे । जें बोलतसा ॥ १८४ ॥**

**परि तेचि ज्ञान केविं जाणावें । ऐसें अर्जुनें जंव पुसावें ।**
**तंव मनोगत देवें । जाणितलें ॥ १८५ ॥**

**मग म्हणतसे किरीटि । चित्त देईं इये गोष्टी ।**
**सांगेन ज्ञानाचिये भेटि । उपाय तुज ॥ १८६ ॥**

अमृताचि चवि = अमृताची चव निवडितां आली तर ती अमृतासारखीच ! म्हणून ज्ञान हें ज्ञानेसींचि उपमावें, उपमिलें जातें (१८३). यावर आणीक कांहीं बोलणें तें वेळ दवडणें–फेडणें होय = आतां आणीक दुसरें कांहीं बोलणें तें म्हणजे वेळ घालविणें होय. सांचचि जे बोलतसा = जे बोलतां ते सांच–खरेंच–कीं (१८४). तेचि ज्ञान केविं जाणावें = तें ज्ञान कसें जाणलें होईल (१८५). चित्त देईं इये गोष्टी = ह्या गोष्टीस चित्त, लक्ष दे. ज्ञानाचिये भेटि उपाय सांगेन = ज्ञानाची भेट होईल असा उपाय ऐक ! (१८६).

अमृताची चव निवडितां येत नाहीं–ती तर अमृतासारखीच म्हटली होते; तसें ज्ञान हें ज्ञानासीच उपमिलें होय–उपमावें होतें (१८३).

आतां यावर आणीक कांहीं बोलणें म्हणजे तें व्यर्थच एक वेळ घालविणें होय. कारण इथें बोलणें तें इत्थंभूततेनें झालें असल्याकारणानें असें म्हणणें तें भाग पडलें–आपलें असें हें म्हणणें, जें आपण बोलत आहांत–करीत आहांत–तें यथार्थ होय असें अर्जुन म्हणत आहे (१८४).

पण तेंच ज्ञान कसें जाणावें असें विचारणें अर्जुनाचें होतें न होतें तोंच त्याच्या मनांतील तो भाव ओळखिला (१८५).

देव म्हणूं लागले कीं, हे पार्था–किरीटि–ह्या गोष्टीकडे लक्ष दे, जें का मी आतां–ज्ञानाच्या भेटीचा उपाय–तुजला सांगणार आहें–सांगेन–सांगतों (१८६).

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥**

[श्रद्धावान् = श्रद्धाळु. (संशयालु = संशयखोर). ज्ञानं लभते = ज्ञान प्राप्त करून घेतो. तत् परः = ज्ञानसाधनदक्ष जो त्यास. संयतेन्द्रियः = जितेंद्रिय, इंद्रियनिग्रही. परां शान्तिम् ज्ञानं लब्ध्वा = मोक्ष संज्ञा शांति ज्ञानप्राप्तीनंतर. अचिरेण अधिगच्छति = लवकरच प्राप्त करून घेतो–मिळवितो.]

**अन्वय :** श्रद्धावान् लभते ज्ञानं । तत्परः । संयतेन्द्रियः । ज्ञानं लब्ध्वा शान्तिं । पराम् अधिगच्छति अचिरेण ।

**अर्थ :** श्रद्धाळूस–श्रद्धावंतास–ज्ञान लाभतें, मिळतें, ज्ञानसाधनदक्ष, गुरु–उपासना इत्यादींनीं तें मिळतें. त्याचप्रमाणें इंद्रियनिग्रही, जितेंद्रिय–इंद्रियें आवरिलीं आहेत ज्यानें–त्या पुरुषानें संयतेंद्रियास–इंद्रियनिग्रह केलेल्यास–त्यास ज्ञान झाल्यानंतर त्वरितच महत्–मोक्ष संज्ञा शांति मिळते (३९).

**तरि आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो कां सकळ विषयां ।**
**जयाचें ठायिं इंद्रियां । मान नाहिं ॥ १८७ ॥**

**जो मनासि चाड न सांगे । जो प्रकृतिचे केलें नेघे ।**
**जो श्रद्धेचेनि भोगे । सुखिया जाला ॥ १८८ ॥**

**तयांतेचि गिवसित । ज्ञान पावे निश्चित ।**
**जयामाजि अचुंबित । शांति असे ॥ १८९ ॥**

आत्मसुख गोडिया = निजानंदाच्या गोडीनें. विटे सकळ विषयां = सर्व विषयांना आवडून घेत नाहीं. जयाचें ठायिं इंद्रियां मान नाहिं = जो इंद्रियांना माप, प्रमाण, गौरव, आदर, महत्त्व देत नाहीं (१८७). मनासि चाड न सांगे = कामना, इच्छा, मनाला सांगत नाहीं. प्रकृतिचे केले नेघे = मायेच्या विकारांत सांपडत नाहीं–मायेचें कार्य आपल्या अंगावर घेत नाहीं. श्रद्धेचेनि भोगे (संभोगे) सुखिया जाला = आस्तिक्य बुद्धीच्या योगानें–विश्वासदृढतेनें सुखी झालेला (१८८). तयांतेचि गिवसित । ज्ञान पावे निश्चित = त्यासच ज्ञान प्राप्त होतें, शोधीत येतें. अचुंबित (= संपूर्ण) शांति जयामाजि असे = ज्याच्या ठायीं पूर्ण–संपूर्ण–शांति असते (१८९).

तरी आत्मसुखाच्या गोडीमुळें ज्याला सर्व विषयांविषयीं वीट वाटतो, त्या विषयांविषयींच्या ठिकाणचा तो मानमरातब इंद्रियांना मुळींच महत्त्वाचा वाटत नाहीं .... (१८७)

जो श्रद्धावान मनाच्या चरणीं लागत नाहीं (आपलें दुःख मनाला सांगत बसत नाहीं); जो प्रकृतीचें केलेलें जें गुणाचें होणें तें घेत नाहीं; जो श्रद्धेच्या उपभोगानें–सेवण्यानेंच सुखी होऊन आहे .... (१८८)

त्यासच ज्ञान हें हुडकीत येऊन पावतें होतें हें निश्चित होय–ज्याचे–ज्ञानियाचे–ठायीं ज्या ज्ञानाचे ठायीं केव्हांहि सहजच कीं संपूर्ण शांतीच एक असणारी .... (१८९)

**तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतिचा अंकुर फुटे ।**
**मग विस्तार बहु प्रगटे । आत्मबोधाचा ॥ १९० ॥**

**मग जेउति वास पाहिजे । तेउति शांतीचि देखिजे ।**
**तेथें अपारापार नेणिजे । निर्धारितां ॥ १९१ ॥**

**ऐसा हा उत्तरोत्तर । ज्ञानबीजाचा विस्तार ।**
**सांगता असें अपार । परिसे आतां ॥ १९२ ॥**

हृदयीं ज्ञान प्रतिष्ठे = अंतःकरणाचे ठायीं तें ज्ञान प्रतिष्ठेचें झालें आहे तर. शांतिचा अंकुर फुटे = शांतीचा नवा अंकुर त्यास येतो. आत्मबोधाचा विस्तार प्रगटे = आत्मज्ञानाचा विस्तार प्रगट होतो (१९०). जेउति वास पाहिजे । तेउति शांतीची देखिजे = जिकडे नजर टाकावी तिकडे शांतीच एक दिसते. निर्धारितां अपारापार नेणिजे = त्याचे ठायीं मी माझें असें निश्चयानें नाहींच (१९१). उत्तरोत्तर ज्ञानबीजाचा विस्तार असें अपार सांगता = ज्ञान, मूळ कारण, भावार्थ सांगण्यास बसावें, तर तो क्रमाक्रमानें अपार असा विस्ताराचा आहे. [बीज = बीजगणित, आधार, तत्त्व, मंत्रांतील भाग, [बीजगणिन = (देवी आळजाई) = बीज बीजाक्षर = मंत्राचें आद्याक्षर. बीजपेशिका = वृषण, अंडकोश. बीजबाप = शेतकरी (पु.). बीजहरा = जखीण (स्त्री.)]. विस्तार = वाढ, फैलाव, रुंदी, सर्व हकिकत (झुडुपासंबंधीं–वृक्षासंबंधीं नव्हेच). ज्ञान = जाणणें, तत्त्व कळणें, जाणीव, ब्रह्मज्ञान, बुद्धि, मत, ज्ञानेंद्रिय, जीवात्मा, परब्रह्म, मंत्र. ज्ञानअभ्यास = चिंतन. ज्ञानआगम = वेदांत. ज्ञान-इंद्रिय = पांच ज्ञानेंद्रियें. ज्ञानतः = जाणूनबुजून. ज्ञानद = गुरु, सरस्वति. ज्ञानमुद्र = शहाणा. ज्ञानयोग = ज्ञानरूप मोक्षसाधन. परिस = परिसणें, ऐकणें. [(परिसरि = परिसर = सीमा, नाडी, तीर, आसपासचा भाग). परिसर्पण = प्रसार, संचार, उड्डान (उड्डाण)–उडु = तारा, नक्षत्र. उडुप = होडी, चंद्र. उड्डयन–उड्डीन = वर उडणें]] (१९२).

तें ज्ञान अंतःकरणाचे ठायीं–हृदयाचे ठायीं प्रतिष्ठित होतें–प्रतिष्ठा पावतें–अहं ब्रह्मच जसें, अहं ब्रह्मास्मि हेंच प्रतिष्ठा पावलें–होणारें (मन, बुद्धि, चित्त, अहंकार हीं सर्वच शांतीचा अवलंब करणारीं होऊन असतात). तेथें मग अंकुर शांतीचा उगवून–जसा दृष्टीला एक नवीनच डोळा यावा–दृष्टीस, दृष्टीचा फांटा फुटावा तसें होतें व मग आत्मबोधाचा, आत्मज्ञानाचा विशेषसा विस्तार तो प्रगट होऊन असतो. (१९०)

मग पाहिजे तेथें पाहावें तों, जिकडे पाहावें तिकडे शांतीच देखणी अशीच देखिली पाहिली जावी का! तेथचा निर्धार तो अपारापार–अपरंपार–असा असल्यानें सांगतां–जाणतां–येत नाहीं–(तप साधन दिगंताहि पलीकडचे झाल्यानें कांहींच निश्चयेंकरून जाणतां, सांगतां, बोलतां येत नाहीं) (१९१).

असा हा उत्तरोत्तर –अधिकाधिक वाढणारें–ज्ञान, मूळ कारण भावार्थ बीज विस्तार सांगण्यास गेलें, लागलें, बसलें–तर तो क्रमाक्रमानें अपार–अमर्याद–पैलतीर नसलेला,–उल्लंघण्यास कठीण–समुद्रच जसा–का पृथ्वीच जशी अंथरलेली–आक्रमण्यास कठीण–असा आहे–तें कसें तें ऐक! (१९२).

**अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।**
**नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥**

[अज्ञः = आत्मा न जाणणारा; बालिश, मूढ. अश्रद्दधानः = श्रद्धाहीन, वितंडवाद करणारा. संशयात्मा = शंकाकुशंका सर्वदा घेणारा–संशयी. अयं लोकः न, न परः, न सुखं, संशयात्मनः = हा लोक नाहीं, परलोक नाहीं, आणि सुखहि नाहीं. संशयात्मनः = आपलें म्हणण्यासारखें सुख नाहीं.]

**अन्वय :** संशयात्मा । अज्ञः च । अश्रद्दधानः च । विनश्यति । संशयात्मनः । न अयं लोकः । न पर (लोकः) । न सुखं ।

**अर्थ :** संशयी तसेच मूढ तसेच अज्ञ,–श्रद्धा न ठेवणारा–वितंडवादी असे ते नाश पावतात. संशयी जो त्याम हा लोक मिळत नाहीं; परलोक मिळत नाहीं; सुखहि मिळत नाहीं (४०).

**आइके जयां प्राणियांच्या ठाईं । ज्ञानाचि आवडि नाहिं ।**
**तयाचें जियालें म्हणो कायि । वरि मरण चांग ॥ १९३ ॥**

**शून्य जैसें गृह । कां चैतन्येंविण देह ।**
**तैसे जीवित संमोह । ज्ञानहीन ॥ १९४ ॥**

**अथवा ज्ञान कीर आपु नोहे । परि ते चाड एकि जरि वाहे ।**
**परि तेथ जिव्हाळा आहे । प्राप्तीचा पैं ॥ १९५ ॥**

**वांचुनि ज्ञानाचि गोठि कायसि । परि तेंहि आस्थाहि न धरि मानसि ।**
**तरि तो संशयरूप हुतांशीं । पडिला जाण ॥ १९६ ॥**

जियालें म्हणों कायि वरि मरण चांग = त्याचें जगणें, वांचणें, जिणें कसचें, त्यापेक्षां मरण बरें (चांगलें) (१९३). का तर दिव्याशिवाय ओस गृह जसें, का शून्य- देह जसें का प्रेतच एक चैतन्याशिवाय!–जीवित तसें ज्ञानहीन–संमोह मूर्च्छा कश्मल मोह : मोहयुक्त असें नेहमींच (याच्ञा, भिक्षा, अर्चना, अर्दना इति ४ याचनस्य । याचनेनें व्याप्त असें मुळींच ज्ञान नसलेलें (१९४). अथवा ज्ञान कीर आपु नोहे । परि ते चाड एकि जरि वाहे = ज्ञान प्राप्त नाहीं, पण ज्ञानाची चाड जरी असेल. तेथ प्राप्तीचा जिव्हाळा आहे = प्राप्तीचा संभव, ओलावा आहे (१९५). आस्थाहि न धरि मानसि = कळकळ, आधार मनामध्यें बाळगीत नाहीं. संशयरूप हुतांशीं पडिला = संशयाग्नींत पडला म्हणावा (१९६).

आईक कीं ज्या प्राण्याच्या ठाईं–ज्या मनुष्यास ज्ञानाची–मोक्षविषये या धीर्बुद्धिस्तज्ज्ञानम्–आवड ["आवडी आणि लाजवी। व्यसन आणि सिणवी। पिसें आणि भुलवी। तरि तेचि काये ॥ १२४–६ ॥"] नाहीं, त्याचें जगणें, वांचणें, जियालें जीवित तें कसचें न् काय म्हणावें! अहो! या ज्ञानहीन जीवितापेक्षां मरणेंच चांगलें–भलें–असें होय (१९३).

का तर गृह जसें का (शून्य) (दिव्याशिवाय) ओस–देह (चैतन्याशिवाय) जसें का प्रेतच एक–जीवित तसें ज्ञानहीन संमोह भ्रांतीचें (मूर्च्छाकश्मलम् मोहः) मोहयुक्त असें नेहमींच (याच्ञा, भिक्षा, अर्चना, अर्दना इति ४ याचनस्य।) याचनेनें व्याप्त असें मुळींच ज्ञान नसलेलें...... (१९४)

अथवा ज्ञान आपलेंसें झालेलें नाहीं; परंतु चाड–पर्वा, गरज, इच्छा–जरी मनामध्यें असेल–वाहून आहे–तरी तेथें ज्ञानप्राप्तीचा संभव आहे; प्राप्तीचा झरा आहे; प्राप्तीचें जीवन आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. (१९५)

ज्ञानाची प्राप्ति संभवाची कदाचित् जरी का तेथें नाहीं, तर मग तेथें काय कसची ती गोष्ट ज्ञानासंबंधींची ती!–पण तेथें मनामध्यें जर का कांहीं थोडाबहुत यत्न, प्रयत्न, आस्थाहि धरून नाहीं, तरी मग तो तर संशय (विचिकित्सा, संशयः, संदेहः, द्वापरः इति ४ संशयज्ञानस्य।) रूप अग्नीमध्येंच–संशयाग्नींतच कीं पडला म्हणावा ना! (१९६)

**जें अमृतहि परि नावडे। ऐसें सावियाचि अरोचक जैं पडें।**
**तैं मरण आलें असें फुडें। जाणो येकि ॥ १९७ ॥**

**तैसा विषयसुख रजें। जो ज्ञानेसीचि माजे।**
**तो संशये अंगिकारिजे। येथें भ्रांति नाहिं ॥ १९८ ॥**

**मग संशयीं जरि पडिला। तरि निभ्रांत जाण नाशला।**
**तो ऐहिक परत्रा मुकला। सुखासि गा ॥ १९९ ॥**

अमृतहि नावडे = अमृत रुचत नाहीं. सावियाचि अरोचक जैं पडें = अकस्मात कश्मल अशी अरुचि जेव्हां होते. सावियाचि = सहज, अकस्मात. अरोचक = अरुचि. तैं जाणो येकि मरण फुडें आलें असें = सहजच अरुचि अमृताचे ठायीं, त्यामुळें मरणच पातलें असें वाटतें ज्यास (१९७). विषयसुख रजें = विषयसुखानें विषयांत रमतो, सुखी होतो, सुख पावतो. जो ज्ञानेसीचि माजे = ज्ञानाविषयीं–ज्ञानासंबंधीं बेपर्वा असतो; उन्मत्त होतो. तो संशये अंगिकारिजे। येथें भ्रांति नाहीं = त्याचे ठायीं संशय अंगिकारलेला जाणावा; तो शंकेखोर असा अस्थिर होय, यांत शंका नाहीं. [रजः पुष्पम् आर्तवम् ३ स्त्रीरजसः। रेणुः धूलिः पांशु, रजः इति ४ धूल्याः। (१४।३२७, ३२८, ३२९)] (१९८). संशयीं पडिला निभ्रांत नाशला = संशयांत पडला तो निःसंशय नासला म्हणावा. ऐहिक परत्रा मुकला सुखासि गा = इह व परलोकास आंचवला (१९७).

अहो अमृतहि पण जें का नच आवडत आहे–रुचत नाहीं–सावियाचि सहजच अरोचक अशी अरुचि जेव्हां–जैं पडें–अरुचि कंटाळा होते–तेथें तर एक मरणच कीं खरेंपणानें आलें म्हणावें ना! (१९७).

तसा विषयसुखानें सुखी होतो–विषयसुखरजामुळें–प्रकृतिधर्मामुळें–जो ज्ञानासीच माजतो–व बेपर्वा असतो–उन्मत्त होतो; माज करून आहे–तो तर संशयानेंच–संशयखोर अस्थिरतेनें कीं अंगिकारिला व्हावा हें निःसंशय–येथें केव्हांहि मुळींच भ्रांती ती नकोच–नाहींच! (१९८)

संशयामध्यें पडला तरी मग निभ्रांत निःसंशय नाशला जाण! तो तर इह व परलोकास आंचवला–अंतरला–ऐहिक तसेंच परत्रसुखास मुकला कीं! (१९९)

**जयां काळज्वर अंगि बाणें । तो शीतोष्णें जैसि नेणें ।**
**अग्नि आणि चांदिणें । सरिसेंचि मानी ॥ २०० ॥**
**तैसें सांच आणि लटिकें । विरुद्ध अथवा निकें ।**
**संशयिं तो नोळखे । हिताहित ॥ २०१ ॥**
**हा रात्रिदिवस पाहिं । जैसा जात्यंधा ठाउका नाहिं ।**
**तैसें संशयिं असतां कांहिं । मना नये ॥ २०२ ॥**

काळज्वर अंगि बाणें = काळज्वरानें अंग पोळत आहे; काळरूपी ज्वर देह व्यापून आहे. शीतोष्णें नेणें = थंड का ऊन जाणत नाहीं. अग्नि चांदिणें सरिसेंचि मानी = ऊन व चांदणें एकसारखेंच मानतो (२००). सांच, लटिकें, विरुद्ध, निकें हिताहित = संशयी नोळखे खरें खोटें हिता-अहिताचें–अनुकूल चांगलें, कल्याणाचें का अकल्याणाचें (२०१) जात्यंधा रात्रिदिवस ठाउका नाहिं। तैसें संशयिं असतां कांहिं मना नये = रात्र का दिवस हे जन्मांध जो त्याला ठाऊक नाहीं, तसें संशयी असतां कांहींहि मनास येत नाहीं (२०२).

काळज्वरानें अंग पोळत आहे–ज्वर देह व्यापून आहे; तो थंड का ऊन, शीत का उष्ण हें जाणत नाहीं; पण ऊन व चांदणें सारखें एक मानून असतो. (२००)

तसेंच खरें अथवा खोटें–सांच लटिकें–विरुद्ध अथवा हितकारक, हित का अहित असें संशयी, शंकित, भयभीत– धोक्यातला तो ओळखीत नाहीं. (२०१)

जात्याच जो अंध आहे त्यास रात्र का दिवस आहे हें मुळींच समजणारें–उमगणारें–नव्हें; तसें (शंका, भय, विवाद, धोका, संकट–) संशयामध्यें असतांना तर कांहींहि मुळीं त्याच्या मनासच मुळीं येत नाहीं–त्यास आवडतच नाहीं! (२०२)

**म्हणोनि संशयाहूनि थोर । आणीक नाहिं पाप घोर ।**
**या विनाशाची वागुर । प्राणियांसि ॥ २०३ ॥**
**या कारणें तुंवा त्यजावा । आधि हाचि येक जिणावा ।**
**जो ज्ञानाचिया अभावा । माजि असे ॥ २०४ ॥**
**जें अज्ञानाचें गडद पडे । तैं हा बहुवस मनिं वाढे ।**
**म्हणोनि सर्वथा मार्ग मोडे । विश्वासाचा ॥ २०५ ॥**
**हृदयीं हाचि न समाये । बुद्धितें गिंवसुनि ठाये ।**
**तेथें संशयात्मक होये । लोकत्रय ॥ २०६ ॥**

संशयाहूनि थोर आणीक घोर पाप नाहिं = संशयापेक्षां आणीक भयंकर पाप नाहीं. हा (संशय) प्राणियांसि विनाशाची वागुर = प्राण्यांभोंवतीं हें विनाशाचें जाळेंच कीं पसरलें आहे ( नितंबिनी वागुरा पसरल्या कामि कुरंगाना). संशय = शंका, भय, संभव, अनिश्चय, विवाद, धोका, संकट. वागुर = जाळें. वागुरामृग-बंधिनि इति २ जालीकृत रज्जुविशेषः. घोर = भैरवं, दारुणं, भीषणं, भीष्मं, घोरं, भीमं, भयानकम्, भयंकरं, प्रतिभयम् इति ९ भयानकस्य । नितंबिनी = गुणैः उत्कृष्टायाः स्त्रियाः – उत्तमा वरवर्णिनी इति २ । अ. १ ओ. १८६. विनाशः अदर्शनम् । नितंबिनी = अंगना, भीरु, कामिनी, वामलोचना, प्रमदा, मानिनी, कांता, ललना, नितंबिनी, सुंदरी, रमणी, रामा इति १२ । (२०३). तुंवा त्यजावा, हाचि (संशयचि) येक जिणावा = त्वां संशय त्यजावा; हा संशयच एक आधीं त्वां जिंकावास. ज्ञानाचिया अभावा माजि असे = हा संशय ज्ञानाच्या अभावांत असतो–ज्ञान नसलेल्या जागीं असतो. "ज्ञान जें, तें नेहमीं निःसंदेह निःसंशय–असें असतें. भावः × अभावः, २ । (१२५–१३२ पाहा). अभाव = प्रेमशून्य, भावहीन, अस्तित्वाचा अभाव (२०४).

**अज्ञानाचें गडद** = अज्ञान, अंधकार-निबिड, गडद अंधार; **अज्ञानानें** व्याप्त, दाट अज्ञान, पूर्ण अज्ञान. **हा बहुवस मनीं वाढे** = मनामध्यें संशय हा बहुवस-अत्यंत (पुष्कळ) वाढतो. **विश्वासाचा मार्ग सर्वथा मोडे** = श्रद्धेचा मार्ग समूळ मोडतो. विश्वास = श्रद्धा. सर्वथा = समूळ. मार्ग = अयनम्, वर्त्म, मार्ग, अध्वा, पन्थाः, पदवी, सृतिः, सरणिः, पद्धतिः, पद्या, वर्तनी, एकपदी, इति १२ मार्गस्य। (२०५). **हार्थि हृदयीं न समाये** = हृदयांत न राहतां, न मावतां असतो; सामावत नाहीं. बुद्धितें गिवसुनि ठाये = बुद्धिलाहि तो ग्रासतो-आच्छादितो. लोकत्रय संशयात्मक होये = तिन्ही लोक संशयात्मक होऊन (जातात) असतात. बुद्धि = मनीषा, धिषणा, धीः, प्रज्ञा, शेमुषी, मतिः, प्रेक्षा, उपलब्धिः, चित्, संवित्, प्रतिपत्, ज्ञप्तिः, चेतना, इति १४ बुद्धेः। लोकः = भूतल, जगती, लोकविष्टपम्, भुवनम्, जगत् इति ५ भूतलस्य। भुवने जने लोकः. लोकः = दृश्यमानः। अयं जंबुद्विपवती भारतनामकं वर्षं ज्ञेयम्। (२०६).

या कारणास्तव संशयाहून थोर असें आणीक दुसरें घोर पाप नाहीं! अहो! प्राण्यास तर असल्या ह्या संशयरूपी विनाशाची वागुरच-जाळें कीं अंगाभोंवतीं एक! [नितंबिनी वागुरा। पसरल्या कामि कुरंगाना. (कविउक्ति)] (२०३).

या कारणास्तव तुंवा हा संशय-शंका, भय, विवाद-त्यजावा, टाकावा, सोडावा-मनासच व्यथा करणारा हा संशय-अगोदरच पहिल्या प्रथम आधि हाच एक जिंकावा जिणावा-(जिणें जगणें आपलेंसें करून जिणावा-उद्धरेत् आत्मनात्मानम्-आपली वस्ती सहज आपण कैसी-तसा-६-७१. आपणपां आपण वैरी होऊं नये-६-७२.) जो का ज्ञानाच्या अभावा-चैतन्य तत्त्वशून्यतेमध्यें असतो, राहतो, जगतो.... (२०४)

जेव्हां का अज्ञानाचें-दाट अज्ञान, पूर्ण अज्ञान-गडद अंधःकार, निबिड अंधार-पडतें-पडें; तेव्हां तर हा मनामध्यें अपार असा पुष्कळसा बहुवसपणें वाढतो, आणि म्हणूनच कीं विश्वासाचा-भरंवशाचा-श्रद्धेचा-गुणाचा असा मार्ग सर्वथा समूळपणें मोडतो-नाहींसा-गैरविश्वासाचा होतो-(अज्ञानाचा होतो) (२०५).

हृदयामध्यें हा वाढला असतां नच ते राहतां, मावतां, सामावत नाहीं; समाता होऊन, बुद्धिलाहि गिंवसून-शोधून-हुडकून ग्रासतो, आच्छादितो, गांठतो, ठातो; तेथें मग लोकत्रय-तिन्ही लोक-संशयात्मक होऊन जातात-होतें. (२०६).

**योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम्।**
**आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥**

[धनंजय = अर्जुना. योगसंन्यस्तकर्माणं = कर्माणि संन्यस्त योगः = शुभाशुभ कर्में संन्यासिलीं, त्याग केलीं, असा ज्ञानयोगबळानें. संछिन्न संशयं ज्ञानं = निःसंशयतेनें संशय छिन्न केला तें ज्ञान; ज्ञान तें निःसंशय असेंच केव्हांहि; आत्मज्ञानपरिचयानें संशय निर्मूल झाला आहे केव्हांहि. आत्मवन्तं = आत्मज्ञानी, जितेंद्रिय, सावधान पुरुषाला-कर्माणि-बरीं वाईट (कर्में) न निबध्नन्ति = बद्ध करीत नाहींत.]

**अन्वय:** धनंजय। ज्ञानसंछिन्नसंशयम्। योगसंन्यस्तकर्माणं। आत्मवन्तं। कर्माणि न निबध्नन्ति।

**अर्थ:** कर्में, ज्ञानयोगानें कर्माचा त्याग-संन्यास-केला; निष्काम कर्मयोग आचरून असलेला कर्मयोगी कर्मानें बांधला जात नाहीं; तसेंच ज्ञानानें सर्व संशय ज्याचा छिन्न झाला आहे, तोहि कर्मानें बांधला जात नाहीं; तसेंच जो आत्मज्ञानाचे ठायीं क्रीडा करीत राहतो त्या आत्मवंतालाहि-ज्याचा संशय नाहींसा झाला आहे-त्यास, कर्में बाधा करूं शकत नाहींत (४१).

**ऐसा जरि थोरावें। तरि उपाये येके अंगवे।**
**जरि हातीं होय बरवें। ज्ञानखड्ग ॥ २०७ ॥**

**तरि ज्ञानशस्त्रें तिखटें । निखळ हा निवटे ।**
**मग निःशेष खत फाटें । मानसींचें ॥ २०८ ॥**

ऐसा जरि थोरावें (=वाढला)=माजला, थोरावला झाला. उपाये येके अंगवे=एका उपायानें पराजित (केला जातो) होतो, स्वाधीन होतो. ज्ञानखड्ग=(तीव्र) ज्ञानशस्त्र=ज्ञानरूप तरवार (गण्डकः, खड्ग, खड्गी=इति गण्ड भृगस्य।) [ थोरावे थोरावला, थोर–२०३ ] (२०७). (तेणें) तिखटें ज्ञानशस्त्रें हा निखळ निवटें=तीक्ष्ण ज्ञानखड्गानें, हा तीव्र अशा ज्ञानरूप शस्त्रानें-अगदीं संपूर्ण, पूर्ण नाहींसा होतो-मरतो. मग निःशेष मानसीचें खत फिटें=मानसीचें खत, किंतु, दुःख, शोक-नाहींसा होतो. खत=घाण, मळ, खत. मानसीचें खत=मनाचा क्षत, दुःख, शोक. खता×खत. फाटे (फिटें). निःशेष=समग्र. मानसीचें× मानसीचा. निखिल=पूर्णपणें, सर्वच्यासर्व. मानसाचा-मनाचा खता (खता?) म्हणजे क्षत दुःख शोक फिटतो (=सुटतो, नाहींसा होतो, मुक्त होतो)-आडपडदा दूर झाला-द्वार आपोआप उघडतें, ब्रह्माशीं असलेला अबोला नाहींसा व्हावा जसा १७–१३२.–मानसीचें-मनाचें खत फाटतें (चिरलें जातें, फाटतें). जिभेचा हावु फाटे=रुचि वाढते-१८–२४९. मानस-मन=चित्त, विचार, बुद्धि, तर्क, स्मृति, इत्यादींचें उगमस्थान-हृदयांतील भावविकार, जाणीव, इच्छा, अंतःकरणाची ओढ व आवड; महत् तत्त्वापासून झालेला अहंकार, बुद्धि इत्यादि मिळून संसाराची मर्यादा तयार होते. खत=मलिन होणें; जखम होणें; क्षत; चिठ्ठी; केस; खात; अक्षर; व्रण. (खता शब्द नाहीं, खतावणी आहे=खात्यांत घालणें. अपभ्रष्ट हिंदी खत. (खतेले १६–२७–अंधारे खतेले अंबर) (२०८).

असला तो संशय [(द्वापरः = संशय; दोन टिपक्यांचा फांसा, देवताविशेष, तिसरें युग) (सांशयिकः, संशयापन्नमानसस्य)] जर का भंरवशाचा होऊन, पथारी अंथरून खुशाल अगदीं निर्धास्ततेनें (स्वारी होऊन-करून) आहे-घराचा आसरा (थारा घेऊन आहे)-थोरावला-तरी एका उपायानें अंगचा म्हणजे स्वाधीनतेचा होऊन येईल, पराजित होईल-जर का ज्ञानरूपी बरवें असें खड्ग हातीं आहे तर ...... (२०७)

तरी आतां तीक्ष्ण तिखट अशा ज्ञानरूपी शस्त्रानें-खड्गानें [(**ज्ञान**–मोक्षविषये धीर्बुद्धिस्तज्ज्ञानम्) (मोक्षशास्त्रादन्यत्र शास्त्रे शिल्पेचित्रादौ च धीर्विज्ञानमुच्यते। **मोक्ष**–मुक्तिः, कैवल्यम्, निर्वाणम्, श्रेयः, निःश्रेयसम्, अमृतम्, मोक्ष, अपवर्ग इति ८ मोक्षस्य। **अज्ञानम्**–अज्ञानम् अविद्या अहंमतिः। मनोनेत्रादि, धीन्द्रियमुच्यते। मनोकर्णस्तथानेत्रं रसनाच त्वचासह। नासिकाचेति षट् तानि धीइन्द्रियाणि प्रचक्षते। **अथार्थज्ञानम्**–भ्रांतिः, मिथ्यामतिः, भ्रमः इति ३ अयथार्थज्ञानस्य। **तिखट**–(१) **तीक्ष्ण**–तिग्मम्, तीक्ष्णम्, खरम् इति ३ अत्युष्णस्य। (२) लोहः, शस्त्रकम्, तीक्ष्णम्, पिण्डम्, कालायसम्, अयः, अश्मसारः, इति ७ लोहस्य।] हा संपूर्ण नाहींसा होतो; व मगच संशयामुळें होणारा मानसींचा शोक, दुःख, फाटका, तुटका, ओरखडा, जखम, पीडा, क्षत, निःशेष-समग्र-आतां पुरें असें होणें जें तें होतें-फिटतें-नाहींसें होतें. दुःख गोष्ट निरुपायाची वाईट अशी जात ह्या संशयाची-ती नाहींशी होते! (२०८)

**तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।**
**छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥**

[भारत–अज्ञानसंभूतं संशयं हृत्स्थं = अज्ञानामुळें उत्पन्न झालेला (संभूत) मनांतील, हृदयामध्यें असलेला. ज्ञानासिना (ज्ञान असिना)=ज्ञानरूपी असिनें; तरवारीनें. आत्मनः=आत्म्याविषयींचा. एनं संशयं छित्त्वा=ह्या आत्म्याविषयीं अनर्थमूलक संशयास छेदून टाक-तोडून काढ. योगम् (=शास्त्रविहित निष्काम कर्मयोग). आतिष्ठ (=आचरण कर). उत्तिष्ठ (=ऊठ)=ऊठ, स्वधर्मरूपी युद्धास आरंभ कर.]

**अन्वय :** तस्मात्। अज्ञानसंभूतं। हृत्स्थं आत्मनः संशयं। एनं छित्त्वा। ज्ञान असिना। योगं आतिष्ठ। भारत। उत्तिष्ठ।

**अर्थ :** म्हणून अज्ञानामुळें जन्मलेला, हृदयामध्यें असलेला आत्म्याविषयींचा संशय, ज्ञान-तरवारीनें तोडून टाकून, योगें, शास्त्रविहित निष्कामकर्मयोग आचरण कर, हे भारत! ऊठ व स्वधर्मरूपी युद्धास आरंभ कर! (४२).

**या कारणें पार्था। उठि वेगा वरौता।**
**नाश करुनि हृदयस्था। संशयासि॥ २०९॥**

**ऐसे सर्वज्ञाचा बापु। श्रीकृष्ण ज्ञानदीपु।**
**तो म्हणतसे सकृपु। आइके राया॥ २१०॥**

**तया पूर्वापर बोलाचा। विचारूनि कुमर पंडूचा।**
**कैसा प्रश्न अवसरिचा। करिता होईल॥ २११॥**

या कारणें पार्था। उठि वेगा-वेगी वरौता=करितां हे पार्था, वेगाचा होऊन, वेगावर येऊन शत्रूवर चढाई कर; उठण्याचें पाहा. (कसें तर हृदयस्थ (=मनांतील) संशयाचा-मी माझें हा संशय-याचा नाश करून) [वेगा=आवेशानें, उत्कंठेनें, जलद गतीनें, त्वरेनें, भरानें, अतिशय वेग. जन्मवेगा=उत्पत्तीच्या जोमानें. वरौत=वर, पलीकडे, वरची बाजू, यावर पुन्हां. [वरौता-वरैत=भर्ता (मोघे)]. वरता=वरच्या बाजूस, त्यावर, वरच्या बाजूस स्वर्गात जाण्यास वरत-वराता=शिड्या (१८-४८२). वरते=याउपर. उठणें=उभें राहणें, उद्भवणें, फुटणें, उचल घेणें, तयार होणें, उद्युक्त होणें.] (२०९). सर्वज्ञाचा बाप ज्ञानदीप श्रीकृष्ण सकृप-कृपाळु, दयाळू-होऊन. म्हणतसे आइके राया=म्हणत आहे, हे राया ऐक! (२१०). पूर्व+अपर = साधक-बाधक विचार. पूर्वापार = समुद्र, अमर्याद. अवसरिचा = समयोचित. पूर्वापर = अगोदरचा, मागचा, पहिला. विचारित=विचार केलेले. विचारणं = (विचारणा)=विचार, संशय, शोध, चर्चा, चिकित्सा, मीमांसाशास्त्र. विचार=दूरदर्शीपणा. पार=अंत, शेवट, पलीकडची बाजू-पारलौकिक(२११).

म्हणून हे पार्था, (वेगी वरौता) वेगा वरती ऊठ, उभा हो; हृदयस्थ जो संशय त्याचा नाश करून कीं जलद आवेशानें उद्युक्त हो, तयार हो; उचल घेऊन जोमानें निष्काम कर्मयोग आचर-स्वधर्मरूपी युद्धास तयार हो! (२०९)

हे राजा धृतराष्ट्रा-ऐक कीं, असे सर्वज्ञाचा, (सर्व जाणणारा १ परमेश्वर, २ शंकर ३ वायु) बाप जो श्रीकृष्ण (ज्ञानदीप, ज्ञानाचा दिवा)-ज्ञानाचा प्रकाश, (ज्ञानज्योत) तो सकृप-मोठ्याच दयेनें, कृपावंत होऊन-अर्जुनास म्हणत आहे .... (२१०)

त्या पूर्वापर-साधकबाधक विचार (पूर्व+अपर)-बोलाचा-पूर्वापार जे हे परमेश्वर भगवान श्रीकृष्ण त्यांचें असें बोलण्यासंबंधीं विचारून, (विचार करून, ज्ञानाचा विचार पुढें घेऊन)-पांडूचा कुमर अर्जुन कसा तो (अवसरिचा म्हणजे वेळ लक्षांत घेऊन) समयोचित प्रश्न करिता होईल-तें पुढें म्हटलें होणार आहे.... (२११).

**ते कथेची संगति। भावाची संति।**
**रसाची उन्नति। म्हणपेल पुढां॥ २१२॥**

**जयाच्या बरवेंपणि। कीजे आठा रसांचि वोंवाळणि।**
**जो सज्ञानाचिये आयणि। विसांवा जगीं॥ २१३॥**

**जो शांतचि अभिनवेल । ते परिसा मऱ्हाटे बोल ।**
**जे समुद्राहुनि खोल । अर्थभरित ॥ २१४ ॥**

**जैसें बिंब तरि बचकेंयेवढें । परि प्रकाशें त्रैलोक्य थोकडें ।**
**शब्दाचि व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ॥ २१५ ॥**

संगति = सहवास, संयोग, भेट, संगत, मैथुन, ज्ञान, योग्यपणा, पूर्वापर संबंध. कथेची = हकीकतीची, उल्लेखाची, गोष्टीची, संभाषणाची. कथानक = छोटी गोष्ट. भाव = उपदेश, जग, विश्व, बढती, उत्कर्ष, ज्ञानेंद्रिय, व्यसन, स्वरूप, अंतःकरण, मन, प्रेम, आसक्ति, निष्ठा, भावना, भक्ति, ध्यान, आत्मा, देवता, ईश्वर, वासना, संस्कार, प्रभुत्व, स्वभाव, रूपांतर, विभूति, अवस्थाषट्क, क्रिया; धर्म-अधर्म। ज्ञान-अज्ञान। वैराग्य-अवैराग्य। ऐश्वर्य-अनैश्वर्य। हीं आठ स्वेद रोमांच इत्यादि ८ शृंगारादि रसाचें लक्षण. भावाची संति-संपत्ति = (संती = संतसंबंधीं; संपत्ति = संपत्, संपत्ति, श्रीः, लक्ष्मी, इति ४ संपदा।) द्रव्य, भरभराट, वैपुल्य, प्राप्ति, योगस्थिति, उत्कर्ष. रसाची उन्नति ( = उंची, उत्कर्ष, समृद्धि, श्रेष्ठत्व, ध्वज वर करणें, उद्धटपणा) = अधिकपणा, वाढ. रस = कस, योग्यता, गोडी, प्रेम. म्हणिपेल पुढां = म्हटली जाईल. (संती कर्मी–बरे वाईट असणारे नसणारे, सतासत् कर्मी २–२७२). संतः = संहतलः = दोन्ही तळहात जोडणें. संहति = निकट संबंध, ऐक्य, विस्तार, घट्टपणा, लठ्ठपणा, समूह. संहत = १. गंधविशेष (पृथ्वीगुण); २. एकवटलेलें; ३. जोडलेलें; ४. एकजूट झालेला, एकमताचा; ५. दृढ, घट्ट, पीळदार (२१२).

जयाच्या बरवेंपणि :: जयाचिया बरवेंपणी = बरवेंपणि–ज्याच्या सुंदरपणावरून, सौंदर्यावरून, चांगुलपणावरून–बरवेंपणि–चांग–चांगलेपणावरून–कीजे आठा रसांचि वोंवाळणि = आठहि रस ह्या बरवेंपणावरून ओंवाळून टाकावेत; चांगुलपण इतकें कीं आठही रस तुच्छतेच्या कोटींत गेले कीं! रस = सौंदर्य, प्रीति, प्रेम, आवड, अभिलाष, रुची, गोडी, इत्यादि. आयणि = बुद्धीला (इच्छा) हेतु–तत्त्वनिर्णय झालेला. आयणि = बुद्धि, चातुर्य, इच्छा. विसांवा जगीं = ह्या जगामध्यें विसांवा मिळणारा,–मनोजय, चित्ताची स्वस्थता, समाधान, तडजोड, मंगल–विश्रांति पावणेंच एक ह्या लोकीं–(२१३).

जो शांतचि अभिनवेल = शांत रस (शांतः, शमितः इति–शमनं प्रापितस्य।) विकाररहित, शमयुक्त, सौम्य, जितेंद्रिय यति, साहित्यशास्त्रामध्यें रसविशेष शांत म्हटला–गरीब, माणसाळलेला शांतवृत्तीचा रसविशेष प्रगटेल. (रससिद्ध = काव्यनिष्णात्). अभिनवेल = नवीन होऊन येईल, प्रकाशेल. अभिनवणें = ताजें होणें, नवीन दिसणें. अभिनव = नवशिका, तोंडासारखें बोलणें, अगदीं नवीन, तरुण, ताजा. (अभिनव वधु = नुकतेंच लग्न लागलेली). (विशेष = असामान्य, विपुल, उत्तम, अवयव, व्यक्ति, स्थूल कार्ये, दृश्य वस्तु, महाभूतें. विशेषकं = उटी इत्यादींनीं भूषविणें. विशेषज्ञः = शहाणा.) परिसा–परियसा. समुद्राहुनि खोल–समुद्राहूनि मखोल = समुद्र, गहन ते सहित तीव्र, वृद्धिंगत, लपावयाची जागा, निबीड, कठीण, दुर्गमस्थान. समुद्र = मोहोरबंद. समुद्रगृहं = जलमंदिर. अर्थभरित = अर्थपुष्ट; पूर्ण; भारयुक्त. अर्थजात = सर्व गोष्टी, स्वतःचा अर्थ, अर्थपूर्ण, श्रीमंत, पुष्कळ धन (२१४). बिंब = सूर्यवर्तुळ, सूर्यबिंब. बचकें–बचकेंचि येवढें–एवढें = हाताच्या पंजांत मावेल असें; बोटासह तळहाताएवढें बचकेच्या आकाराचें. प्रकाशें–प्रकाशासि त्रैलोक्य = त्रिभुवन. थोकडें = थोडें, लहान, थोडकें. शब्दाचि व्याप्ति = शब्दाचा अर्थविस्तार. अनुभवावी = अनुभवानें खात्री करून घ्यावी (२१५).

संभाषण–संवादाचा पूर्वापरसंबंध लावून भक्ति (का विश्वास–भावरूप–स्वरूप) दर्शन–संबंधींची जी संत संपत्ति–योगस्थिति–वैभव (मोत्याची माळ, हार अथवा) दोन्ही तळहात जोडून असणें जें–स्वरूपदर्शनापुढें जें–तेथें रस, कस, योग्यता, गोडी, प्रेम, श्रेष्ठत्व, समृद्धि, उंची [ध्वज वर करणें जें (निशाण ध्वनि १८–२७९)] यासंबंधींचें पुढें बोलणें–म्हणणें–होणारें आहे– (२१२)

ज्याच्या सुंदरपणावरून (सौंदर्यावरून, चांगुलपणावरून) शृंगारादि रसां (शांत सोडून) ची ओंवाळणी करावी : : आठही रस त्याच्या चांगुलपणावरून ओंवाळून टाकावेत-जे का सज्ञान सज्जन त्यांच्या तत्त्व-निर्णयाला-चातुर्याला ब्रह्मसंबंधींचा निवाडा, निश्चयाला-ह्या जगीं "शांत" विश्रांति विसांवा कीं-(आठही रस तुच्छ मानले गेले कीं ज्याच्या तत्त्वनिर्णयावर-). (२१३)

तो विकाररहित, शांत, नवलनावीन्यतेचा, नवीन होईल, (ताजेपणास येईल, प्रकाशेल), ज्यायोगें असे ते मराठीचे बोल-(मऱ्हाटे वचन, शब्दबोध, प्रश्न उत्तर विज्ञान) जे का समुद्राहूनहि नितांत-एकांततेचें-मोहोरबंदतेहूनहि गहन तीव्र, सर्व गोष्टींची भावयुक्तता जेथें पुष्कळ धनानें (विभवानें) पूर्ण पुष्ट अशी....(२१४).

बचकेंत (पंजांत) मावेल असें सूर्यबिंब; पण त्याचा प्रकाश पाहिला असतां त्रैलोक्यहिपण अगदींच थोडें (लहान कीं) तशी शब्दाची व्याप्ति-त्या मानानें अनुभवाची होय-[शब्दाचें भरणें-शब्दानेंच भरून जावें -शब्दानें प्रसाराचें होणें हें त्या मानानें उपभोग (घेण्यासारखी)-प्रतीति-व्याप्ति ती व्हावीच व्हावी अशी-अनुभवावरच कीं अजमावलेली प्रतीति-अनुभवाची-ती अनुभवानें खात्री करून घ्यावी.] (२१५)

**नातरि कामितयांचियां इच्छा । फळे कल्पवृक्ष जैसा ।**
**बोला व्यापक होय तैसा । तरि अवधान द्यावें ॥ २१६ ॥**

**हें असो काय म्हणावें । सर्वज्ञ जाणति स्वभावें ।**
**तरि निकें चित्त द्यावें । हे विनंति माझी ॥ २१७ ॥**

**जे साहित्य आणि शांति । हे रेखाचि दिसे बोलती ।**
**जैसी लावण्यगुण कुळवंती । आणि पतिव्रता ॥ २१८ ॥**

**आधीचि साखर आवडे । आणि तेचि जन्हि औषधा जोडे ।**
**तरि सेवावी ना कां कोडें । नावानावी ॥ २१९ ॥**

**सहज मलयानिळ सुगंधु । तया अमृताचा होय स्वादु ।**
**तेथेंचि जोडे नादु । जरि दैवगत्या ॥ २२० ॥**

कामितयांचि-कामितयांचिया = इच्छा करणें जें-स्वाभाविक कर्म सोडून, इतर कर्मं, इच्छा केल्याशिवाय संपादन करतां येत नाहींत. बोला-बोल व्यापक होय तैसा = वचन शब्दबोध प्रश्न उत्तर विधानास भरून जाणें-भरणें-प्रसरणें जें-तैसा होय. तरि अवधान द्यावें = तरी लक्ष द्यावें (अवधानाची एकच पांति बैसो १३-३७१).-(२१६). साहित्य = ऐक्य, साह्य, सामग्री, काव्य. शांती-शांति = १) दूर करणें, चित्ताची स्वस्थता, विश्रांति, विकारशून्यता, मनोजय, वैर थांबणें, विघ्ननिवारक धार्मिक कर्म, समाधान, पूर्वस्थितीवर येणें; (शांतिमार्ग = मोक्षमार्ग). रेखाचि = कवित्वरचना (रेखा = विद्युत्‌माला). (रेखा = रेघ, रेषा; चित्र काढणें; रांग; पंक्ति; तृप्ति. (रेखागणित = भूमिति). लावण्यगुण = १) सौंदर्यशोभा. २) खारटपणा. (लावण्यार्जित = सासुसासऱ्यानें विवाहकालीं दिलेलें स्त्रीधन). कुलवंत (कुल = चांगलें कुल, देश, शरीर, घराणें, समुदाय. कुलज = कुलीन, पिढीजात. कुलपति = श्रीकृष्ण). पतिव्रता = पतिप्राणा, पतिदेवता; पतिव्रता = पूर्ण पतिनिष्ठ स्त्री (२१८).

आधीचि = अगोदरचीच कीं. साखर = शर्करा, सीता, खंडविकारः, साखर, खडीसाखर, (खापर, वाळू, रेती, वाळुयुक्त माती, लहान खडा-गोटा). आवडे = मनास येणें, रुचणें, भासणें, वाटणें, दिसणें; प्रेमाचें कोड पुरविणारी; आवडतसे, (मनुष्यासारखा आवडे-माणसासारखा दिसतो-१००-४). जन्हि औषधा जोडे = ओखदासाठीं-औषधासाठीं मिळाली, मिळविली, जुळविली,-संबंधाची केली-साधन मिळविलें,

लाभाची झाली, संपादिली, सामर्थ्याची केली. ओखद = रोगावर योजलेली वनस्पति, मुळी, मात्रा, रसायन. आपला गुण दाखवून आपोआप उतरतें तें ओखद (१८–१०८०). रोग निवारण्यास योजिलेली वनस्पति औषधी (९–२६७). सोमादि सर्व वनस्पतींना चंद्र पोसतो (१५–४०४). परिणामीं हितकर असलें तरी जिभेला औषध रुचत नाहीं (६–३६२). औषध घेतांच गुण येतो काय (१८–९९९). कोडें = कौतुकानें, आवडीनें, सहज, लडिवाळपणानें (१५–५९९). नावानावी = वारंवार. (माकंद = आंबा) (११९).

सहज–सहजे–(सह + ज) = स्वाभाविक, जन्मसिद्ध, सख्खा भाऊ, जातिस्वभाव. मलयानिळ–मलयानिल = मलय पर्वतावरील वारा, दक्षिणेकडील वारा. मलय = एक पर्वत, (पर्वतविशेषः।) आदिना मलय.–चित्रकूट–मंदरादयः। मलय = बाग, नंदनवन, (मलय, उद्भव, ज, जं = चंदन). [कुलाचलाः सप्त = सात मुख्य पर्वत १. महेंद्र, २. मलय, ३. सह्य, ४. शक्तिमत्, ५. ऋक्ष, ६. विंध्य व ७. पारियात्र.] अनिल = वायु, पांचवा वसु, वात धातु, विष्णु, वायुरूपी ४९ उपदेवता. अनिलात्मजः = भीम, मारुति. सुगंध = मंद सुगंध. मंद = धीमा, अंधुक, सौम्य, मृदु, अल्प, खोल (शब्द), स्वतंत्र, निर्विकार, (गजभेद), हळुहळू सौम्यपणें. सुगंध = केवडा, चंदन, कमळ, (गंधक, जोंधळा, नारळ, रोहित गवत, हरभरा, मोगरी, रास्ना, इत्यादि), शहजिरें. तया अमृताचा हो–होय–स्वादु (स्वाद) = स्वादु = इष्टः मधुरः उभौ स्वादु. अमृत = अमर करणारें; अमरत्व, मोक्ष, स्वर्ग, अत्यंत आनंद देणारी वस्तु; ब्रह्म; मध. तेथेंचि जोडे नादु = (जोडे = लाभाची होईल. नाद = शब्दगर्जना) = मधुर स्वर. (नाद = शब्दः, निनादः, निनदः, ध्वनिः, ध्वानः, रवः, स्वनः, स्वानः, निर्घोषः, निर्ह्रादः, नादः, निस्वानः, निस्वनः, आरवः, आरावः. संरावः, विरावः इति १७ शब्दमात्रस्य।). जरि–जरी दैवगत्या = दैववशात्, दैवगतीनें. (दैवतः = प्रारब्धानें. दैवयोग = आकस्मिक योग; संभव. दैववाणी = आकाशवाणी, संस्कृतवाणी (२२०).

(इच्छित प्रेम–इच्छित इच्छा) प्रेम करणाऱ्यासाठीं–(प्रेम इच्छा करणाऱ्यासाठीं) जसा कल्पवृक्ष फळें देणारा होतो, तसे बोल बोलास व्यापक व्हावें असें वाटत असेल–तर लक्ष द्यावें. (२१६)

असें हें असो–इथें कांहीं (म्हणण्या) बोलण्याचें कारणच नाहीं; हें स्वभावेंकरूनच कीं सर्वज्ञ जे आहेत ते जाणतातच; करितां हितच होईल असें इथें चित्त–लक्ष देण्याचें करावें, अशी आपणास माझी विनंति आहे. (२१७)

जे का ऐक्य, साह्य, सामग्री, (काव्य) आणि शांति–[विकारशून्यता, मनोजय (वैर थांबणें जें), तेथें] कवित्वरचना–विद्युन्माला–रेखा–बोलती (बोलणारी योग्यता) अंगीं वाहून आहे [(दिसत आहे)–दिसते] का एक सौंदर्यवान् [गुणवान् (गुणराशी–मनोधर्म, स्वभाव, वस्तूचे धर्म असलेली–)] पतिप्राणा बोलणारी–बोलण्याची योग्यता अंगीं बाणून आहे. रेखा–कवित्वशक्तिः। साहित्य व शांति, तेथें बोलती, कवित्वरचना, गुणलावण्य, कुलवान् पतिव्रता जशी. (२१८)

अगोदर गोड अशी साखर (का खडीसाखर ती मनास येते–खावीशी वाटते–प्रेमाचें का जिव्हेचें कोडकौतुक पुरविणारी अशी ती आवडतसे) वर ती औषधासाठीं रोगावर योजलेली [जशी का तरी औषध म्हणून–भवरोग–मानसव्यथा इत्यादींसाटीं योजावी, योजिली, मिळाली, संपादिली, लाभाची झाली] तर सहज कौतुकानें, आवडीनें वारंवार ती सेवन करावी ना का! ...... (२१९)

अगदीं स्वाभाविकपणेंच मलय पर्वतावरील धीमा, (सौम्य, मृदु, केवड्याचा) सुगंध (त्यास त्याचा) अमृतासारखा (इष्ट, मधुर) स्वादु होत आहे; तेथेंच दैववशात् मधुर स्वर–शब्द लाभाचा झाला. (२२०)

**तरि स्पर्शें सर्वांग निववी । स्वादें जिव्हेतें नाचवी ।**
**तेवींचि काना करवि म्हणवि । बाप माझा ॥ २२१ ॥**

**तैसें कथेचें इयें ऐकणें । श्रवणासि होय पारणें ।**
**आणि संसारदुःख मूळवणें । विकृतिविण ॥ २२२ ॥**

**जरि मंत्रेचि वैरि मरे । तरि वायां कां बांधावें कटारें ।**
**रोग जायें दुधें साखरें । तरि निंब का पियावा ॥ २२३ ॥**

**तैसा मनाचा मार न करितां । आणि इंद्रिया दुःख न देतां ।**
**येथें मोक्ष असे आइता । श्रवणाचि माजि ॥ २२४ ॥**

**म्हणोनि आइतिया आराणुका । गीतार्थ हा निका ।**
**ज्ञानदेव म्हणे आइका । निवृत्तिदासु ॥ २२५ ॥**

स्पर्शें सर्वांग निववी = स्पर्शानें–प्राणानें–सर्वांग निववीत आहे; विनंती करीत आहे–प्राण सर्वांगीं व्यापून आहे. स्पर्श = संपर्क, दान, कातडी. स्पर्श(व्या.) = क् पासून म् पर्यंत वर्ग. स्पर्शमणि = परीस. वैरागर = आपल्या स्पर्शानें खड्यांचें रत्न करणारा मणि. सर्वांग = सर्व, सगळें, प्रत्येक अंग. अंग = शरीर, अवयव, अर्थ. अंगभाव = गौण व प्रधान यांचा संबंध. अंगें = स्वतः. अंगक्रिया = गौण यज्ञ. अंगप्रायश्चित्त = देहशुद्धि. अंगरक्षक = हुजरात. अंगविद्या = वेदांगाचें ज्ञान. अंगहीन = मदन. अंग वैकृत = १. आकार, चेहरा; २. शरीरांतील फरक. स्वादें जिव्हेतें नाचवी = इष्ट मधुर स्वादानें जिव्हासरस्वतीस तर मयूराचें आसन होऊन ती उत्तम असें बोलणें करीत आहे. तेवींचि काना करवि म्हणवि = त्याचप्रमाणें कानासहि वाचा (फुटली) –म्हणून ते म्हणूं लागत आहेत कीं– (कर्ण = नावेचें सुकाणूं). बाप माझा = शाबास, शाबास, माझ्या बाप्पा! (२२१). कथेचें इयें = गीताश्रवणानें. श्रवणासि होय पारणें = कर्णेंद्रियें तृप्त होतात. संसारदुःख (मूळवणें) –मूळखणें–विकृतिविणें = सहज रीतीनें संसारदुःख घालविणें–दवडणें. संसारदुःख = संसारजनित दुःख. मूळवणें = घालवणें, दवडणें, उन्मूलन. (मूळ + वणें = आमंत्रण घेऊन जाणारा पुरुष). विकृतिविणें = सहज रीतीनें, विकारयुक्त नच होतां, विकाराशिवाय (२२२).

मंत्र = बोलावणें, खलबत, स्तुतिपरवाक्य, वेदाचा एक भाग. वैरी = शत्रु, योद्धा. वैर = शत्रुत्व, द्वेष. शौर्य. कटारें = कट्यार–(२२३). तैसा मनाचा मार = (मनु = विचार करणें, आदर करणें. मनस् = अंतःकरणबुद्धि). मनाचा मार = मनाचें मरण, विरोध, कामविकार, विघ्न, सत्सत्‌विवेक बुद्धि. [मार म्हणजे बौद्धमतें नाश करणारा]. न करितां = मनाचें नेहमीं कामविकारानें असणें; कामातुरता तें नच विरोधाचें करितां. इंद्रिया दुःख न देतां = त्रास, कष्ट न देतां–ज्ञानाचें का कर्माचें साधन जें इंद्रिय त्यास (मनास). मोक्ष असे आइता = निर्वाण, ऐक्य, संयोग, आपोआपच आयताच कीं येथें. श्रवणाचि माजि = कानानें ऐकणें जें; ऐकण्याच्या अभ्यासानें कीर्नीस आला वेद तो (२२४). आइतिया–आथिलिया आराणुका = भाग्यसंपन्नाला, विश्रांतिस्थळ, समाधानस्थळ प्राप्त झालेल्या, असलेल्या शांततेनें म्हणजे शांत रसानें सुसंपन्न झालेले श्रोते त्यांनीं चांगला असा हा गीतार्थ ऐकावा! (२२५).

प्राणानें सर्व अंग निववलें,–(स्पर्शानें प्राण सर्वांगीं व्यापून आहे, विनंती करीत आहे, विनवीत आहे, निववीत आहे सर्वांग–इष्ट मधुर) स्वादानें जिव्हासरस्वतीस नाचवीत आहे. (बोलणें तें जसें का शारदा-सरस्वतीसच असें उत्तम बोलणें करीत आहे–तसेंच शाबास) शाबास असेंच (कीं म्हणणें होऊन आहे–कानाकडून कीं–) श्रवणेंद्रियांकडून बाप भले असें (कीं, कीर्तीच बोलत आहे!) वेदच जणूं जसें बोलत आहेत! (२२१)

तसें ह्या कथेचें (गीताश्रवणाचें) ऐकणें तें तर कर्णेंद्रियास पारणेंच होत आहे–कर्णेंद्रियेंहि तृप्त होत आहेत, संसारजनित दुःख सहजरीतीनें विकाराशिवाय (घालविते, दवडिले होते)–उन्मूलन केलें होत आहे. (२२२)

साध्या मंत्रानें वैरी मरत आहे, तरी मग कशास कटारें (कट्यार) बांधण्याचीं करावींत तीं–रोग जर दुधसाखरेनें गेला तरी मग निंब पिण्याचा तो कशास ? (२२३)

त्याप्रमाणें मनास मार देणें तें नच करतां [मनाचा मार– १. हन्त–(खेद, अनुकम्पा, संतोष, विस्मय, हर्षादि चतुष्के हन्त शब्दः।) २. पीडा, बाधा, व्यथा.] इंद्रियांनाहि दुःख नच देतां, येथें तर श्रवणामध्येंच † की आयता मोक्ष आहे ! (२२४)

म्हणून (आथिलिया) असेल तितक्या (शांति, सौख्य, खटपट, आवड) समाधानानें (आराणुका) कल्याणकारक असा हा चांगला (खरा, निका) गीतार्थ श्रीनिवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात, ऐकावा. (२२५)

इति श्रीमत् भगवद्‌गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मब्रह्मार्पणयोगो नाम चतुर्थोऽध्यायः॥

[श्लोक ४२. ओंव्या २५५. एवम् २६७. श्रीकृष्णार्पणमस्तु।]

॥ ॐ तत्सत् कृष्णार्पणमस्तु ॥

---

† (नवाची खाणीं) श्रोत्र इंद्रियांवाचून बाकीची नव इंद्रियांची खाण दहाव्या श्रोत्र इंद्रियानें महावाक्य श्रवण करून शोषण करून टाकिली आणि अकरावें जें मन, त्यानें तर या देहभावाला देशोधडीला लावलें–म्हणजे नाहींसें करून टाकलें. अशा रीतीनें या ब्रह्मपंथांत माखलें जाऊन, अदृश्य होऊन, द्रष्टयाचें झालें, द्रष्टाचें झालें,– आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं मन जागें झालें–माझें मनरूपी अंबर म्हणजे वस्त्र हें ब्रह्मरसामर्थ्यें भिजवून पिळलें, पण कसलाहि रंग आला नाहीं–अज्ञानी जीवांनीं साररूप मानलेला जो प्रपंच त्याचा माझा वियोग झाल्यामुळें त्याचें पोषक जें कर्म तें बुडालें; म्हणजे संचित क्रियमाण या सर्व कर्मांचा दाह होऊन मी निष्कर्म म्हणजे परमात्मरूप झालें–म्हणून लोकदृष्ट्या कर्मांचा भोग असला तरी त्यांत मी अडकून नाहीं–आतां माझीं जागृति, स्वप्न, सुषुप्ति हीं बुडालीं म्हणजे रखुमादेवीवर जो बाप श्रीविठ्ठल यानें देहासहित गिळून टाकलीं, असें श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात–श्रीविठ्ठलप्रसादानें झालेली स्थिति–[कलागृह प्रेस प्रत : ६६६ सदाशिव, पुणें २ : साधकाश्रम : मु. पो. आळंदी (देवाची) : जि. पुणें.]